हास्यास्पद करून घेईन अशी भीतिच खरी. पण अपरिचित शब्दहि पुन पुन. हेतुपुरःसर उपयोगात आणल्यानें शेवटीं रूढ होतात !

याशिवाय ज्ञानेश्वरींतील चटकदार असे शब्दप्रयोग निवडून काढून तेहि सुमार तीनशें ) दिले आहेत. या शब्दप्रयोगाना सिद्धांत किंवा सुभाषित याचें संपूर्ण स्वरूप नाहीं. तथापि थोडक्यात पुष्कळ सागण्याचा ज्ञानेश्वराचा जो एक मोठा गुण तो त्यावरून दिसून येईल. इंग्रजींत या वाङ्मयगुणाला टर्सनेस ( Terseness ) असें म्हणतात. आकार थोडा पण शक्ति मोठी–हा प्रयोग मनावर परिणाम केल्याशिवाय राहत नाहीं. वयानें लहान असलेला एखादा मुलगा समना उत्कृष्ट गातो, सुदर चित्र काढतो, सुदर व्याख्यान देतो, असें पाहिलें म्हणजे–किंवा चिमूटभर कृष्णमृत्तिकेनें ( ज्वालाग्राही दारूनें ) मोठा भडका किंवा स्फोट होतो असें पाहिलें असता जें आश्चर्य वाटतें तच थोड्या शब्दात पुष्कळ अर्थ प्रगट झालेला पाहून वाटतें. ज्ञानेश्वराचा हा वाङ्मयगुण वाचकाच्या दृष्टीस यावा या हेतूनें हे शब्दप्रयोग दिले आहेत.

'विवेचन' या विभागात ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाचीं साधनें याविषयी लिहिताना सूचीच्या साधनाचें महत्त्व मीं दर्शविलें आहे. नागपूरचे सुप्रसिद्ध भगवद्भक्त वकील रा. द. ग खापरे याच्या सूचीचा उपयोग करता आल्यानें ती गरज मला सक्षेपानें भागविता आली. तसेंच रा. ज्ञा उ. माढरे, पुणें, यानीं गद्यसाराशाची पुरवणी लिहून दिली तिजमुळें त्या भागाला अधिक पूर्णता आली. म्हणून या दोघा सन्मित्राचे आभार मीं त्या त्या स्थळीं ( पृष्ठ ३२१ व पृष्ठ ३५५ येथें ) मानले आहेत.

शेवटीं शेवटचें सागावयाचें उरलें कीं, माझ्या इतर काहीं ग्रथाप्रमाणें हा ग्रथहि मीं केवळ याच हेतूने लिहिला कीं, माझ्या अभ्यासाचा उपयोग इतराना व्हावा ज्ञानेश्वरीवर आपणास काहीं नवा प्रकाश पाडता आला अशा भावनेनें मीं हा ग्रथ लिहिला नाहीं. तर आज चार वर्षे मीं ज्ञानेश्वरीचा अभ्यास करिताना अभ्यासू वृत्तीनें टिपणें केलीं त्याचा सहजासहजीं उपयोग माझ्या इतकी सधि किंवा साधनें नसणाऱ्या इतराना व्हावा या हेतूनें हा ग्रथरूप टिपण-सग्रह मीं छापून प्रसिद्ध केला आहे.

श्रीरामनवमी }
शके १८६८. } न चि. केळकर

# ज्ञानेश्वरी सर्वस्व–अनुक्रमणिका

## गद्यसारांश व निवडक ओव्या



## विवेचन

# ज्ञानेश्वरीचा उद्गाता



माझा मराठाचि बोल कौतुकें । परि अमृतातेहि पैजा जिंके
ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन

# ज्ञानेश्वरी सर्वस्व

## अध्याय पहिला

श्रीज्ञानेश्वर म्हणतात—

महाभारत ही चमत्कारांची खाण, विचारवृक्षांचा बगीचा, सिद्धांतांचा साठा, रसांचा समुद्र, विद्यांचे मूलस्थान, श्रेष्ठ शास्त्र, धर्मांचें माहेरघर, वाङ्मयरत्नांचा कोश, काव्यग्रंथांचा राजा आहे. त्यानें ब्रह्मज्ञानाची मृदुता वाढविली. चतुरतेला शहाणा केले. तत्त्वदर्शनाला गोडी आणली कलांना कुशलता मिळवून दिली. सद्गुणांना चांगुलपणा आणला. महाभारतात नाहीं तें त्रैलोक्यात नाहीं. गीताप्रसंग हा भारतकमलांतील पराग आहे वेदांच्या लोण्यातून निघालेलें तें साजूक तूप आहे चकोरांचीं पिलें चंद्रकिरणांतील कोमल अमृतकण वेंचतात त्याप्रमाणें वाचकांनीं ही भारतकथा मनानें सेवावी आणि तिचें सेवन करितांना, भ्रमर जसे कमलाच्या पाकळ्यांना न दुखवितां पराग घेऊन जातात तशी, नाजुकता व चातुर्य प्रगट करावें. स्वतः मीहि गीतेचा अर्थ समजून घेण्याचा प्रयत्नच करीत आहें. हें काम टिटवीनें समुद्र आटवू पाहण्यासारखें आहे परंतु ईश्वरसामर्थ्याच्या शक्तीनेंच मी तें करू पाहतों शिवाय कळसूत्री बाहुल्याप्रमाणें मजकडून हें काम करून घेण्याला सद्गुरु समर्थ आहेत

नक्षत्राचा सडा पडतोसा वाटला. प्रलयकाळ आल्यासारखी भीति वाटली म्हणून कृष्णानें शंख वाजविण्याचें योजिलें. प्रलयकाळच्या मेघांप्रमाणें योद्धे बाणांचा वर्षाव करूं लागले.

पण अर्जुनाच्या मनांत अकल्पित करुणा उत्पन्न झाल्यानें त्याच्या अंगांतील वीरवृत्ति लोपली. हें विपरीतच झालें नव्हे काय ? तपोबलानें ऋद्धीनें ऐश्वर्य प्राप्त व्हावें पण बुद्धीनेंच भ्रम पावावें आणि सिद्धीला विसरून जावें, किंवा एखादा मंत्र घालतांना मांत्रिकच चांचरावा तशी अर्जुनाची गत झाली. कठीणहि लांकूड कोरणारा भुंगा कोवळ्या कळीमध्यें अडकून पडावा तसें हें झालें. पण ती परमात्म्याचीच माया होती म्हणून घडलें खरें. आणि मग अर्जुन सर्व विपरीतच बोलूं लागला. तो म्हणाला–

कौरवांना मारावें तर धर्मादि माझ्या भावांना मी कां मारूं नये ? राज्य करून तरी काय करावयाचें ? वडिलांचें अहित चिंतावें तर जन्माला तरी कां यावें ? हें अयोग्य कृत्य मी केलें तर, कृष्णा, तूंच उद्यां मला नांवें ठेवशील. तूं माझ्या हातचा जाशील, माझ्या पुण्याचा ओलावा नाहींसा झाला तर, आग लागलेल्या उपवनाला कोकिळ सोडून जातात तसा तूंच मला सोडून जाशील. सरळ वाटेनें जातांना सिंह आडवा यावा तसें हें युद्धाचें संकट आलें आहे म्हणून तें टाळलेलें बरें. लांकडावर लांकूड घासलें तर अग्नि उत्पन्न व्हायचाच, तीच गोष्ट भाऊबंदांच्या युद्धाची होय. युद्धाचा परिणाम म्हणून पापें समाजांत शिरतात, जसें कांहीं चव्हाट्यावर ठेवलेल्या बळीवर कावळ्यांनीं येऊन धाड घालावी. नखाच्या टोंकाला साप चावला तर सगळ्या अंगांत विष भिनतें त्याप्रमाणें या युद्धाच्या दोषानें आमचा कुलक्षय होईल. इतरांच्या कुळांनाहि हा संसर्गदोष आगीच्या झळीप्रमाणें बाधेल. अशानें मिळविलेलें राज्य म्हणजे नरकभोगच होय."

अशा रीतीनें विपरीत बोलणारा अर्जुन, अधिकारभ्रष्ट राजपुत्राप्रमाणें किंवा राहूनें ग्रासलेल्या सूर्याप्रमाणें किंवा महासिद्धीच्या मोहानें ग्रासलेल्या तपस्व्याप्रमाणें, निस्तेज भासूं लागला व त्यानें धनुष्यबाण टाकून दिले.

( १ ल्या अध्यायांतील निवडक वचनें )

१ ॐ नमोजी आद्या । वेदप्रतिपाद्या
जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा
देवा तूंचि गणेशु । सकळमतिप्रकाशु

२ आता अभिनव वाग्विलासिनी । जे चातुर्यार्थकलाकामिनी
ते श्रीशारदा विश्वमोहिनी । नमिली मियां

३ जैसें डोळ्या अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे
मग वास पाहिजे तेथ प्रगटे । महानिधी

४ म्हणोनि जाणतेनें गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होइजे
जैसें मूळसिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती

५ आता अवधारा कथा गहन । जे कळाकौतुका जन्मस्थान
कीं अभिनव उद्यान । विवेकतरूचें
ना तरी सर्व सुखाची आदि । जे प्रमेयमहानिधि
नाना नवरससुधाब्धि । परिपूर्ण हे

६ एथ चातुर्य शाहणें झालें । प्रमेय रुचीस आलें
आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें एथ

७ तैसें व्यासमती कवळिलें । मिरवे विश्व

८ ना तरी नगरांतरीं वसिजे । तरी नागरचि होइजे
तैसें व्यासोक्तितेजें । धवळत सकळ
कीं प्रथमवयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी
प्रगटे जैसी आगळी । अंगनाअंगीं
ना तरी उद्यानीं माधवी घडे । तेथ वनशोभेची खाणी उघडे

९ आतां भारतकमळपराग । गीताख्य प्रसंग

१० जैसे शारदीचिये चंद्रकळे–। माजि अमृतकण कोंवळे
ते वेचिती मनें मवाळें । चकोरतलगें

तियापरी श्रोतां । अनुभवावी हे कथा
अति हळुवारपण चित्ता । आणूनियां

११ जैसे भ्रमर पराग नेती । परी कमळदळें नेणती

१२ कीं टिटिभू चांचुवरी । माप सूये सागरीं
मी नेणत त्यापरी । प्रवर्ते एथ

१३ तरी न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें
करूनि घ्यावें हें तुमतें । विनवित असें

१४ तिये वेळे तो संजय बोले । पांडवसैन्य उचललें
जैसें महाप्रळयीं पसरलें । कृतांतमुख

१५ नातरी वडवानल सादुकला । प्रळयवातें पोखला
सागर शोषूनि उधवला । अंबरासी

१६ एकेकाचेनि मनोव्यापारें । हें विश्व होय संहरे

१७ जे शस्त्रविद्यापारंगत । मंत्रावतार मूर्त

१८ पतिव्रतेचें हृदय जैसें । पतीवांचूनि न स्पर्शे

१९ आमचिया काजाचेनि पाडें । देखती आपुलें जीवित्व थोकडें
ऐसे निरवधि चोखडे । स्वामिभक्त

२० आधींच समुद्र पाहीं । तेथ दुवाडमण कवणा नाहीं
मग वडवानळ तैसेयाही । विरजा जैसा

२१ ते दोन्ही नाद मिनले । तेथ त्रैलोक्य बधिरीभूत जाहलें
जैसें आकाश कां पहिलें । तुटोनियां

२२ तेणें महाघोषगजरें । दुमदुमिताती गिरिकंदरें

२३ कीं पाखांचा मेरु जैसा । रहंवर मिरवतसे तैसा

२४ पाइक पाठीसीं घातला । आपण पुढां राहिला

२५ जेणें नादें अंतक । गजबजला ठाके

२६ तेथ तिन्ही लोक डळमळित । मेरु मांदार आंदोलित
समुद्रजळ उसळत । कैलासवरी
२७ पृथ्वीतळ उलथों पहात । आकाश असे आसुडत
तेथ सडा होत । नक्षत्रांचा
२८ म्हणोनि विश्व सावरलें । एऱ्हवीं युगान्त होतें वोडवलें
२९ तो गाजत जव आइकती । तव उमेचि हियें घालिती
एकमेकांतें म्हणती । सावध रे सावध
३० वाटिवावीण हाव बांधिती जुझीं ।
जुझाची आवडी धरिती । परी समार्मी धीर नव्हती
३१ ऐसी पुढील से घेत । तो सहजें जाणें हृदयस्थ
परि उगा असे निवांत । तिये वेळीं
३२ ऐसें गोत्रचि दोहीं दळीं । उदित जालें असे कळी
३३ तेथ मनीं गजबज जाहली । आणि आपैसी कृपा उपजली
३४ जिया उत्तमकुळींचिया होती । आणि गुणलावण्य आथी
तिया आणिकीतें न साहती । सुतेजपणें
नविये आवडीचेनि भरें । कामुक निजवनिता विसरे
मग पाडेंविण अनुसरे । भ्रमला जैसा
कीं तपोबळें ऋद्धी । पातलिया भ्रशे बुद्धी
मग तया विरक्तासिद्धी । नाठवे तीं
३५ देखा मंत्रज्ञ बरळ जाये । तेथ का जैसा संचार होये
३६ जैसा चंद्रकरीं शिंपिला । सोमकांत
३७ जैसें भ्रमर भेदी कोडें । मल्तैसें काष्ठ कोरडें
परि कळिकेमाजि सांपडे । कोंवळिये
तेथ उचीर्ण होईल प्राणें । परि तें कमळदळ चिरू नेणे
तैसें कठिण कोंवळेपणें । स्नेह देखा

३८ तरी आम्हीं कां जन्मावें । कवणालागीं जियावें
जरी वडिलां यां चिंतावें । अहित मनें
पुत्रातें इच्छी कुळ । तयाचें कायि हेंचि फळ
जे निर्दळिजे केवळ । गोत्र आपलें

३९ जरी आजि एथ ऐसें कीजे । तरी कवणाच्या मनीं उरिजे

४० तैसे दोष हे मूर्त । अंगीं वाजों असती पाहात
हें जाणतांही केविं एथ । प्रवर्तावें

४१ असता दीप दवडिजे । मग अंधकारीं राहाटिजे
तरी उजूचि कां अडखुळिजे । जयापरी

४२ जेथ नित्यादि क्रिया ठाके । नैमित्तिक क्रिया पारुखे
तेथ कवणा तिळोदकें । कवण अर्पी

४३ जैसा राजकुमर पदच्युत । सर्वथा होय उपहत
कां रवि राहुग्रस्त । कळाहीन
ना तरी महासिद्धिसंभ्रमें । जिंतिला तापस भ्रमें
मग आकळूनि कामें । दीने कीजे

## अध्याय दुसरा

पण चिखलांत रुतलेल्या राजहंसाप्रमाणें अर्जुन दीन झालेला पाहून श्रीकृष्णानें त्याच्याशीं युक्तिवाद केला. तो म्हणाला-" अंधकारानें सूर्याला ग्रासावें, किंवा वाऱ्यानें मेघाला म्यावें, किंवा बेडकानें सर्पाला गिळावें तसें हें घडलेलें दिसतें! लढाईंत ढिलेपणा ठेवला तर क्षत्रियांना अधोगतिच मिळते." कृष्णाच्या बोलण्यांत कठोरपणा होता पण आई रागानें मुलाला बोलली तरी तिच्या अंतःकरणांत मायाच असते, किंवा कडू औषधांत अमृतसिद्धि असते, तसें कृष्णाचें बोलणें होतें. तो म्हणाला—"तुला या वेळीं राजहंसाप्रमाणें पाणी व दूध वेगळें केलें पाहिजे किंवा अग्नीच्या सहाय्यानें हिणकस काढून टाकून शुद्ध सोनें निवडून घेतात त्याप्रमाणें युक्तायुक्तविवेक केला पाहिजे कोण कुणाला खरोखर मारतो ? ज्याप्रमाणें सावलीला शस्त्रानें वार लागत नाहीं, तसें या धर्मयुद्धांतील मारणें होय. भरलेली घागर पालथी झाली म्हणजे तिच्यांत पडलेलें सूर्यबिंब अदृश्य होतें म्हणून काहीं मुळांतला सूर्य लोपत नाहीं. तसेंच युद्धांत शरीर पडलें तरी आत्मा अमरच राहतो उत्पत्ति, स्थिति व लय हा एक गगनदीप्रमाणें अखंड प्रवाहच आहे

जगाचा क्रम रहाटगाडग्यासारखा किंवा सूर्याच्या उदयास्तासारखा चालूच राहणार. आकाराला आलेली सर्व सृष्टि जर मायेमुळेंच भासमान होते तर कोणी मेल्यास त्यानें हानि कसली ? युद्धांत दया-माया हें भलत्या ठिकाणीं मळतें केल्यासारखें होय दूध गाईचें असलें तरी तें पथ्याला वर्ज्य म्हणून सांगितलें तर सेवणें अयोग्य. मायाममताप्रेम हीं गाईच्या दुधासारखीं, पण धर्मयुद्धाचा ज्वर अंगांत भरल्यावर तें सर्व कुपथ्यच ठरतें.

हे तुझे वैरी आजच का सोयरे झाले ? ते पूर्वीं तसे नव्हते काय ? बरें, युद्ध तरी तुला नवीन आहे काय ? तें नेहमींचेंच आहे."

अर्जुन म्हणाला-" आम्हांवर आलेलें हें कृत्य थोरांच्या नाशाचें आहे. ज्या आईबापांची सेवा करावी त्यांना कसें मारावें ? ज्या संतांना वंदनच करावें त्यांची निंदा कशी करावी ! भीष्म व द्रोण यांचा तर मी ऋणी आहें. त्यांचा वध करून का मी धनुर्विद्या मिरवावयाची ? त्याकरितां का त्यांनीं आम्हांला ती शिकविली ? भीष्म हा समुद्राप्रमाणें शांत, आकाशाप्रमाणें अमर्याद, आपला मनोधर्म न सोडणारा, आईप्रमाणें ममता करणारा आहे आमच्यावर तर

त्याची विशेष कृपा. अशाला मारून इंद्रपद मिळालें तरी नको. त्याहून भीक बरी, देहत्याग बरा. रक्तानें माखलेलें सुख सेवन तरी कसें करावें ? माझ्या बुद्धीच्या डोळ्यावर सारा आला आहे. म्हणून, देवा, तूच सुविचार सांग. तून आम्हाला सर्व काही आहेस."

तेव्हा वणव्यानें व्यापलेल्या पर्वतावर मेघवृष्टि व्हावी त्याप्रमाणें कृष्ण गंभीर व निष्ठुर वाणीनें म्हणाला—"आश्चर्यच आहे ! जन्मांधाला वेड लागून तो सैरावैरा धावावा तसेंच तुझें शहाणपण धावत चाललें आहे. अरे ! हें त्रिभुवन तुझ्याचमुळें झालें आहे काय ? किंवा जन्ममृत्यु हे तू उत्पन्न केलेस काय ? सृष्टि अनादिसिद्ध आहे आणि जन्ममृत्यूचा क्रम सतत सुरू आहे. तुझी भ्रांति गेली कीं हें सर्व अनित्य आहे असेंच तुला पटेल. मनुष्याच्या वयपरत्वें त्याला अनेक दशा प्राप्त होतात, तथापि प्रत्येक अवस्थेबरोबर शरीर काही नष्ट होत नाहीं. तीच गोष्ट चैतन्याचीहि आहे. हा भ्रम होतो तो इंद्रियांच्या कारणानें होतो. तीं अन्तःकरण ग्रासून टाकतात, सुखदुःखाचे अनुभव देतात, आवडी-निवडी शिकवितात. शिवाय इंद्रियांचे विषय तरी टिकाऊ कोठें आहेत ? तेहि मृगजळच. राजहंस पाणी व दूध वेगळें करितो, सोनार सोन्यातून हिणकस काढून टाकतो, दही घुसळलें म्हणजे त्यातून लोणी निघतें, आणि मळलेलें धान्य वाऱ्यावर धरलें म्हणजे फोलपट उडून जातें; त्याप्रमाणें ज्या साधकांनीं विचार करून सार ओळखलें त्यांना शरीर हें अनित्य आहे असें कळतें. जे नित्य स्वरूप त्याचा घात होत नाहीं. अनित्याचाच होतो. शरीराचा नाश झाला तरी आत्म्याचा होत नाहीं. मडक्यातलें पाणी सांडून सूर्यबिंब नाहीसें झालें तरी सूर्य नाहींसा होत नाहीं. फार तर आत्मा जुनें देहरूपी वस्त्र टाकतो व नवें घेतो इतकेंच. त्या आत्म्याचा घात शस्त्रानें होत नाहीं. तो जळत नाहीं, भिजत नाहीं, बुडत नाहीं, वाळत नाहीं. तो स्थिर व सर्वव्यापी राहतो. गंगेच्या पाण्याप्रमाणें उत्पत्ति, स्थिति व नाश याचा क्रम अखंड आहे. तो क्रम रहाट-गाडग्यासारखा किंवा सूर्याच्या उदयास्ताप्रमाणें चालतो. जन्मामुळें जो आकार येतो तो फार तर मृत्यूमुळें नाहींसा होतो. हा आकार मायाच उत्पन्न करते—जसें वाऱ्यानें पाण्यावर तरंग उठवावे. संत साधु तप करितात ते देहाकरिता नाहीं, तर आत्म्याकरिता. योग्यांची बुद्धि आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होताच तद्रूप होते

मनुष्याला स्वधर्म टाकता येत नाहीं. शिवाय स्वधर्मानें वागलें तर सर्व इच्छा पुऱ्या होतात, अपाय होत नाहींत. उजेडात सरळ रस्त्यानें चाललें तर ठेंच कशी लागेल?

तात्पर्य, हें युद्ध क्रमप्राप्त आहे, इतकेंच नव्हे तर तोंड उघडल्याबरोबर त्यात अमृत पडावें तसें अनायासें तें आज प्राप्त झालें आहे. तें टाळशील तर लोक तुला नावें ठेवतील. प्रेताला गिधाडें तोडतात तीच गत स्वधर्म सोडणाऱ्या मनुष्याची होते. तू दयेमुळें परत फिरशील, पण तुझे शत्रू त्याचा अर्थ उलट करतील. तुझी सत्कीर्ति नाश पावेल. पर्वत वज्राला किंवा सर्प गरुडाला भितो त्याप्रमाणें हे कौरव आजवर तुला भ्याले. पण तू पाठ फिरविलीस कीं तेच तुला पकडतील. म्हणून युद्ध कर. जिंकलेस तर राज्य मिळेल, मेलास तर स्वर्ग मिळेल. म श युद्ध करशील तें स्वधर्म म्हणून कर सकाम नको, फलाच्या आशेनें नको. ज्ञानमार्ग म्हणतात तो हाच.

याचाच एक पर्याय कर्मयोग हा आहे. कारण कर्मयोगामध्येंहि निष्कामता असते, त्यात फलाची इच्छा टाकून दिलेली असते. नि स्वार्थी बुद्धि त्रिगुणापासून शुद्ध राहते. मांत्रिकाला भुतें बाधत नाहींत त्याप्रमाणें शुद्ध बुद्धीच्या मनुष्याला संसाराचें भय बाधत नाहीं. सद्बुद्धीचा महिमा तिच्या दुर्लभतेमुळें फार आहे, जसें परीस किंवा अमृत हीं दुर्मिळ असतात वेदवचनाप्रमाणें चालणारेही लोक कर्मफलाच्या लोभापासून मुक्त नसतात. यज्ञ का करावयाचा? तर स्वर्गसुख मिळावें म्हणून! पण कापराची रास करून पेटविली तर मुळात काय राहील? किंवा अमृताचा हडा लाथेनें पालथा केला तर काय लाभ? फलाशा धरून केलेल्या वैदिक कर्मांची तीच गत होय एखाद्या स्त्रीनें सुंदर पक्वान्न करावें पण तें द्रव्याच्या आशेनें विकावें, मग त्या पक्वान्नाची गोडी तिला काय मिळणार? तसेंच स्वर्गसुखाकरिता यज्ञादि केले म्हणजे हातचा धर्म मात्र आचरूनहि दवडला जातो. म्हणून वेदापेक्षा उपनिषदातला धर्म अधिक घेण्यासारखा.

वेदामध्यें अनेक प्रकारचे विधिनिषेध सांगितलेले असतात, पण त्यातले आपल्याला हितकर तेवढेच घ्यावे. सूर्य उगवला म्हणजे प्रवाशाला अनेक रस्ते दिसू लागतात, पण त्यातला हवा तोच एक तो घेतो. किंवा पृथ्वीवर इतकें तितकें पाणी असलें तरी मनुष्य त्यातलें आपल्या गरजेपुरतेंच घतो तात्पर्य,

कर्म टाकू नये. कर्म करावें पण फलाशा ठेवू नये हाच सदाचार व कर्मयोग. कर्म चांगलें झालें तरी संतोष मानू नये. उलट अर्धवट किंवा वाईट झालें तरी असंतुष्ट होऊ नये. अपूर्ण कर्म देखील ईश्वराला अर्पण केलें तर तें पुरेंच झालें नव्हे काय ? कर्माची पूर्णता—अपूर्णता हा हेतु नाहीं. ईश्वरसमर्पण हाच हेतु असावा खरा अशा प्रकारच्या कर्मयोगात मन व बुद्धि याचा विरोध नसतो. (१) निष्काम कर्माचरण म्हणजे बुद्धियोग, आणि (२) अहंकारयुक्त सकाम कर्माचरण—यापैकीं दुसरें फमी प्रतीचें होय. मान त्यातूनच गेल्यानें पुढेंपुढें पहिलें हातून होऊ लागतें. सकाम कर्मातून कर्तेपणाचा अहंकार आणि फलाशा हीं काढून टाकलीं म्हणजे उरते ती सहजस्थिति किंवा योगस्थिति होय. बुद्धियोगानेंच आनंद व अढळपद हीं मिळतात तीं मिळाल्यावर पुन्हा ज्ञानाची उजळणी करावी लागत नाहीं, किंवा नवें ज्ञान मिळवावें लागत नाहीं. समाधि-सुखात मग्न झालेला हाच स्थितप्रज्ञ होय त्याच्या मनातून काम हा सर्वस्वीं गेलेला असतो व केवळ तृप्ति उरते. दुःखानें तो खिन्न होत नाहीं. उपाधि सुटल्यानें, भेदरहित झाल्यानें, त्याची बुद्धि स्थिर होते. त्याच्यामध्यें समता, सद्यता या उदय पावतात. कासवाच्या पायाप्रमाणें त्याला आपलीं इंद्रियें ताब्यात घेता येतात. आणि हें करणें अवश्य आहे. कारण, झाडाची पालवी खुडल्यानें झाड मरत नाहीं तर त्याच्या मुळात घालण्याचें पाणी तोडल्यानेंच तें मरतें इंद्रियविषयापैकीं जिभेच्या विषयाचा त्याग करणें सर्वांत कठीण पण शेवटीं रसनेचाहि निग्रह करिता येतो. साधकाला ऋद्धिसिद्धि प्राप्त होतात पण मानिकानें जशी सावधगिरीन इटळ दूर टेविली पाहिजे, त्याप्रमाणें यम-नियमाचा अभ्यास करून इंद्रियांचा वर्चस्व प्रमाथी हाऊ देता कामा नये. इंद्रिय-दमन करणारा हाच योगनिष्ठेला अधिकारी होतो. कर्मयोगी होऊ पाहाणारास विषयानें सूक्ष्महि संस्कार मनावर घडू देऊ नयेत. काम म्हणजे इच्छा तिच्या मागून क्रोध आलाच. क्रोधामागून मोह त्यामुळें बुद्धि व्याकुळ होते व उन्मादाप्रमाणें ती सैरावैरा धावू लागते लाकडाला एकदा ठिणगी लागली कीं पुढें भडका होणारच. म्हणून चुकूनहि व थोडेंहि विषयचिंतन होऊ देऊ नये. रागद्वेष नष्ट झाले म्हणजे मग इंद्रियांना विषयांना स्पर्श झाला तरी तो बाधत नाहीं. सूर्यकिरण हे सर्व वस्तूंना स्पर्श करितात, तरी त्यामुळें सूर्य दूषित होत नाहीं. निवाऱ्याच्या ठिकाणीं दिवा असला तर त्याची ज्योत हालत नाहीं. उलट निग्रहाचा बन्धनाहि नसलेलें मन शांत कसें राहाणार ? पण ही

सावधगिरी करेपर्यंत ठेवावी लागते. कारण वादळानें नाव बुडते ती केवळ नदीच्या पात्रांतच नाहीं, तर तीराला येऊन लागल्यावरहि तेथें बुडूं शकते. यशस्वी कर्मयोगी हा मात्र समुद्रासारखा शांत असतो. समुद्र पावसाळ्यांत फुगत नाहीं, उन्हाळ्यांत तो कृश होत नाहीं. कर्मयोग्यापुढें ऋद्धिसिद्धींचें कांहीं चालत नाहीं. आत्मसुखाचा अनुभव आला कीं मग इतर सर्व त्याला तुच्छ वाटूं लागतें. इंद्रभुवनांत राहणारा मनुष्य भिल्लाची खोपटी तुच्छ मानीत नाहीं काय ? अमृताचा लाभ झाल्यावर कांजीला कोण हात लावील " !

पण हें विवेचन अर्जुनाला आपल्या पथ्यावर पडल्यासारखें वाटलें. कारण त्या विवेचनांतून कर्माला गौणताच निष्पन्न होतेसें दिसतें. आणि कर्म नको तर मग युद्ध तरी कशाला ?

---

## ( २ ऱ्या अध्यायांतील निवडक वचनें )

१ तूं शूरवृत्तीचा ठावो । क्षत्रियांमाजि रावो
तुझिया लाठेपणाचा आवो । तिहीं लोकीं

२ सिंहासि झोंबे कोल्हा । ऐसा अपाड आथि कें जाहाला

३ हे आतांचि काय सोयरे । जाहले तुज
हृदयाचें ढिलेपण। हें संग्रामीं पतन जाण । क्षत्रियांसी

४ हे झुंझ नव्हे प्रमाद । एथ प्रवर्तल्या दिसतसे बाध

५ जेथींचिया कृपा लाहिजे वर । तेथेंचि मनें व्यभिचार

६ हें अपार जें गगन । वरी तयाही होईल मान
परी अगाध मलें गहन । हृदय याचें

७ आम्हां काय उचित । तें पाहतां न स्फुरे येथ
जे मोहें येणें चित्त । व्याकुळ माझें

८ तरी उचित काय आम्हां । जें व्यभिचरेना धर्मा
तें झडकरी पुरुषोत्तमा । सांग आतां

९ हें सकळ कुळ देखोनी । जो शोक उपनलासे मनीं
तो तुझिया वाक्यावाचुनी । न जाय आणिकें

१० ना तरी आयुष्य पुरलें आहे । तरी औषधें कांहीं नोहे
एथ एकचि उपेगा जाये । परमामृत

११ तेथ सुदर्शनाची द्युती । तेची विद्युल्लता झळकती

१२ जैसा महातें पचाक्षरी । अनुमानी का

१३ जैसें मातेच्या कोपीं थोकलें । स्नेह आथी

१४ तू जाणता तरी म्हणविसी । परी नेणिवेतें न सांडिसी
आणि शिकवू म्हणों तरी बोल्सी । बहुसाल नीति

१५ अनादिसिद्ध हें आघवें । होत जात स्वभावें

१६ तैसीं चैतन्याच्या ठायीं । इथें शरीरातरें होती जाती पाहीं

१७ जया विषयाच्या ठायीं । एकनिष्ठता कहीं नाहीं
तेथ दु:ख आणि कांहीं । सुखही दिसे

१८ मृदु आणि कठिण । हे स्पर्शाचे दोन्ही गुण
जे वपूचेनि सगें कारण । सतोषखेदा
भ्यासुर आणि सुरेख । हें रूपाचें स्वरूप देख
जें उपजवी सुखदु:ख । नेत्रद्वारें

१९ तैसाचि द्विविध रस । उपजवी प्रीतित्रास
म्हणूनि हा अपभ्रश । विषयसग

२० तैसें विचारिता निरसलें । तें प्रपचु सहजें सांडवलें
मग तत्त्वता तत्त्व उरलें । ज्ञानियासी

२१ हर्में हाणितलिया छाया । जैसी आगीं न रुपे

२२ ध्यान याचिये भेटी । उत्कठा वाहे

२३ जे आदि स्थिति अत । हा निरतर असे नित्य
जैसा प्रवाह अनुस्यूत । गगाजळाचा

२४ उपजे तें नाशे । नाशिलें पुनरपि दिसे
हें घटिकायंत्र तैसें । परिभ्रमे गा
नातरी उदोअस्त अपैसे । अखंडित होत जात जैसे
हें जन्ममरण तैसें । अनिवार जगीं

२५ तैसें सकळ हें मूर्त । जाण पां मायाकारित
जैसें आकाशीं विघत । अभ्रपटळ

२६ तें विश्वात्मक तू पाहीं । चैतन्य एक
इयाचेनि स्वभावें । हें होत जात आघवें

२७ वायाचि व्याकुळकार्यी । आपुला निजधर्म पाहीं
जो आचरिता बाध नाहीं । कवणे काळीं

२८ तयापरी पार्था । स्वधर्मे राहाटतां
सकळ कामपूर्णता । सहजें होय

२९ क्षत्रियें बहुत पुण्य कीजे । तै जुझ ऐसें लाहिजे

३० पूर्वजांचें जोडलें । आपणचि होय धाडिलें

३१ म्हणोनि स्वधर्म हा साडशील । तरी पापा वरपडा होसील

३२ जाणतेनि तवचि जिवावें । जव अपकीर्ति आगा न पवे

३३ लोक सायासेंकरूनि बहुतें । वेंचिती आपुलीं जीवितें
परी वाढविती कीर्तीतें । धनुर्धरा

३४ दिगंतींचे भूपति । भाट होऊनि वाखाणिती

३५ तें अगावणपण जाईल । मग हीनत्व अंगा येईल

३६ नातरी रणीं एथ । झुझतां वेंचलें जीवित
तरी स्वर्गसुख अनकळित । पावसील

३७ अमृतें तरीची मरिजे । जरी विषेसीं सेविजे
तैसा स्वधर्मी दोष पाविजे । हेतुकपणें

३८ सुखीं संतोषा न यावें । दु खीं विषादा न मज्रावें

३९ जैसें वज्रकवच लेइजे । मग शस्त्राचा वर्षाव साहिजे
परी जैतेंसी उरिजे । अचुंबित

४० जैसी दीपकळिका धाकुटी । परी बहु तेजातें प्रगटी
तैसी सद्बुद्धि हे थेंकुटी । म्हणों नये

४१ तैसी दुर्लभ सद्बुद्धि । जिये परमात्माचि अवधि
देखें कामनाअभिभूत । होऊनि कर्म आचरत
ते केवळ भोगीं चित्त । देऊनिया

४२ जैसी रायवर्णी रससोय निकी । करूनिया मोलें विकी
तैसा भोगासाठीं अविवेकी । घाडिती धर्म

४३ जरी वेदें बहुत बोलिलें । विविध भेद सूचिले
तऱ्ही आपण हित आपुलें । तेंचि घेपे

४४ जैसा प्रगटलिया गभस्ती । अशेषही मार्ग दिसती
तरी तेतुलेही काय चालिजती । सांग मज

४५ परी कर्मफळीं आस न करावी । आणि अकर्मिं संगती न व्हावी

४६ आचरता सिद्धी गेलें । तरी काजाचि कीर आलें
परी ठेल्याही सगुण जाहलें । ऐसेंचि मानी

४७ अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाण योगाचें
जेथें मन आणि बुद्धीचें । ऐक्य आथि

४८ तो कर्मी तरी वर्तती । परी कर्मफळा नातळती

४९ म्हणे अर्जुना परियेसी । जो हा अभिलाष प्रौढ मानसीं
तो अंतराय स्वसुखेंसीं । करीत असे

५० जो सर्वत्र सदा सरिसा । परिपूर्ण चंद्र का जैसा ,
अधमोत्तम प्रकाशा । माजि न म्हणे
ऐसी अनवच्छिन्न समता । भूतमात्रीं सदयता
आणि पालट नाहीं चित्ता । कवणे वेळ

५१ जैसी वरिवरी पाल्वी खुडिजे । आणि मुळीं उदक घालिजे
तरी कैसेनि नाश निपजे । तया वृक्षा

५२ जयातें अभ्यासाची धरटी । यमनियमाची ताटी
जे मनातें सदा मुठी । धरूनि आहाती

५३ जैसा का विषाचा लेश । घेतलिया होय बहुवस

५४ विषयाची शका घात करी अशेषा । विवेकजाता

५५ जैसें जात्यंध पळणी पावे । मग तें काकुळती सैरा धावे
तैसी बुद्धीसि होती भवे । धनुर्धरा

५६ चैतन्याच्या अर्थी । शरीरा दशा जैसी
तैसें पुरषा बुद्धिनाशीं । होय देखें

५७ इंद्रियार्थी उदासीन । आत्मरसेंचि निर्भिन्न
जो कामक्रोधविहीन । होऊनि असे

५८ जैसा निर्वातींचा दीप । सर्वथा नेणें कंप
तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूप । योगयुक्त

५८ जेथ शांतीचा जिव्हाळा नाहीं । तेथ सुख विसरोनि न
रिघे काहीं । पापियाच्या ठायीं मोक्ष न वसे

५९ म्हणोनि अयुक्तपण मनाचें । तेंचि सर्वस्व दु खाचें

६० तैसीं प्रासेंही पुरषें । इंद्रियें लाळिलीं जरी कौतुकें
तरी आक्रमिला जाण दु खें । सासारिकें

६१ तैसीं इंद्रियें अपैतीं होतीं । जयाचें म्हणितलें करिती
तयाची प्रज्ञा जाण स्थिती । पातली असे

६२ देखे ऋद्धि सिद्धि तयापरी । आली गेली से न करी
तोचि गुंतला असे अंतरीं । महासुखीं

६३ पार्था हें नवल पाहीं । जेथ स्वर्गसुखा लेखणी नाहीं
तेथ ऋद्धिसिद्धि कायी । प्राकृता होती

६४ तो अहंकारातें दवडूनी । सकळ काम सांडुनी
विचरे विश्व होऊनी । विश्वामाजी

## अध्याय तिसरा

अर्जुन म्हणाला—कर्म आणि कर्ता हें उरू न दिलें तर युद्ध कोठें उरतें ? कृष्णा, खरोखर तुझ्या भाषणानें गोंधळच उत्पन्न केला. आंधळ्याला आड मार्गांत घालावें तशी तुझ्या या विवेचनाची फलश्रुति दिसते. पण मला बनविण्याचा तर तुझा विचार नाहीं ? मी मतिमंद पाहून मुद्दाम सोपें अवघड करून सांगतोस कीं काय ? मी अमृताचा समुद्र पाहून त्याच्या काठाशीं आलों, पण माझी तळमळ तशीच राहू पाहाते.

तेव्हां श्रीकृष्ण म्हणाला—अरे, मी निष्काम कर्मयोग सांगत असतांना मध्येंच सहज ज्ञानयोग सांगितला इतकेंच. अन्नाच्या स्थिती दोन तयार करण्याची व तयार झाल्याची. दोन्ही प्रकारच्या अन्नाच्या जेवणात शेवटीं सारखीच तृप्ति असते. कर्मयोग व ज्ञानयोग हीं दोन साधनें खरीं, पण त्याचें साध्य एकच आहे फरक हा कीं, त्या साधनाचा उपयोग करणाराची योग्यता कमीअधिक असणें शक्य असतें या योग्यताभेदाचें उदाहरण हें कीं, पक्षी थेट जाऊन उंच फळावर एकदम झडप घालू शकतो, पण मनुष्याला झाडावर चढून एका फांदीवरून दुसरीवर, दुसरीवरून तिसरीवर, चढून जावें लागतें. ज्ञानयोगी हे या पक्षासारखे होत, पण कर्मयोगी हा त्या मनुष्यासारखा ठरतो. कारण त्याला कांहीं कांहीं आचार पाळावे लागतात, यामुळें पूर्णतेचें फळ पदरात पडण्याला त्याला विलंब लागतो व साधनाचा तर क्रम असतो ! नदी पार होणाराला नावेंत बसून हळूहळू जाऊनच तीर गाठावें लागतें ना ?

जोंपर्यंत निरिच्छता लाभली नाहीं तोंपर्यंत कर्म राहाणारच. निष्कर्म होण्याची इच्छा ठीक, पण विहित कर्में टाकणें मात्र अयोग्य इच्छेनें कर्म केलें म्हणून तें घडत नाहीं आणि सोडल्यानें तें सुटत नाहीं शरीराबरोबर कर्म आलेंच. कारण शरीर हें त्रिगुणांच्या आधीन आहे इंद्रियांचें नित्य कर्म चालूच राहाणार. शरीराच्या आश्रयानें असणारांना कर्मत्याग शक्य नाहीं. कर्म हें परतंत्र असतें. आपण रथावर बसलों आणि रथ आपल्या स्वाधीन असला, तरी रथाच्या हालचालीमुळे आपणाला प्रवास घडतोच. शरीराचा त्याग नाहीं तोंपर्यंत कर्माचाहि त्याग नाहीं कर्म टाकणारे हे कर्मेंद्रिय प्रवृत्तीचा निरोध करून ती गोष्ट, म्हणजे कर्मत्याग, घडवून आणू पाहातात. पण त्यात परिश्रम आलेच

आणि व्यर्थ डौल मात्र दिसला. म्हणून बाहेरून तरी लोकांप्रमाणें कर्मव्यवहार करीत असावें, आणि अंतरगांत मात्र निश्चल व परमात्मस्वरूपांत गढून जावें. कमलाप्रमाणें पाण्यांत राहावें पण अंग भिजूं देऊं नये. इतर चार लोकांसारखेंच कर्मयोग्यानें दिसावें. विहित कर्म टाकून कर्मातीत होतांच येत नाहीं. म्हणून शास्त्रोपदिष्ट कर्म करावें. शास्त्रोक्त स्वधर्माचरणानेंच मोक्ष मिळतो. स्वधर्माचरण हेंच नित्य यज्ञयाजन होय. तो स्वधर्म आचरीत जात असतां पाप लागत नाहीं. पण स्वधर्माचरण सुटलें म्हणजे मात्र दुष्कर्माकडे प्रवृत्ति होते. ईश्वरानें भूतें उत्पन्न करितांना त्यांना आधार म्हणूनच प्रथम वर्णानुसार कर्म व स्वधर्म सांगितला. आणि स्वधर्माचरण केलें म्हणजे मग व्रत, नियम, योगसाधन, तीर्थयात्रा, मंत्रतंत्र हीं नकोत. इतर देवतांचें भजन पूजन नको. स्वधर्मच कामधेनूप्रमाणें सर्व मनोरथ पूर्ण करितो.

धयाचा असतो म्हणूनहि कर्म अवश्य. स्वतः मी परमेश्वर असूनहि आपलें कर्म करितोंच ना ! पाहाणाराला वाटेल कीं मीहि जसा काहीं एखादा फलार्थी पुरुषच आहें पण माझा खरा हेतु प्राणिसमूहाला मार्ग दाखवून त्यावर नीट ठेवावें हा असतो. मी मनात आणलें तर मला स्वस्वरूपात निमग्न होऊन राहता येईलच कीं नाहीं ! परतु मी करितों तें लोकाकरिता. समर्थ व ज्ञानी लोकानींहि परोपकारबुद्धीनें असेंच करावें. कर्म करण्यात माणसाची उत्सुकता तर अशी दिसावी कीं, कोणाला वाटेल कीं हा तें कर्म फलाशेनें करितो पण वस्तुत. मात्र तसें नसावें. अज्ञानी लोकाना नैष्कर्म्याचा उपदेश करूच नये. त्यांच्या जवळ सत्कर्माची स्तुति करावी व त्याना तें प्रत्यक्ष करूनहि दाखवावें. मात्र त्याला गूढ तत्त्वज्ञान सागू नये. कारण तें त्याला समजणार नाहीं. या सर्वोविषयीं सूर्याचें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवावें. कर्तव्यबुद्धीनें कर्म करणें वेगळें आणि अहकारबुद्धीनें त्यातच बद्ध होणें वेगळें. ही बद्धता अभिमानानें येते. आता मूर्खांना ही गोष्ट पटत नाहीं. प्रेताहातीं रत्न दिल्यासारखी त्या उपदेशाची अवस्था होत हें वेगळें. पण मुख्य मर्म आहे तें हें कीं, कौतुकानेंहि इद्रियाचे लाड करू नयेत. कारण कौतुकानें म्हणून कोणी सापाबरोबर खेळला, वाघाची सगत केली, विष पिऊन पाहिलें, तर काय होईल ! आगीशीं कधीं तरी खेळावें काय ? केवळ स्वतःच्या देहाचें पोषण करणें हा उघड उघड आत्मघात ठरतो. सभ्य दिसणारे चोर बरोबर येऊन सोबत करितात असें प्रथम दिसतें, परतु गावाची शीव ओलाडून गेलात कीं तें घाला घालणारच. माशाला आमिष दिसतें पण गळ दिसत नाहीं तसेंच विषयलालसेचें आहे त्यानें स्वधर्माचा जिव्हाळा नासतो. केव्हाहि स्वधर्माचरण हेंच श्रेयस्कर एखादा परधर्म मोहक दिसेल, पण लोकाचें घर सुदर दिसलें म्हणून आपली सत्तेची गवताची झोंपडी मोडून टाकावी काय ? दुसऱ्याची स्त्री सुदर दिसली तरी आपल्या धर्मपत्नीबरोबर ससार करणें हेंच योग्य नव्हे काय ! दुसऱ्याचा धर्म त्याचा त्याला विहित असेल, पण त्याचें आपणाला काय ! स्वधर्म हा, त्यांत प्राण खर्ची पडले तरी, इहपरलोकदृष्टीनें पाळणेंच युक्त. "

अर्जुन म्हणाला—'हें सर्व खरें तर ज्ञानी देखील कित्येक वेळा स्वधर्म सोडून भलत्या वाटेनें गेलेले का दिसतात ! म्हणजे इकडे पाप चुकविण्याकरितां म्हणून पुण्य समजून भलतेंच का करितात ? तें पापच येऊन त्याना चिकटतें असें का व्हावें !"

श्रीकृष्ण म्हणाला—हें सर्व कामक्रोधाच्या वरपगडा न टळल्यामुळें होतें. ज्ञानाच्या ठेव्यावरील सर्प, किंवा विषयरूप दरीमध्यें राहणारे वाघ, किंवा भजनरूप मार्गावरील वाटमारे मांग, किंवा मार्गावरील दगड, किंवा गाव आत डाघून ठेवणारें गावगुंड, असे हे कामक्रोध आहेत. अविचेनें ते उत्पन्न होतात. आणि ते जीविताचे शत्रु ठरतात. तथापि मृत्युलोकात त्याची फार चहा होते. ही अविद्या म्हणजे भ्रांति, तीच तृष्णेला जागविते. तसान दंभ, त्यालादि कामक्रोधार्नी प्रसिद्धीला आणला व त्यार्नीच शातीला भागविली. आणि तिच्या वस्त्रभूषणार्नी मायारूप मागीण सजविली. त्यार्नीच हृदयात विविध तापाचे निखारे पसरवून संतोष व आनंद नाहींसे केले. हे कामक्रोध जीवाल्याला चिकटून राहातात म्हणून आवरत नाहींत. पहावें तर त्याच्या हार्ती शस्त्र नाहीं, मग त्यार्नी कसें मारावें ? पण मारतात खरे. किंवा त्याच्या हार्ती दोर नाहींत असें असता ते ज्ञानी लोकाचीहि मान एखादे वेळ हटकून मुरगळतात. शुद्ध उपाधिरहित ज्ञान, म्हणजे कामक्रोधापासून अलिप्त ज्ञान, असें हुडकू गेलें तरी सहसा सापडत नाहीं, काय करावें ? म्हणून कोंडा—टरफल प्रयत्न करून काढून टाकावें तेंव्हाच बीज हार्ती येतें, त्याप्रमाणें या कामक्रोधाना जिंकावें तेंव्हाच ज्ञानाच्या प्राप्तीची इच्छा करावी. आणि मन स्थिर करून बुद्धि मोकळी करणें हा याला उपाय होय. कामक्रोध गेले म्हणजे ब्रह्मप्राप्तिरूप स्वराज्य दूर नाहीं.

---

## ( ३ ऱ्या अध्यायांतील निवडक वचनें )

१ आता संपलें म्हणों पा आघवें । विवेकाचें
२ जैसें आरुळें सुइजे अव्हाटा । का माजवण दीजे मर्कटा
३ मी आधींचि काहीं नेणें । वरी कवळिलों मोहें येणें
४ आम्हीं तनुमनजीवें । तुझिया बोला वोटंगावें
आणि तुवाचि ऐसें करावें । तरी सरलें म्हणों

५ नातरी झकरीत आहासी मातें । कीं तत्त्वचि कथिसी ध्वनितें
हें अवगमिता निरुतें । जाणवेना
म्हणोनि आइकें देवा । हा भावार्थ आता न बोलावा
मज विवेक सांगावा । मऱ्हाटा जी
तैसें सकळार्थभरित । तत्त्व सांगावें उचित
परी बोधे माझें चित्त । जयापरी

६ देखें सकळार्तांचें जियालें । आजी पुण्य यशासि आलें
हे मनोरथ जाहले । विजयी माझे

७ हे मार्ग तरी दोन्ही । परी एकवटती निदानीं
जैसी सिद्धसाध्यभोजनीं । तृप्ति एक
तैसीं दोन्हीही मतें । सूचिती एका कारणातें
परी उपास्ति ते योग्यते । अधीन असे

८ जंव निरार्तता नाहीं । तंव व्यापार असे पाहीं

९ म्हणोनि आइकें पार्था । जया नैष्कर्म्यपदीं आस्था
तया उचित कर्म सर्वथा । त्याज्य नोहे

१० तरी स्वभाव काय निमाले । इंद्रियांचे ?
देखें रथीं आरूढिजे । मग जरी निश्चळ बैसिजे
तरी चळ होऊनि हिंडिजे । परतंत्रा

११ म्हणउनि संग जंव प्रकृतीचा तंव त्याग न घडे कर्माचा
ऐसियाहि करूं म्हणती तयांचा । आग्रहचि उरे

१२ कामनामात्रें न घेपे । मोहमळें न लिंपे
जैसें जळीं जळें न शिंपे । पद्मपत्र

१३ मानसा नियम करीं । निश्चळ होयें अंतरीं
मग कर्मेंद्रियें व्यापारीं । वर्ततु सुखें

१४ देखें अनुक्रमाधारें । स्वधर्म जो आचरे
तो मोक्ष तेणें व्यापारें । निश्चित पावे
स्वधर्म जो बापा । तोचि नित्ययज्ञ जाण पा

१५ तुम्हीं स्वधर्मयज्ञीं यजावें । अनायासें

१६ तुम्ही देवातें भजाल । देव तुम्हा तुष्टतील
ऐसी परस्परें घडेल । प्रीति जेथ

१७ तेथ तुम्ही जें करूं म्हणाल । तें आपैसें सिद्धी जाईल
वांछितही पुरेल । मानसींचें

१८ जैसे ऋतुपतीचें द्वार । वनश्री निरंतर
वोळगे फळभार । लावण्येंसी
ऐसे समस्त भोगभरित । होआल तुम्ही अनार्ते
जरी स्वधर्मैकनिरत । वर्ताल बापा

१९ तैसा स्वधर्म जरी लोपला । तरी सर्व सुखाचा थारा मोडला

२० तैसी निजवृत्ति जेथ सांडे । । तेथ स्वतंत्रते वस्ती न घडे
म्हणऊनि निजवृत्ति हे न सांडावी । इंद्रियें बाळों नेदावीं
देखा विहित क्रियाविधि । निर्हेतुका बुद्धि

२१ म्हणोनि स्वधर्में जें अर्जे । तें स्वधर्मेंचि विनियोगिजे
मग उरे तें भोगिजे । संतोषेंसीं

२२ हें संपत्तिजात आघवें । हवनद्रव्य मानावें
मग स्वधर्मयज्ञें अर्पावें । आदिपुरुषीं

२३ हां गा शरीर जरी जाहलें । तरी कर्तव्य वोघें आलें
मग उचित कां आपलें । वोसंडावें

२४ परिसपा सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची
खंती करिती कर्मांची । ते गावंढे गा

२५ जैं तो आत्मबोधें तोषला । तरी कृतकार्य देख जाहला

२६ तृप्ति जालिया जैसीं । साधनें सरती आपैसीं
देखें आत्मतुष्टी तैसीं । कर्मे नाहीं

२७ देखें प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले
तयाही कर्तव्य असे उरलें । लोकालागीं

२८ एथ वडील जें जें करिती । तया नाम धर्म ठेविती
तोंचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ

२९ देखें फळाचिया आशा । आचरे कामुक जैसा
कर्मी भर होआवा तैसा । निराशाही

३० मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरें लावावें
अलौकिक नोहावें । लोकाप्रति

३१ देखें पुढिलाचें वोझें । जरी आपुला माथा घेइजे
तरी सांगें का न दाटिजे

३२ तरी उचितें कर्मे आघवीं । तुवां आचरोनि मज अर्पावीं
परी चित्तवृत्ति विन्यसावी । आत्मरूपीं

३३ तुवां शरीरपरा नोहावें । कामनाजात सांडावें
मग अवसरोचित भोगावे । भोग सकळ

३४ जगीं कीर्ति रूढवीं । स्वधर्माचा मान वाढवीं
इया भारापासोनि सोडवीं । मेदिनी हे

३५ म्हणोनि इंद्रियें एकें । जाणतेनि पुरुखें
लाळावींना कौतुकें । आदिकरूनी

३६ म्हणूनि केवळ देहमरण । ते जाणें उघडी नागवण

३७ देखें इंद्रियीं काम असे । तो लावी सुखदुःखें

३८ अगा स्वधर्म हा आपुला । जरी का कठिण जाहला
तरी हाचि अनुष्ठिला । भला देखें

३९ येरु आचार जो परावा । तो देखता कीर बरवा
 परी आचरतेनि आचरावा । आपुलाचि

४० तरी लोकांचीं धवळारें । देखोनिया मनोहरें
 असतीं आपणीं तणारें । मोडावीं केवीं

४१ हें असो वनिता आपुली । कुरूप जरी जाहली
 तऱ्ही भोगिता तेचि भली

४२ म्हणोनि आणिकांसी जें विहित । आणि आपणपेया अनुचित
 तें नाचरावें जरी हित । विचारिजे

४३ तरी हे काम क्रोध पाहीं । जयातें कृपेची साठवण नाहीं

४४ जयासी मुकेलिया आमिषा । हें विश्व न पुरेचि घासा
 कुळवाडी याचि आशा । चाळीत असे

४५ जे लोकत्रयाचें भातुकें । खेळताचि खाय कवतिकें
 तिच्या दासीपणाचेनि बिकें । तृष्णा जिये

४६ साध्वी शांति नागविली । मग माया मांगी शृंगारिली
 तियेकरवीं विटाळविली । साधुवृंदें

४७ इहीं संतोषवन खांडिलें । धैर्यदुर्ग पाडिले
 आनंदरोप सांडिलें । उपडूनिया

४८ हे चैतन्याचे शेजारीं । वसती ज्ञानाच्या एकाहारीं
 म्हणोनि मवर्तती महामारी । सावरतीना

४९ मग मनाची वाव पारखेल । आणि बुद्धीची सोडवण होईल
 इतुकेनि थारा मोडेल । या पापियांचा

५० तैसे रागद्वेषी जरी निमाले । तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें

# अध्याय चवथा

सुस्वर, सुवास, सुगंध, सुरुचि या सगळ्याचा योग एकत्र यावा तसा हा गीतोपदेशप्रसंग आहे पण अर्जुनहि तसाच सुदैवी खरा. कारण असा उपदेश करण्याला त्याला श्रीकृष्ण लाभला.

श्रीकृष्ण म्हणाला – या निष्काम कर्मयोगाला फार जुनी परंपरा आहे तो काहीं आज नव्यानें कोणाला सुचलेला नाहीं पण अलीकडे झालें काय कीं, परंपरागत ज्ञानाचा विसर लोकांना पडला. बुद्धि आडमार्गाला निघाली. देहादि प्रपंच प्रिय वाटू लागला. तसें नसतें तर आज हा उपदेश तरी कशाला करायला हवा होता ? हा मोह इतका कसा वाढला तें कळत नाहीं पण त्यामुळें निष्काम कर्मयोग नष्टप्राय झाला इतकें मात्र खरें तथापि आता अर्जुना तुझ्यावर माझें प्रेम, तू माझा प्राण किंवा जीवनकला, म्हणून आज तो तुला सांगतों. आणि तोहि अशा युद्धाची गर्दी भोंवतीं असताना !

अर्जुन म्हणाला–देवा ठीकच आहे एखादी आई जर आंधळ्या मुलाला प्रसवली तर जन्मभर त्याचा त्रास तिलाच भोगावा लागणार म्हणून ती डोळस मुलाचीच इच्छा करित. तसेंच पांगळ्या मुलाविषयींहि. म्हणून मला ज्ञानाचा उपदेश करणें हें तुलाहि प्रशस्त आहे पण, देवा, एक सांग कीं, पूर्वयुगीं कर्मयोगाचा उपदेश ज्या तू केलास तोच तू आज मजजवळ आहेस याची संगति कशी लावायची ?

तेव्हा श्रीकृष्ण म्हणाला–ठीक ! जें तुला कळत नाहीं तें हेंच बघ. कारण अरे, तू काय मी काय त्या पूर्वयुगातहि होताचना ! आणि त्यानंतर आजवर मध्यंतरी मी कितीतरी जन्म घतले ? पण बाबा यात तुझा तरी दोष काय ! कारण या सर्वांचें मला स्मरण आहे तुला मात्र नाहीं पुन पुन जन्माला येणें हें मीच माझ्या मायेनें करणारा आहें आरशामुळें दोन रूपें दिसावीं तसें माझें मूलरूप निर्गुण असता, विशेष हेतूनें व कार्याकरिता, मी सगुण रूप घेतों तें या मायेच्या आरशात दिसतें आणि मला तरी हे जन्म पुन पुन का घ्यावे लागतात ? तर अधर्म बळावतो, त्याचा पराभव करून पुन पुन धर्माची स्थापना करावी लागते. म्हणून माझ्या पुनर्जन्मानें अधर्म नष्ट होतो. अज्ञान दूर होतें. दोषाचें सर्व सत्तासामर्थ्य नाहींसें होतें साधूंना फिरून मान येतो.

धर्म व नीति याची सगत पुळते. आणि सज्जनाच्या घरावर सुखाची ध्वजा फडकू लागते. सर्वत्र अविचाराची काजळी झाडली जाऊन विवेकदीप तेजस्वी होतो सात्त्विक भक्ताचा उत्कर्ष होतो.' या माझ्या कर्मात माझा काही अतस्य स्वार्थ असला तर तो इतकाच. हाच माझाहि कर्मयोग. मग ज्ञानी आत्मसतुष्ट भावनानिष्ठ व पवित्रतेचें माहेरघर असे जे असतात ते मद्रूप होतात, आणि इतर साधनोपाय टाकून देतात. उलट अशा माझ्या भक्तावर मीहि तसेंच प्रेम करितो. मनुष्याचा स्वाभाविक कल माझी भक्ति करण्याकडेच असतो. परतु भेदबुद्धि नष्ट न झाल्यामुळें इतर देव व देवी त्याला दिसू लागतात, आणि त्याचीच उपासना तो यथाविधी करू लागतो. आता हें चूक असलें तरी मी साक्षीभूत राहून त्याच्या सद्भावनेला अनुसरून त्याला इष्ट प्राप्ति करून देतोंच. अशाच दृष्टीनें मी गुणकर्मानुसार चातुर्वर्ण्य उत्पन्न केलें. पण मीं हें करणें अटळ किंवा अनिवार्य म्हणून मात्र केलें नाहीं, तर तें वरील कारणामुळें स्वेच्छेनें केलें. करणार काय? कारण ज्ञानी ज्ञानी म्हणविणाराना देखील काय करावें काय न करावें याचा भ्रम उत्पन्न होतो. आणि ते क्वचित् अवातर कर्माकडे वळतात. खोट्या नाण्यानें सत्याची भूल उत्पन्न करावी तसें हें होतें खरें. तोंडानें म्हणतात 'आम्ही कर्मातीत आहों' आणि भ्रमामुळें प्रत्यक्ष कर्माच्या पाशात सापडतात! यामुळें मूळ विश्व आकाराला आणणारा व त्याचें कर्म याला ते विसरतात. वर्णाश्रम कर्म, निषिद्ध कर्म, याची ओळख झाली म्हणजे कर्म सहजच होत असताहि त्यात मनुष्य गुतत नाहीं एरव्ही कर्मव्याप्ति फार गहन असल्यामुळें मनुष्य त्यात गुतून पडतो. फलाशा सोडून, मी कर्म करीतच नाहीं अशा बुद्धीनें कर्म करितो तो ज्ञानी होय आपणा स्वत चें किंवा सूर्याचें प्रतिबिंब पाण्यात पाहिलें असता पाण्यातले ते आम्ही नव्हे, आम्ही आपल्या ठिकाणीं वेगळेच आहों हें जसें मनुष्य जाणतो त्याप्रमाणें, आपणच कर्म करीत असता त्या-पासून आपण कोणी वेगळे आहों असें त्याला समजतें. नावेंतून जातांना किनाऱ्यावरची झाडें धावत आहेत असा भास होतो खरा, परतु विचार करून पाहिलें म्हणजे झाडें स्थिर आहेत व आपण मात्र धावतों आहों हें त्याला कळतें. असा मनुष्य हा मनुष्य असून नसतो विश्व न पाहाताच तें त्याला दिसतें. कांहीं न भोगताच तो भोग घेतो आपल्याच ठिकाणीं बसला तरी त्याला सर्वत्र सचाराचें फळ मिळतें. म्हणनेच ता विश्वरूप होतो. ज्ञानरूप

अग्नीनें ज्यानें कर्में जाळलीं तो मनुष्यरूपी ब्रह्मच होय आणि एकदा संतोषाच्या गाभाऱ्यात शिरुन तो आनद सेवू लागला म्हणजे पुरे म्हणतच नाहीं त्याचे सर्व व्यापार तद्रूपच असतात. त्याचें द्वैत गेले तो कर्म करीत असता कर्मरहित, आणि गुणयुक्त असताहि गुणातीत असतो आकाशात अकालीं उठलेल्या मेघाप्रमाणें त्याचीं सर्व विधियुक्तकर्में त्याच्याच ठिकाणीं लय पावतात. कर्म ब्रह्मच आहे असें वाटू लागलें म्हणजे कर्म हें नैष्कर्म्यच ठरतें. अविद्येची आहुति देऊन केलेल्या यज्ञाला दैवयज्ञ म्हणतात, व तो करणारा महायोगी जाणावा. ध्यानधारणा, सयम याच्या योगानें इंद्रियरूपी द्रव्यानीं यज्ञ करितात तेहि यज्ञानेंच यज्ञ करितात. कोणी वैराग्यानें यज्ञ करितात व त्यात कामक्रोधादि विकार जाळतात. कोणी हृदयाची ऐरणी करून व विवेकाचा मथा करून, तो घट्ट धरून व शांतीनें सात्त्विक धैर्यानें वरून दाबून, गुरुपदेशरूपी दोरानें ओढतात. त्यामुळें ज्ञानाग्नि प्रगट होतो. सयमाग्नींत हवन करून उरलेलें आत्मज्ञानाचें जें सुख त्याचेच पुरोडाश म्हणून सेवन करितात तात्पर्य, यज्ञाचे प्रकार वेगवेगळे पण फलश्रुति एकच. हे प्रकार म्हणजे द्रव्ययज्ञ, योगयज्ञ, वाग्यज्ञ, प्राणायाम यज्ञ, ज्ञानयज्ञ. पैकीं ज्ञानयज्ञ हाच सर्वांत कठीण. तथापि सर्वच यज्ञानीं मनाचा मळ धुऊन जातो. यामुळें अग्नि व यज्ञकर्ता हा भेद उरत नाहीं. इच्छा पूर्ण होतात, पण क्रिया मागें परतून नाहींशा होतात, व यज्ञ-विधान पुरें होतें ज्ञानरूप यज्ञात शिल्लक उरलेलें ज्ञानरूप ब्रह्म याचा उपभोग ब्रह्मनिष्ठ पुरुष घेतात. उलट ज्याना सयम नाहीं त्याचें ऐहिकहि नीट साधत नाहीं. त्याना विरक्तिहि लाभत नाहीं मग परलोक कोठून मिळणार! हें ज्ञान मिळण्याकरिता सताना शरण जावें, कारण ते ज्ञानाचें घरच होत आणि त्या घराचा उंबरा सतसेवा हीच होय. म्हणजे ती केल्यानेंच उंबरा वलाडून त्या ज्ञानगृहात प्रवेश करिता येतो. आणि त्याच्या उपदेशानें मन ज्ञानसपन्न होऊन पुन्हा सकल्पाकडे वळत नाहीं, व स्वत सह सर्व भूतें परमेश्वर-स्वरूपात दिसू लागतात. ज्ञानासारखें पवित्र असें दुसरें काहीं नाहीं त्यासारखें चैतन्य दुसरें नाहीं. ज्ञानाला उपमान नाहीं. ज्ञानाची योग्यता फक्त ज्ञानालाच. कर्मांचें कर्तेपण जो आपणाकडे घेत नाहीं व श्रद्धेच्या उपभोगानें जो सुखी झालेला असतो त्याच्याकडे ज्ञान आपण होऊन येतें. आणि ज्ञानातून शान्ति व आत्मज्ञान प्रगट होतात. मग त्याचा विस्तार अपार होतो. परतु असेहि काहीं लोक असतात कीं, ज्याना सशयानें ग्रासलेले असतें.

यामुळे त्यांचें जीवित हें ओसाड घराप्रमाणें किंवा प्राणरहित देहाप्रमाणें शून्यवत् होतें. ते विषयसुखानें रंगून जातात व ज्ञानाची पर्वा करीत नाहींत. अमृतहि गोड लागूं नये अशी त्यांची अवस्था होते. संशयापेक्षां दुसरें मोठें पातक नाहीं. तेंच विनाशानें जाळें ठरतें. संशयाचा नाश फक्त ज्ञानानेंच होतो.

---

## ( ४ थ्या अध्यायांतील निवडक वचनें )

१ जैसा पंचमालाप सुगंध । कीं परिमळ आणि सुस्वाद
भला जाहला विनोद । कथेचा इये

२ हा त्रैलोक्यपटाची घडी । आकाराची पैलथडी
कैसा याचिये आवडी । आवरला असे

३ अव्हांटलिया आस्थाबुद्धि । विषयसुखचि परमावधि
जीव तैसा उपाधि । आवडे लोकां

४ तैसी वैराग्याची शिंव न देखती । जे विवेकाची भाषा
नेणती । ते मूर्ख केवीं पावती । मज ईश्वरातें

५ तूं संसारश्रांताची साउली । अनाथ जीवांची माउली
आमुतें कीर प्रसवली । तुझीच कृपा

६ माझें अव्ययत्व तरी न नसे । परी होणें जाणें एक दिसे
तें प्रतिबिंबें मायावशें । माझ्याचि ठायीं

७ तें धर्मजात आघवें । युगायुगीं म्यां रक्षावें
ऐसा ओघ हा स्वभावें । आद्य असे

८ म्हणोनि अजत्व परतें ठेवीं । मी अव्यक्तपणहि नाठवीं
जे वेळीं धर्मातें अभिभवी । अधर्म हा

९ अधर्माची अवधी तोडीं । दोषांचीं लिहिलीं फाडीं
सज्जनाकरवीं गुढी । सुखाची उभवी
दैत्यांचीं कुळें नाशीं । साधूंचा मान गिंवशीं
धर्मासीं नीतीसीं । शेंस भरीं

१० स्वसुखें विश्व कोंदे । धर्मेचि जगीं नांदे
भक्तां निघती दोंदें । सात्त्विकांचीं
११ जे मद्भावा सहजें आले । मी तेचि ते होऊनि ठेले
जे मज तयां उरले । पदरें नाहीं
१२ तैसे यमनियमीं कडसले । जे तपोज्ञान चोखाळले
मी तेचि ते जाहले । एथ संशयो कासया
१३ जें सर्वत्र सदा सम । तेथ विभाग अधमोत्तम
मतिवश सम्रम । विवंचिती
१४ तैसा समस्तां या भजनां । मी साक्षीभूत पैं अर्जुना
एथ प्रतिफळे भावना । आपुलाली
१५ हें मजचिस्तव जाहालें । परी म्यां नाहीं केलें
ऐसें जेणें जाणितलें । तो सुटला गा
१६ तैसें नैष्कर्म्यतेचेनि भ्रमें । गिंवसिजत आहाती कर्में
जे दुजी सृष्टि मनोधर्मे । करूं सकती
१७ येन्हवीं जग हें कर्माधीन । ऐसियाची व्याप्ती गहन
१८ उदो अस्ताचेनिप्रमाणें । जैसें न चलतां सूर्याचें चालणें
तैसें नैष्कर्म्यतत्त्व जाणे । कर्मींचि असतां
१९ तो मनुष्यासारिखा तरी आवडे । परी मनुष्यत्व तया न घडे
२० तेणें न पाहतां विश्व देखिलें । न करितां सर्व केलें
न भोगितां भोगिलें । भोग्यजात
२१ जो शरीरीं उदास । फळभोगीं निरास
नित्यता उल्हास । होऊनि असे
म्हणोनि अवसरें जें जें पावे । तेणेंचि तो सुखावे
जया आपुलें आणि परावें । दोन्ही नाहीं
२२ तो देहसंगें तरि असे । परी चैतन्यासारिखा दिसे
म्हणऊनि ब्रह्म तेंचि कर्म ऐसें । बोधा आलें जया सम

२३ तया कर्तव्य तें नैष्कर्म्य
२४ देवास्तव देहाचें पाळण । जो चिंतीना देहभरण
तो महायोगी जाण । दैवयोगें
२५ या यज्ञक्रिया तरी आनानी । परी प्राप्य तें एक
२६ एकीं शब्दीं शब्द यजिजे । तो वाग्यज्ञ म्हणिजे
ज्ञानें ज्ञेय गमिजे । तो ज्ञानयज्ञ
२७ हें अर्जुना सकळ कुवाडें । जें अनुष्ठिता अतिसाकडें
परी जितेंद्रियासीचि घडे । योग्यतावशें
२८ जया अविद्याजात जाळिता । जें उरलें निजस्वभावता
जेथ अग्नि आणि होता । उरेचिना
२९ जया ऐहिक घड नाहीं । तयाचें परत्र पुससी काई
३० ते द्रव्यादियाग कीर होती । परी ज्ञानयज्ञाची सरी न पवती
जैसी तारातेजसंपत्ती । दिनकरापाशीं
३१ जेथ वैराग्याचा पाग फिटे । विवेकाचाही सोस तुटे
जेथ न पाहता सहज भेटे । आपणपें
तें गा ज्ञान पैं बरवें । जरी मनीं आथी जाणावें
तरी सतातें भजावें । सर्वस्वेंसी
३२ एथ ज्ञान हें उत्तम होये । आणिकही एक तैसें कें आहे
जैसें चैतन्य का नोहे । दुसरें गा
३३ हे ज्ञानाची पवित्रता । ज्ञानींचि आथि
३४ आत्मसुखाचिया गोडिया । विटे जो का सकळ विषया
जयाच्या ठायीं इंद्रिया । मान नाहीं
३५ जो मनासी चाड न सांगे । जो प्रकृतीचें केलें नेघे
जो श्रद्धेचेनि संभोगें । सुखिया जाहाला
३६ मग संशयीं जरी पडिला । तरी निभ्रांत जाणें नासला
तो ऐहिकपरत्रा मुकला । सुखासि गा

३७ म्हणुनि संशयाहूनि थोर । आणिक नाहीं पाप घोर
हा विनाशाची वागुर । प्राणियासी

३८ तरी तेणें ज्ञानखड्गें तिखटें । निखळ हा निवटे
मग नि शेष खता फिटे । मानसींचा

३९ जो शांतचि अभिनवेल । ते परियेसा म्हाटे बोल
जे समुद्राहूनि सखोल । अर्थभरित

४० बिंब बचकेंचि एवढें । प्रकाशासि त्रिभुवन थोकडें
शब्दाची व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी

४१ जेथ साहित्य आणि शांति । हे रेखा दिसे बोलती
जैसी लावण्यगुणकुळवती । आणि पतिव्रता

४२ रोग जाय दुधें साखरें । तरी निंब का पिआवा

## अध्याय पांचवा

अर्जुन म्हणाला—कृपा करून हें तत्त्वज्ञान मला संदिग्ध भाषेंत सांगू नका. असा सोपा सुखाचा कर्ममार्ग सांगा कीं, प्रवासांतील वाहनासारखा—म्हणजे वाट चालतांना ज्यांत सुखानें झोंप येते आणि मजल वाटचालहि पदरांत पडते."

तेव्हां श्रीकृष्ण म्हणाला—आहे, असेंहि वाहन आहे. तें म्हणजे निष्काम कर्मयोग त्यानें ( कर्म ) सन्यास फळ अनायासानें मिळतें. हा सन्यास म्हणजे मी व माझेंपण हीं विसरून जाणें. हें जो करील त्याचा संग सुटतो व त्याला शाश्वत सुख लाभतें. त्यांत विस्तव उरला नाहीं असा राखेचा ढेपसा कापसांतहि गुंडाळून ठेवतां येईल कीं ! कापसाचें वेष्टण असलें तरी आंत अग्नि नाहीं तर तें कसें पेटणार ! कल्पनारहित कर्मयोग हा कर्मसन्यासच होय. दोन्ही दिवेच. मग त्यांचा प्रकाश सारखा पडणारच. आकाश व पोकळी हीं दोनहि जशीं एकरूप, त्याप्रमाणेंच सांख्य ( ज्ञानयोग ) व कर्मयोग हीं एकरूपच आहेत. ज्याच्या हातून कर्मयोगाचरण होत नाहीं तो संन्यासाच्या छंदांत पडला तरी व्यर्थच. संकल्पविरहित मन हें लोकत्रय व्यापणारें चैतन्यच होय. ज्यानें आपलें मन असें केलें त्यानें सर्व कांहीं केलें तरी कांहींच न केल्याचें श्रेय त्याला मिळतें. कर्मफळावर दृष्टि गेली कीं तो खुंटाला बांधला गेलाच.

त्याच्या ठिकाणीं मी देह अशी आठवणच नसते त्याला कर्तेपणाचा अभिमान कसा होईल ! शरीराचा त्याग केल्याशिवायहि अव्यक्त परमात्म्याचे स्वभाव त्याला अनुभवता येतात. भ्रांति ही अंथरुणावरील झोंपेसारखी आहे. तींत मिळणारें सुख हें स्वप्नसुखासारखें असतें. जागें सुख ज्ञानाच्या जागृतींतच मिळतें. या ज्ञानदीपाच्या उजेडावर ज्ञानी हा आपले सर्व व्यवहार चालवितो.

कायिक व्यवहार हे अजाणता तान्ह्या मुलाच्या हालचालीसारखे होतात. झोंपेंत वासना वावरते ती देहाला जागें करीत नाहीं, तथापि सुखदुःखाचे भोग भोगविते. हें कर्म मानसिक होय. प्रयोजनावांचून होणारें सर्व कर्म हा इंद्रियांचा खेळ असतो. कर्मयोगी हा कर्म न करणाऱ्यापेक्षांही अधिक मुक्त दिसतो. कारण त्याच्यामध्यें बुद्धीपासून देहापर्यंत कोठेंही अहंकाराचें स्मरण नसतें. कर्मयोगी अहंकाराच्या सामुग्रीन उदासीनच राहातो. तो दृष्टि देईल

तिकडे सुखमय सृष्टि हाते, व तो सागेल तेथें महामोघ नादेल. सर्वेश्वरहि सहज स्थितीचा मग न होऊं देता, व अकर्तेपणा बिघडू न देता, महाभूताचे सर्व खेळ व पराक्रम करवितोच की नाहीं ? तरी पण जग हें झालें किंवा सरलें याची क्षिति त्याला नसते त्याच्या सगुण स्वरूपाला उद्देशून केलेलें त्याच्या कर्तृत्वाचें वर्णन हें शुद्ध अज्ञान होय बुद्धीच्या निश्चयानें आत्मज्ञान झालें म्हणजे जीव हा अशाच रीतीनें स्वत ला ब्रह्मरूप मानू लागतो त्याच स्थितीत तो सर्व अनुसधानेंहि समाळतो, आणि जो स्वत.ला ब्रह्मरूप मानतो तो तसाच सर्व जगालाहि मानतो. ज्ञानी लोक प्राणिमात्राचे ठिकाणीं भेदच मानीत नाहींत. भेदाची प्रतीति अहमाव नष्ट झाल्यामुळें नाहींशी होते.अज्ञान असेल तें लोकाच्या ठिकाणीं असतें. हें लौकिक अज्ञान कर्मयोगी हा टाकून देतो पण लौकिका सारखें वागतो. मृगजळानें पर्वत दकलला जात नाहीं त्याप्रमाणें विकार हे ज्ञानी माणसाला काहीं करू शकत नाहींत. ज्ञानी हा आत्मसुखांत स्थिर व दग असल्यामुळें बाहेर पाऊलच टाकीत नाहीं कारण विषयामध्यें त्याला सुखच वाटत नसतें. विषयात सुख मानणें हें अज्ञानी लोकानाच घडतें. भुकेलेला दरिद्री मनुष्य अन्नाच्या चवीनें कोंडा खातो ! डोक्यावर ढगाची सावली आली तरी ती टिकणारी नाहीं म्हणूनच लोक तिमजली घरें बाधतात. सापाच्या फणीखालीं सावली पडतेच, परतु उदराला ती शीतळ वाटत नाहीं. सुजलेल्या लक्षणात खरी शक्ति नाहीं तसेंच विषयामध्यें खरें सुख नाहीं. पण दु खात लोळणाऱ्याला सवयीनें दु ख हेंच जीवन वाटू लागतें. बेडूक किडे मासे हे पाण्यांतच जन्म काढतात की नाहीं ? पण विषयात सुख मानणारे अज्ञानी लोक जगात नसतील तर पापादिक दोषाना राहावयाला जागा कोठें मिळणार ? ब्रह्मसुख हें वेगळेपणानें भोगण्यासारखें नाहीं. दिसतें हें फळ आहे, तें खाणारा मी आहें, आणि मी तें खात आहें हें जसें पशूला वाटतें, तसें ज्ञानी पुरुषाला वाटत नाहीं. तो पाण्यात पाणी मिसळावें त्याप्रमाणें, किंवा आकाशात वायूचा लय व्हावा त्याप्रमाणें, सुखाशीं एकदम एकजीवच होता. असे लोक हेच सामरस्याचे अतीव पुतळे वाटतात किंवा महाबोधानें स्वत ला राहाण्याकरितां केलेलें मदिरच त्याना म्हणावें. विषयविन्मुख पुरुष स्वस्वरूपात लीन झाले म्हणजे मग पुन्हा वृत्तीवर येत नाहींत योगाच्या प्रक्रियेनें हें असें घडू शकतें. म्हणजे ज्या पडद्यावर ससाराचें चित्र उमटलें तो पडदाच

फाटून जातो. सरोवर आटलें म्हणजे त्यात पडणारें प्रतिबिंब आपोआप नाहींसें होतें तीच गोष्ट मनाचें मनपण गेल्यानें होते. स्वतः शरीरच ब्रह्म होतें. असे लोक निर्लेप होऊन प्रपंचाचें मारच घेतात, म्हणजे त्याची तुच्छता त्यांचे मनाला पटतेच, मग अर्थातच ते ब्रह्मरूप होतात. अशा रीतीनें योगमार्ग सांख्यमार्गाहून सोपा आहे. दुर्बळाना मात्र तो सिद्ध होण्याला कांहीं विलंब लागेल, तरी पण पोहून जाण्यापेक्षा पाय-उतारानें जाणें हा सोपा मार्गच बरा, मग त्यात विलंब लागला तरी चालेल.

---

## ( ५ व्या अध्यायांतील निवडक वचनें )

१ ऐसें व्यर्थ हें बोलता । नेणतयाच्या चित्ता उमज नोहे
२ एकें एकसारातें बोधिजे । तरी एकनिष्ठचि बोलिजे
जैसें निद्रेचें सुख न मोडे । आणि मार्ग तरी बहुसाल सांडे.
३ तरी जाणानेणा सकळां । हा कर्मयोग कीर प्रांजळा
जैसी नाव स्त्रियाबाळां । तोयतरणीं
४ येणें सन्यासफळ लाहिजे । अनायासें
५ आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण
पार्था तो सन्यासी जाण । निरंतर
६ इये कारणें दोनी सांगडे । संन्यास योग
७ येऱ्हवीं दीपाप्रति काई आनान । प्रकाश आहाती
८ आता कर्ता कर्म करावें । हें खुंटलें तया स्वभावें
आणि करी जऱ्ही आघवें । तऱ्ही अकर्ता तो
९ ऐसें तनुत्यागेंविण । अमूर्ताचे गुण
दिसती संपूर्ण । योगयुक्ता
१० तो कर्मे करी सकळें । परी कर्मबंधा नाकळे
जैसें न सिंपे जळीं जळें । पद्मपत्र

११ देहा हो नेदी उनमरा । परी सुरतु खें भोगी
१२ ह मलो काजेविणें । जें जें काहीं करणें
तें केवळ कर्म जाणें । इंद्रियाचें
अगा करितेनवीण कर्म । तेंचि तें निष्कर्म
१३ नवद्वारदेहीं । तो असताचि परी नाहीं
करीतचि न करी कांहीं । फळत्यागी
जगाच्या जीवीं आहे । परी कवणाचा कहीं नाहे
जगचि हें होय जाये । तो शुद्धीहि नेणे
१४ पैं मूर्तीचेनि मळें । तो मूर्तचि होऊनि खेळ
परी अमूर्तपण न मैळे । दादुल्याचें
१५ देखे आपलिया प्रतीती । जगचि मुक्त
१६ एक आपणपेंचि जैसें । ते देखती विश्व तैसें
१७ मुनीं भेद नेणती तैसा । ज्ञानिये ते
१८ म्हणोनि सर्वत्र सदा सम । तें आपणचि अद्वय ब्रह्म
हें सपूर्ण जाणें वर्म । समदृष्टीचें
१९ जिहीं विषयसग न साडिता । इंद्रियातें न दंडिता
परी भोगिली नि सगता । कामनेविण
२० तैसा शरीरी परी ससार । नोळखे तयातें
२१ सहजें स्वसुखाचेनि अपारें । सुरवाडलनि अतरें
रचिला म्हणऊनि बाहिरें । पाउल न घाली
२२ हे असो आघवीयोंली । साग पा सर्पफणीची साउली
ते शीतल होईल केतुली । मूषकासी
२३ म्हणोनि विषयभोगीं जें सुख । तें साचतचि जाण दु ख
२४ तया दु खिया दु खचि जिव्हार
२५ जरी विषयीं विषयो साडिजल । तरी महादोषीं कें वसिजेल
आणि ससार हा शब्द नव्हेल । लटिका जगीं

२६ देहीं देहभाव जिहीं । स्ववश केले

२७ भोगीं अवस्था एकी उठी । ते अहंकाराचा अंचळ लोटी
मग सुखेंसि घे आठी । गाढेपणें

२८ जे ऐसेनि सुखें मातले । आपणपाचि आपण राहिले ।
ते मी निखिळ वोतले । सामरस्याचे

२९ ते आनंदाचे अनुकार । सुखाचे अंकुर
नातरी अळकारले अवयव । ब्रह्मविद्येचे

३० अर्जुना अनंतसुखाच्या डोहीं । एकसरां तळचि घेतला जिहीं
मग स्थिरावूनि तेही । तेंचि जाहाले

३१ तरी वैराग्याचेनि आधारें । जिहीं विषय दवडूनि बाहिरें
शरीरीं एकंदरें । केलें मन

३२ जेथ हें संसारचित्र उमटे । तो मनोरूप पट फाटे
जैसें सरोवर आटे । मग प्रतिमा नाहीं

३३ म्हणोनि शरीरेंचि ब्रह्म होये । अनुभवी तो

३४ तिहीं आपणपें करूनि निर्लेप । प्रपंचाचें घेतलें माप
मग साच शांतीचेंचि रूप । होऊनि ठेले

३५ म्या जें काहीं विवरूनि पुसावें । तें आधींचि जाणितलें देवें

## अध्याय सहावा

हा सहावा अध्याय म्हणजे गीतेच्या अर्थाचें सार आहे. त्यात अष्टांग योगाच्या ऐश्वर्याचें कोठार आहे. हा अवघड विषय मराठींत सांगितला तरी त्यातील रसिक अक्षराना अमृताच्या गोडीवर विजय मिळेल. सर्व इंद्रियें त्या शब्दाना रसिकपणानें बिलगतील. तरी पण सर्व इंद्रियाचें सारखेंच समाधान होईल. मात्र ही अमृताची मेजवानी भोगण्यास अनर्मुख व्हावें लागेल. चित्ताला सूक्ष्मपणा आणावा लागेल. ज्यानीं संसार व स्वर्ग हे दोन्ही आत्मज्ञानावरून उतरून ओवाळून टाकले त्यांनाच याची गोडी कळेल. याला सद्गुरूचें सहाय्य लागतें. त्याच्या कृपेनें अरूप ब्रह्माचें स्पष्ट रूप अतींद्रिय असलें तरी इंद्रियाना दिसेल.

श्रीकृष्ण पुढें म्हणाला—निष्काम कर्मयोगी आणि सांख्ययोगी हे नावानें वेगळे, तरी वस्तुतः एकच होत. दोन्ही रस्त्यानीं गेले तरी मनुष्य एकाच मुक्कामाला पोहोंचतो. खरा सन्यासी तोच, कीं जो पृथ्वी ही जशी वृक्षादिकाना जन्म देते तथापि कर्तेपणाचा अहंकार धरीत नाहीं व बीजाची या फळाची अपेक्षा करीत नाहीं, त्याप्रमाणे वर्णाश्रमधर्मातील आचार करीत असताही त्या विषयीं कर्तेपणा मानीत नाहीं व फळाची आशाही धरीत नाहीं. तो हें जाणतो कीं, नित्य-नैमित्तिक कर्मे टाकून चालणार नाहीं-कारण एक लेप धुऊन टाकला तर दुसरा लावावा त्याप्रमाणें कर्म टाकणारा व्यर्थ कष्टात पडतो. म्हणून खोट्या आग्रहाच्या भरीं कोणी पडू नये. गृहस्थाश्रमातलीं कर्में टाकून सन्यास घेतला तरी सन्यासातलीं कर्में पुढें उभीं राहातात. मग त्यात काय अर्थ ? मुळात संकल्पाचा सन्यास केला तर तेथेंच योगाचें सार भेटतें. योगपर्वताच्या शिखरावर जाऊन पोहोंचण्यास कर्ममार्गाच्या पायऱ्या अटळच आहेत. मत्यय हा तुटलेल्या कड्यासारखा कठीण असला तरी वैराग्यरूपी घोरपड आपलीं नखें त्यांत रोवून चढणाऱ्याला सहाय्य करिते. प्राण व अपान याच्या वाहनावरून धारणेच्या मार्गानें हठयोगी चालून जातो. तो ध्यानरूपी शिखर मागें टाकतो. मग पुढील प्रहारी पद पडतात. मागील स्मरण नाहींसें होतें आणि ऐक्याच्या भूमिकेवर समाधि स्थिर राहते. मग त्याला सुख-दुःखाचे धक्के बाधत नाहींत. तो जागा होत नाहीं. विषय इंद्रियाजवळ आले तरी त्याची ओळख त्याला पटत नाहीं. ही योग्यता ज्याची त्यानेंच अंगीं आणावी

लागते, ती कोणाला कोणी देऊ शकत नाहीं. अहंकारामुळें देहाभिमानामुळें मनुष्य कल्पनेच्या खोड्यात पडतो, आणि पाय मोकळे असले तरी उलट त्यानींच घट्ट धरून बसतो. यामुळें सकल्प सुटत नाहीं आणि कोणी त्याला तोडावा म्हटलें तरी तो तुटत नाहीं. केवळ अहंकाराचा नाश झाल्यानें जीवाला ब्रह्मत्व प्राप्त होतें. सूर्य ज्या मार्गानें जातो तितका सर्व जगाचा भाग प्रकाशित होतो, त्याप्रमाणें ज्ञानी मनुष्याला जें जें प्राप्त होतें तें आपलेंच स्वरूप आहे असें त्याला भासतें. म्हणून तें कोणी दुसरें परकें असें त्याला वाटत नाहीं. पावसाच्या धारा ह्या मूळ समुद्रातून निघालेल्या असल्यानें त्या फिरून समुद्राचे अंगावर पडल्या तर त्याला बोचत नाहींत. ज्याचा भेदभाव निघून गेला त्याला मग सोन्याचें डिखळ व मातीचें डिखळ, तसेंच पृथ्वीच्या मोलाचें रत्न आणि दगड, हीं दोनही सारखींच वाटतात. परिसाच्या स्पर्शानें जसें सर्व लोखड सोनेंच होतें त्याप्रमाणें साम्य बुद्धीनें सर्व चराचराविषयीं समताच वाटू लागते.

अर्जुन म्हणाला—श्रीकृष्णा तुम्हीं वर्णन केलेलीं सताचीं लक्षणें मजमध्यें नाहींत. परंतु, तुम्ही सागाल तो अभ्यास मी करू शकेन. तुमच्या कृपेनें मी ब्रह्महि होईन.

हें ऐकून कृष्णाला वाटलें कीं, आता अर्जुनाच्या बुद्धीच्या पोटीं वैराग्याचा उदय खराच झाला आहे. तेव्हा आता याला साधनाचा अभ्यास सांगितला तर तो वाया जाणार नाहीं. त्याला ब्रह्मत्वाची फलप्राप्ति लवकर होईल. म्हणून श्रीकृष्ण म्हणाला—अर्जुना, प्रवृत्तिरूप झाडाच्या बुडालाच निवृत्तीचीं कोट्यवधि फळें लागलेलीं दिसतात. या अशा प्रवृत्तिमार्गानें योग्याचे समुदाय गेले व त्यांच्या अनुभवानें तो मार्ग सुलभ झाला, मळला गेला म्हणून त्याच मार्गानें पुढें महर्षि गेले. साधकानें सिद्ध झाले, आत्मज्ञानी महत्त्वाला चढले. कारण या मार्गावर पाऊल पडेल तेथें मोक्षाची खाणच उघडते. ज्या मुक्कामाला पोहोंचावें तो गावच आपण होतो.

नतर श्रीकृष्णानें अर्जुनाला योगप्रक्रियेंतील इष्ट असें स्थान कोणतें येथपासून योगाची सर्व मंजिल समजून सांगितली. आणि म्हणाला—या पद्धतीनें जो योगसाधन करितो त्याचे अंगावरील त्वचेचा पापुद्रा कोंड्यासारखा निघून जातो. आणि मग तो मूर्तिमत स्फटिक, किंवा अंकुर फुटलेलें रत्नरूपी बीज, किंवा केशरानें भरलेलें अमृतानें ओतलेलें ज्योतीचें स्वरूपच असा भासू लागतो.

सोनचाफ्याची मोठी कळा, अमृताचा पुतळा, किंवा शरद् ऋतूतील चंद्रबिंब असा तो दिसू लागतो. तसेच तो धैर्याने, सामर्थ्याने सर्व कृत्ये करू शकतो त्याचे जुने दात व नख जाऊन नवीं यतात वाटते की, सोन्याच्या झाडाला पालवी फुटत आहे, किंवा त्याला रत्नाची कळी नवी नवी उमटत आहे किंवा त्याचे अंगी खालवर हिऱ्याची रांगच बसविली आहे त्याचे तळहात तळपाय हे तांबड्या कमळाप्रमाणे दिसू लागतात डोळे अत्यंत स्वच्छ होतात. शिंपल्याचे गर्भात ज्याप्रमाणे मोती न मावल्यामुळे शिंपल्याला सांधा उकलून तें बाहेर येतें त्याप्रमाणे दृष्टि पूर्वीचीच पण पापण्यातून बाहेर येऊन आकाश व्यापते त्याच्या सुवर्ण देहाला वाऱ्याचा हलकेपणा यतो त्याला समुद्रापलीकडील पदार्थ दिसू लागतात स्वर्गातील विचार ऐकू यऊ लागतात. मुंगीच्या मनातील भाव त्याला कळू लागतात. तात्पर्य, त्याला अनेक सिद्धि प्राप्त होतात त्याची कुंडलिनी प्राणवायुरूप होते त्या प्राणाला नाद, बिंदु, कला, ज्योति हे चार धर्म नसतात कल्पना घेणें टाकणें हें उरत नाहीं प्रकाशाचा झरा हृदयाच्या पोकळ भूमींत जिरून जातो त्याला अवयव असतात, पण ते वायूला चिकट विल्यासारखे वाटतात यामुळें त्याला खेचर म्हणजे गगनविहारी म्हणतात शेवटीं पंचमहाभूतांचा पडदा नाहींसा होऊन जीव शक्ति व परमात्मा एक रूप होतात. परंतु त्या ब्रह्मस्थितीचें वर्णन शब्दाक्षरांनीं करताच येत नाहीं अथवा कानानीं ऐकताच येत नाहीं दैवानें प्राप्त होईल तेव्हाच त्याचें स्वरूप अनुभवता यईल अष्टांगयोग ज्यानीं साधला ते शुद्ध होऊन ब्रह्मरसाच्या मूर्ती प्रमाणें तेजस्वी दिसतात.

अर्जुन म्हणाला—या साधनाचें अनुष्ठान वाटेल त्यानें केलें तर तें त्याला साध्य होईल काय ?

श्रीकृष्ण म्हणाला—अधिकाराची योग्यता तर हवीच आणि ती योग्यता हा काहीं बाजारात मिळणारा माल नाही. परंतु थोडी शी विरक्ति अंगात आणून जो देहाच्या गरजा आवरू शकेल त्याला ही योग्यता प्राप्त होऊ शकेल पण गरजा आवरणें म्हणजे त्याचें फाजील नियमनहि उपयोगी नाहीं. सर्व काहीं देहकर्म करावें, पण ते नियमित व परिमित असावे त्यानें मनाचा संतोष वाढतो नियमितपणाचें वळण अंगीं लागेल तर योगाचा अभ्यास कष्ट न पडतां होऊ शकेल क्षेत्रसंन्यास केलेलें मन हें निवाऱ्याच्या कोनाड्यात ठेवलेल्या दिव्यासारखा निश्चित प्रकाश देतें इंद्रियांचा निग्रह

झाला म्हणजे चित्त हें चैतन्याच्या भेटीला निघतें, आत्मस्वरूप पाहिल्या-बरोबर त्याची ओळख पटते, आणि तें देहाला विसरतें वैराग्यानें सकल्पाची येरझार सपते आणि बुद्धि ही धैर्याच्या भुवनात सुखानें निवास करते. बुद्धि स्थिर झाली तर आत्मानुभवात कायमचें स्थान मिळतें असा अनुभव पुष्कळानीं घेतला आहे. बुद्धीनें ब्रह्मैक्यग्रहण करणें ही मुख्य गोष्ट आहे. आपल्या ठिकाणीं सर्व जग पाहावें आणि आपणच जगत्व व्हावें अशा या साम्याची उपासना करणें हीच मुख्य गाष्ट. कारण या साम्यप्रतीतीपलीकडे जगात दुसरा लाभ नाहीं.

अर्जुन म्हणाला—पण देवा, मनापुढें कोणाचा टिकाव लागत नाहीं माकडाला जशी समाधि लागत नाहीं, किंवा प्रलयकाळच्या वाऱ्याला थाब म्हटलें असता तो थाबत नाहीं, त्याप्रमाणें मन हें सात्विक धैर्याच्या हातावर हात मारून पळून जातें आणि मनुष्याला दाही दिशांना फिरवितें.

श्रीकृष्ण म्हणाला—हें खरें आहे. पण असेंही आहे कीं, वैराग्याच्या जोरावर मन अभ्यासाकडे वळविलें तर तें काहीं काळानें स्थिर होऊ शकतें त्याची एक खोडच उपयोगी पडते ती ही कीं, कोठें गोडी दिसली कीं त्या ठिकाणीं मन सवकतें .म्हणून आत्मानुभवाचें सुख त्याला दाखवून ठेवावें म्हणजे कदाचित् त्याची गोडी त्याला लागेल. पण हें सर्व अभ्यासाधीनच आहे. पण तसेंच अभ्यासानें तें साध्यहि आहे. योगसामर्थ्यानें मनाच्या चपळतेला बधन घालता येतें.

अर्जुन म्हणाला—पण देवा, असही होईल कीं, कोणी एखादा योगाभ्यासा-शिवाय केवळ श्रद्धेच्या जोरावर मोक्षपद मिळविण्याला निघेल, पण आत्मसिद्धी नावाच्या गावाला पोहोंचण्यापूर्वीच आयुष्य सरल्यानें त्याला मृत्यु येईल म्हणजे मरचालाही अतरला व आत्मसिद्धीलाही अतरला. तर त्याची गत काय!

श्रीकृष्ण म्हणाला—मोक्षसुखाची उत्कट इच्छा असेल तर मोक्ष मिळेलच. परतु त्याला विलब लागेल, म्हणून मध्यतरीं थोडा विसावा घ्यावा लागेल पण हा विसावा सुखकर असून तो स्वर्गात भोगता येतो. शभर यज्ञ केल्यानें मिळणारा स्वर्ग मोक्षाच्या खऱ्या आस्थेवाईक इच्छेनेंही मिळू शकतो पण पुढें नें स्वर्गसुख त्याच त्याच्च आवडेनासें होतें. म्हणून तो जीव योगभ्रष्ट होऊन भूलोकावरील एखादें उत्तम कुळ पाहून त्यात जन्म घेतो असें कुळ

म्हणजे जें नीतीच्या मार्गानें चालतें, सत्य पवित्र शब्द बोलतें, शुद्ध शास्त्रदृष्टीनें पाहातें, देव दैवत जागृत ठेवतें, शास्त्रविहित आचरण ठेवतें, सारासार विचाराचा सल्ला घेतें, किंवा ज्या कुलात निंता हा ईश्वराचीच एकनिष्ठ पत्नी असते आणि ऋद्धी ह्या घरातील देवता असतात तेंच तें कुळ होय अशा कुळात जन्मल्यानें अल्पवयातच त्याचे ठिकाणीं ज्ञानाचा उदय होतो व सर्वज्ञता लाभते पूर्वजन्मींची सद्बुद्धि त्याला प्राप्त होते. फारशा प्रयत्नावाचून त्याला मोठमोठे सिद्धांत गुरुमुखाशिवायही कळू लागतात. साधकदशेंतच त्याची इतकी तयारी होते म्हणून तो आयताच विवेकाच्या राज्यावर बसतो. आणि निराकार ब्रह्मस्थितीची मूर्ति होऊन राहतो पूर्वीच्या जन्मीं त्यानें विशेष झाडून टाकलेले असल्यामुळें, या नव्या जन्मीं उपजताच त्याची लग्नघटिका बुडून त्याला मंगल मुहूर्त एकदम प्राप्त होतो व ब्रह्मरूप वधूशीं त्याचें लग्न लागतें. जी वस्तु मिळावी म्हणून कर्मनिष्ठ लोक धैर्यरूपी बाहूचा विश्वास धरून कर्मनदींतून पोहून जाण्याकरिता उडी घेतात, किंवा ज्ञानी लोक ज्ञानाचें चिलखत अंगात घालून समरांगणात संसाराशीं लढतात, किंवा तपरूपी तुटलेल्या कड्यावर चढण्याचा प्रयत्न करतात, ती वस्तु, म्हणजे तें स्वरूप, तो योगी आपण स्वत च होतो. म्हणून मनुष्यानें मनानें कर्मयोगी व्हावें योगी हा देवांचा देव होय तोच ईश्वराचा आत्मा किंवा त्याचें सुखसर्वस्व होय ईश्वर हा स्वत ला देह मानून योग्याला त्यातील आत्मा मानतो

---

## ( ६ व्या अध्यायातील निवडक वचनें )

१ माझा मराठाचि बोल कौतुकें । परी अमृतातेंही पैजा जिंके
ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन
ऐका रसाळपणाचिया लोभा । कीं श्रवणींचि होती जिभा
बोलें इंद्रिया लागे कळभा । एकमेका
जेथ सपूर्ण पद उभारे । तेथ मनाचि धावे बाहिरें
बोल भुजाही आविष्करे । आलिंगावया

२ आता आत्मप्रभा नित्य नवी । तेचि करूनि ठाणदिवी
जो इंद्रियातें चोरूनि जेवी । तयासीचि फावे

३ मग सुखेंसीं सुखाविजे । सुखाचिमाजीं
४ आत्मबोधाचिया आवडी । केली स्वर्गसंसाराची करोडी
५ तें बुद्धीही आकळिता साकडें । म्हणऊनि बोलीं विपायें सापडे
६ अतींद्रिय परी भागवीन । इंद्रियाकरवीं
तेणें कारणें मी बोलेन । बोलीं अरूपाच रूप दावीन
७ आइकें योगी आणि सन्यासी जनीं । हे एकचि सिनानें झणीं मानीं
विचारिजती जव दोन्ही । तव एकचि ते
८ जैसें नामाचेनि अनारिसेपणें । एका पुरुषातें बोलावणें
का दोहीं मार्गी जाणें । एकचि ठाया
९ गृहस्थाश्रमाचें वोझें । कपाळीं आधींचि आहे सहजें
कीं तेंचि सन्यासें वाढविजे । सरिसें पुढती
१० जेथ सन्यासिला संकल्प तुटे । तेथचि योगाचें सार भेटे
११ मग तया मार्गाची धाव । पुरेल प्रवृत्तीची हाव
जेथ साध्य साधना सेंव । समरसें होय
जेथ पुढील पैस पारखे । मार्गील स्मरावें तें ठाकें
ऐसिये सरिसीये भूमिके । समाधि राहे
१२ असतेनि देहें एतुला । जो चेतुचि दिसे निदेला
तोचि योगारूढ भला । बोलस तू
१३ म्हणऊनि आपणचि आपणया । घात किजत असे धनंजया
१४ हा विचारूनि अहंकार सांडिजे । मग असतीच वस्तू होइजे
तरी आपली स्वस्ति सहजें । आपण केली
१५ येऱ्हवीं कोशकीटिकाचिया परी । तो आपणया आपण वैरी
कैसे प्राप्तीचिये वेळे । निदैवा आंधळेपणाचे डोहाळे
१६ कीं मोकळिया पायाला चवडा । गोंवी अधिकें
कानेंगोण आतुडला । तो साग पा काय आणकें बापला

१७ तया स्वात कर्णजिता । सकळकामोपशाता
परमात्मा परौता । दूर नाहीं
१८ तैसें तया पावे तें आहे । तोचि म्हणऊनि
१९ मग लागला जव पाहों । तव ज्ञान तें तोचि
२० तया बधु कोण काह्याचा । द्वेपिया कवण तयाचा
मीचि विश्व ऐसा जयाचा । बोध जाहला
२१ जयाचेनि बोलें धर्म जिये । दिठी महासिद्धीतें विये
देखें स्वर्गसुखादि इयें । खेळ जयाचा
२२ आवडी आणि लाजवी । व्यसन आणि शिणवी
पिसें आणि न भुलवी । तरी तें काई
२३ पासींचि गोसावीविर न वानिजे । मा गा पाइकाचा गुण घेइजे
२४ पाहा पा अनुरागें भजे । जे प्रियोत्तमें मानिजे
ते पतीहूनि काय न वानिजे । पतिव्रता
२५ तैसा सर्वेश्वर वळिया सेवकें । म्हणोनि श्रद्धहि होय तो कौतुकें
२६ परी उदरा वैराग्य आहे आलें । बुद्धीचिया
पाठीं महर्षी येणें आले । साधकाचे सिद्ध जाहाले
आत्मविद् थोरावले । येणेंचि पथें
हा मार्ग जैं देखिजे । तैं ताहान भूक विसरिजे
रात्रिंदिवस नेणिजे । वाटे इथे
चालता पाऊल जेथ पडे । तेथ अपवर्गाची खाणी उघडे
आव्हाटलिया तरी जोडे । स्वर्गसुख
२७ येणें मार्गे जया ठाया जाइजे । तो गाव आपणचि होइजे
२८ जेथ स्मरतेनि आदरें । सबाह्य सात्त्विकें मरे
जव काठिण्य विरे । अहंभावाचें
विषयाचा विसर पडे । इंद्रियाची कसमस मोडे
मनाची घडी घडे । हृदयामाजीं

२९ आता आगातें आग वरी । पवनातें पवन धरी
ऐसी अनुभवाची उजरी । होंचि लागे
प्रवृत्ति मार्गीती मोहरे । समाधि ऐलाडी उतरे
आचवें अभ्यसू सरे । बैसतखेवो

३० मग काश्मीरीचें स्वयम । का रत्नबीजा निघाले कोंभ
अवयवकांतीची भाब । तसी दिसे

३१ तो कनकचपकाचा कळा । कीं अमृताचा पुतळा
नाना सार्विन्नला मळा । कोंवळिकेचा

३२ मणिकुलियाचिया कणिया । साविंयाची अणुप्रमाणिया
तैसिया सर्वांगीं उधवती अणिया । रोमांचिया

३३ मग समुद्रापैलिकडील देखे । स्वर्गीचा आलोच आइके
मनोगत वोळखे । मुंगियेचें

३४ जें उन्मनियेचें लावण्य । जें तुर्येचें तारुण्य
अनादि जें अगण्य । परमतत्त्व

३५ जें आकाराचा प्रांत । जो मोक्षाचा एकांत
जेथ आदि आणि अंत । विरोनि गेले

३६ इये अभ्यासीं जे दृढ होती । ते मरवसेनि ब्रह्मत्वा येती

३७ सहजें आगिक जेतुलें आहे । तेतुलियाचि जरी सिद्धि जाये
तरी हाचि मार्ग सुखोपायें । अभ्यासीन

३८ पैं योग्यता जे म्हणिजे । ते प्राप्तीचि अधीन जाणिजे
का जें योग्य होऊनि कीजे । जें आरंभिलें फळे

३९ बाहेर युक्तीची मुद्रा पडे । तव आंत आंत सुग्म वाढे
तेथें सहजेंचि योग घडे । नाभ्यासिता

४० तू मातीचा चाड वाहसी । परी अभ्यासीं दक्ष न होसी
तें सांग पां काय विहसी । दुवाडपणें

४१ ऐसें हितासि जें जें निकें । तें सदाचि या इंद्रिया दुखें
येन्हवीं सोपें योगासारिखें । काहीं आहे ?

४२ बुद्धि धैर्या होय वधौटा । तरी मनातें अनुभवाचिया वाटा
हळू हळू आणूनि करी प्रतिष्ठा । आत्मभवनीं

४३ या सोपया योगस्थितीं । उकेल देखिला गा बहुतीं
संकल्पाचिया संमती । रुसोनिया

४४ तैसे होय तिये मेळीं । मग सामरस्याचिया राउळीं
महासुखाची दिवाळी । जगेसी दिसे
भूताचेनि अनेकपणें । अनेक नोहे अंत:करणे

४५ तैसा माझेनि रूपें रूपस । पुरुष तो गा
नातरी वृक्षाचीं पानें जेतुलीं । तेतुलीं रोपें नाहीं लाविलीं

४६ आता शरीरीं तरी आहे । परी शरीराचा तो नोहे

४७ म्हणोनि आपणपा विश्व देखिजे । आणि आपण विश्व होईजे
ऐसें साम्यचि एक उपासिजे । पाडवा गा

४८ म्हणोनि ऐसें कैसें घडेल । जे मर्कट समाधी येईल

४९ जें निरोधलें घे उवावो । जया सयमाचि होय सावावो
तें मन आपला स्वभावो । साडील काई ?

५० परी वैराग्याचेनि आधारें । जरी लाविलें अभ्यासाचिये मोहरे
तरी केतुलेनि एके अवसरें । स्थिरावेल

५१ आगी योगाचें होय बळ । तरी मन केतुलें चपळ

५२ एरव्हीं अभ्यासाचा उचलता । पाउलीं जरी चालता
तरी दिवसाआधीं ठाकिता । सोहसिद्धीतें

५३ जयाच्या कुळीं चिंता । जाली ईश्वराची पतिव्रता
जयातें गृहदेवता । आदि ऋद्धि

मी नव्हे. वनस्पतींचें 'बीं' हा त्या वनस्पतीचा गोठलेला रसच असतो व त्यातूनच पुढें अंकुर फुटून वृक्षादि होतात. परंतु तें म्हणजे जसें बीज नव्हे तसाच सृष्ट पदार्थ म्हणजे प्रत्यक्ष मी नव्हे. आकाशात ढग उठतात परंतु ढगात आकाश नसतें, किंवा ढगात पाणी असतें पण पाण्यात ढग नसतात, अग्नीपासून धूर निघतो पण धुरात अग्नि नसतो, मोती पाण्याचेंच बनतें पण पाण्यात विरघळत नाहीं, कच्चें मडकें ही माती होय पण भाजलेलें खापर ही माती नव्हे, तद्वत् सृष्टि निर्माण करणारी ही माया म्हणजे एक महानदी होय. ती नदी ब्रह्म पर्वतातून निघून प्रवृत्ति व निवृत्ति या दोन तीरामधून वाहते मोहाच्या पावसानें तिला पूर येतो. तिच्यात अज्ञानाचे भोंवरे द्वेषाचे भोंवरे गरगर फिरत असतात. स्त्रीधनादि लोभनीय विषय त्या नदींत माशाप्रमाणें चमकतात. रजोगुणाच्या खडकाशीं ती नदी खळखळ करते आणि तमोगुणरूपी या नदीच्या धारेला लागलेला जीव वाहतच जातो. या नदींतून तरून जाण्याला जो जो उपाय करावा तो अपाय होतो. बुद्धीच्या बाहुबळानें पोहणें व्यर्थ होतें. यज्ञादि कर्मांच्या सांगडी यज्या तारून नेणाऱ्या दिसतात, परंतु त्याच्या मुळाशी स्वार्थाभिमानाचे दगड असतात ते बुडवितात. बरें, बुडविणारे दगड नसले तरी यज्ञाच्या सांगडीसह प्राणी स्वर्गसुखाच्या कपारींत शिरला कीं अडकून पडतो. विधिनिषेधाचीं वळणें चुकविणें कठीण होतें. माशाला जसा गळ गिळता येत नाहीं, किंवा मुंगीला पर्वत ओलांडता येत नाहीं, त्याप्रमाणें जीवाला ही मायानदी उतरून जाता येत नाहीं. सद्गुरुरूप नावाडी भेटला तरच पलतीराला पोंचण्याची आशा. या माया—नदींत बुडाले असेच पुष्कळ, वैराग्याच्या सहाय्यानें या नदीचें पाणी तोडीत निवृत्तीचे पैलतीरावर पोहोंचले असे थोडे. अशा लोकात चार वर्ग आहेत. ते म्हणजे आर्त, (दुःखानें पीडलेले), जिज्ञासू (ज्ञानाची इच्छा करणारे), अर्थार्थी आणि ज्ञानी. हे चारही आशापरत्वा हेतूनीं माझें भजन करितात. परंतु यापैकीं जो ज्ञानी तोच खरा भक्त होऊ शकतो. ज्ञानाच्या अद्वैत प्रतीतीमुळें तो मद्रूप झाला तरी भक्त म्हणून उरतोच. भजन करितांना तो भक्त असा दिसतो, परंतु प्रतीति धर्मानें अंतरंगात तो मीच झालेला असतो. माझें खरें प्रेम ज्ञानी भक्तावर असतें. इतर भक्त मला चिकटून पाहातात पण मी त्यांना थारा देत नाहीं. गाईचें दूध मिळण्याकरिता वासरूंही गाईला भाला असतो. पण गाईच्या वासराला कोणत्याही प्रयत्नाशिवाय दूध मिळतें. कारण ही माझी आई हें जसें गाई-

## ( ७ व्या अध्यायांतील निवडक वचनें )

१ तैसी जाणीव जेथ न रिगे । विचार मागुतापाउलीं निघे
तर्क आयणीं नेघे । आगीं जयाच्या

२ अर्जुना तया नाव ज्ञान । येर प्रपच हें विज्ञान
येथ सत्यबुद्धि तें अज्ञान । हेंहीं जाण

३ जैसा मालेया त्रिभुवना । आत एक एक चाग अर्जुना
निवडुनि कीजे सेना । लक्षवरी

४ कीं तयाहीपाठीं । जे वेळीं लोह मासातें घाटी
ते वेळीं विजयश्रियेच्या पाटीं । एकचि बैसे

५ तैं भूतसृष्टीची पडे टाकसाळ
चतुर्विध ठसा । उमटों लागे आपैसा
मोला तरी सरिसा । परी थरचि आनान

६ मरे आदिशून्याचा गाभारा । नाणेयासीं

७ जैं आखूनि नाणें विस्तारी । पाठीं तयाची आटणी करी

८ ऐसें होय दिसे न दिसे । हें मजचिमाजीं असे

९ ऐसें भूताप्रति आनान । जें प्रकृतिवशें दिसे जीवन
तें आधराठायीं अभिन्न । मीचि एक

१० भूताच्या ठायीं काम । तो मी म्हणे आत्माराम
जेणें अर्थास्तव धर्म । थोर होय

११ ते हे जाले तरी माझ्या ठायीं । परी तयामाजीं मी नाहीं
जैसा स्वप्नीच्या डोहीं । जागृती न बुडे

१२ तैसा विकार हा मी नोहें । जरी विकारला असें

१३ तैसी हे माझीच विनली । त्रिगुणात्मक साउली
कीं मजचि आड वोडवली । जवनिका जैसी
म्हणऊनि भूतें मातें नेणती । माझीच परी मी नव्हती
जैसीं जळींचीं जळीं न विरती । मुक्ताफळें

१४ तैसें भूतजात सर्व । हे माझेचि कीर अवयव
  परी मायायोगें जीव– । दशे आले
१५ रजोगुणाचेनि सळाळें । स्वर्ग गाजे
१६ ऐसा मायापूर हा कवणें । तरिजैल गा
  येथ एक नवलावो । जो जो कीजे तरणोपावो
  तो तो अपावो । होय तें ऐक
१७ पाडस वागुर करांडी । का मुंगी मेरु वोलांडी
  तरी मायेची पैलथडी । देखती जीव
१८ येथ एकचि लीला तरले । जे सर्वभावें मज भजले
  तयां ऐलीच थडी सरलें । मायाजळ
१९ म्हणोनि भक्त एक पाहीं । ज्ञानिया जो
२० तेचि भक्त हे पैज न सरे । जरी ऐक्या आला
२१ तैसें शरीरीं हन कर्में । तो भक्त ऐसा गमे
  परी अंतरप्रतीतिधर्में । मीचि जाला
२२ म्हणोनि आपुलाल्या हिताचेनि लोभें । मज आवडे तोही
  भक्तहि शोभे । परी मीचि करी वालभें । ऐसा ज्ञानिया एक
२३ तैसी अंत:करणकुहरीं जन्मली । जयाची प्रतीतिगंगा मज
  मीनली । तो मी हे काय बोली । फार करूं
२४ येर बहुत जोडती किरीटी । जयाची मजनें भोगासाठीं
  जे आशातिमिरें दृष्टी । मद जाले
२५ आधींच प्रकृतीचे पाइक । वरी भोगालागीं तंव रंक
  मग तेणें लोलुपत्वें कौतुक । कैसेनि भजती
२६ पैं जो जिये देवतांतरीं । भजावयाची चाड करी
  तयाची ते चाड पुरी । पुरविता मी
  देवोदेवीं मीचि पाहीं । हाही निश्चय त्यासि नाहीं
  भाव ते ते ठायीं । वेगळाला धरी

२७ येर तनुमनप्राणीं । जे अनुसरले माझियाचि वाहणीं
ते देहाच्या निर्वाणीं । मीचि होती

२८ परी तैसे न करिति प्राणिये । वाया आपल्या हितीं वाणिये

२९ जे पोहताति पाणियें । तळहातांचेनी
तया उपमा माप का सुवावें । मज अव्यक्ता व्यक्त का [ मानावें
सिद्ध असता का निमावें । साधनवरी

३० येथें मूतें जिये अतीतलीं । तियें मीचि होऊनि ठेलीं
आणि वर्तत आहाति जेतुलीं । तींही मीचि
का भविष्यमाणें जियें हीं । तींही मजवेगळीं नाहीं

३१ तेथें इच्छा हे कुमारी जाली । मग ते कामाचिया तारु-
ण्या आली । तेथ द्वेषेसीं मांडिली । वराडिक

३२ तेणें भावशुद्धीचिया वाटे । विखरले विकल्पाचे काटे
मग चिरिले अव्हाटे । अप्रवृत्तींचे

३३ उजू एकनिष्ठेच्या पाउलीं । रगडूनि विकल्पाचिया भालीं
महापातकांची साडिली । अटवीं जींहीं

३४ ते वेळीं कृतकृत्यता जग भरे । तेथ अध्यात्में नवलपण
कर्माचें काम सरे । विरमे मन पुरे

३५ काय न भरतयाहि चित्ता । युगात नोहे ?

३६ परी नेणों कैसें पैं गा । जे जडोनि गेले माझिया आंगा
ते प्रयाणीचिया लगबगा । न सांडितीच मातें

३७ झडफरी अनुमानाचेनि करतळें । घेऊनि तियें वाक्यफळें
प्रतीतिमुखीं एक वेळे । घालू पाहे

३८ कैसा झकविलों अनळागपणें । अक्षराचेनि ।

३९ परी तेथें हें नोदेचि देवा । देखिला अक्षराचा मेळावा
आणि विस्मयाचिया जीवा । विस्मयो जाला

४० जैसी कानाचे आर्घी दृष्टी । उपेगा जाये

४१ पाहा पां मालतींचे कळे । घ्राणासि कीर वाटले परिमळें
परी वरचिया बरवा काइ डोळे । सुखिये नव्हती ।

## अध्याय आठवा

श्रीकृष्ण म्हणाला—ब्रह्म हें अत्यत सूक्ष्म तत्त्व आहे. तें आकाशाच्या पदरा तून गाळून घेतलेले असे वाटेल तर म्हणावें, पण खरें कसनातीतच आहे. तें परब्रह्म प्रपचाच्या वस्त्रातून हालवलें तरी गळत नाहीं ब्रह्माच्या अखडत्वाला अध्यात्म म्हणतात. या ब्रह्मात न कळत महत्‌तत्त्वादि भूतें ब्रह्मांडाच्या आकारानें निर्माण होऊ लागतात आणि अनेकत्व, समविषमत्व, स्थावर, जगम आदि भेद इत्यादि अगणित अघटित घटना उत्पन्न झाल्या वाढू लागल्या असें दिसतें ही वाढ म्हणजे शून्यातूनच कारणाशिवाय उत्पन्न होणारें कर्म होय तसेंच अधिभूत हा शब्द त्याला लावतात कीं, जें पचमहाभूतांच्या सयोगानेंच दिसू लागतें आणि वियोग झाला असता नाश पावतें. अधिदैव म्हणजे प्रकृतीनें मिळविलेलें भोग भोगणारा पुरुष तो इंद्रियांचा राजा असून एखाद्या वृक्षावर पक्षी बसावा त्याप्रमाणें त्या अधिदैव पुरुषावर जीवाचे सकल्प मृत्यूच्या वेळीं आश्रय घेतात. ज्याला जीव असें म्हणतात, तो शरीररूपी घरा तील अधिदैव होय. आणि शरीररूपी गावामध्यें अहकारादिकांना नाहींसें करतो तो अधियज्ञ होय केवळ अविद्येमुळें, अज्ञानामुळें, अधिभूतादि वेगळे दिसतात, पण मुळात तसं नाहीं एखादी स्फटिक शिळा केसाच्या पुजक्यावर ठेवली तर ती छिन्नविछिन्न झालेली दिसते परतु ती खरी अखड अभगच असते.

अधियज्ञ हा सर्व जीवांचा विसावा आहे तो यज्ञ सिद्ध होण्याला वैराग्याचें ईंधन लागतें व मग त्यात विषयरूपी द्रव्याची आहुति दिली जाते. पण त्या अग्नीमध्यें ज्ञानही नाहींसें होतें, म्हणजे ज्ञानाचाही लय होतो मायेचरो बरच ज्ञानही या यज्ञकुडात जळतें ज्ञानी पुरुष जिवत असताना व मरणकाळींही देह विसरून आत्मस्वरूपीं मग्न झालेले असतात त्यांची ही श्रद्धा कधींच ढळत नाहीं मरणान शरीररूपी आकार नाश पावतो. आत्मवस्तु मात्र आहे तशीच राहाते म्हणून मेल्यावर ते ज्ञानी पुरुष मद्‌रूपच होतात ज्या गोष्टींचा ध्यास मनुष्यवृत्तीला लागतो तीच त्याला जागेपणीं व स्वप्नातही दिसते तीच गोष्ट ज्ञानी पुरुषाची ईश्वराविषयीं असते चित्तान आत्म्याला एकदा आपलेंसे केलें म्हणजे मग देह असला काय गेला काय सारखच ब्रह्म हें आकाररहित असतें तें सर्वांना सर्वपणपाहातें (येथें पुन श्रीकृष्णानें योगप्रक्रिया सागितली)

ब्रह्मज्ञान हें सर्वांत अतिम ज्ञान आहे. पण या ज्ञानाला जे विषय झाले

आणि मोजले-मापले गेले त्याला ' क्षर ' म्हणतात. आणि ज्ञानानेंही जें मोजवितां येत नाहीं तें ' अक्षर ' होय. अक्षर हें वृत्तिज्ञानाचा विषय होत नाहीं. कारण ज्ञानच तेथें लय पावतें. अक्षर म्हणजे परमात्मस्वरूप, म्हणजे प्रकृति पलीकडचें तत्त्व होय. तें मिळण्याचा–जाणण्याचा प्रयत्न, निष्काम पुरुष हे ब्रह्मचर्यासारखीं संकटें सोसून व इंद्रियांशीं कठोरपणानं वागून करतात. वेदही तें ब्रह्मतत्त्व जाणू शकत नाहींत व अलीकडच्या तीरावरच गटंगळ्या खातात. प्रणव हें त्याचें नाम आहे तें एकाक्षर ब्रह्म ' ॐ ' या शब्दानें जाणलें जातें.

कोणाला वाटेल कीं, मरणाचे वेळीं योगसाधनासारख्या कठिण गोष्टी कशा होणार? तर त्याचें उत्तर हेंच कीं, नेहमींच्या सवयीनें तें होतें. नित्य भक्ताना ती सवय असते म्हणून मरणानंतर त्याना मी प्राप्त होतों. मरणाचें संकट माझे भक्ताला कधींच पडत नाहीं. कारण मी त्याना नेहमी देह हा विकल आहे असें जाणवून,आत्मबोधाच्या पिंजऱ्यात ठेवून,त्यांचेवर माझ्या अखंड स्मरणाची सावली घालतों. भक्ताची भक्ति हें मी आपणावरील ऋण समजतों व त्यामुळें भक्ताची मरणकाळीं योग्य सेवा करतों. जिवंतपणीं देखील भक्त हे देहाशीं एकजीव नसतात, म्हणून त्याना मरणसमयीं देहाचा वियोग होतो असं वाटत नाहीं. यामुळेंच ते जसे मरणाआधीं तसे मरणानंतर मला येऊन मिळालेले असतात.

शरीराची,देहाची निंदा किती करावी तितकी थोडीच.देह हा तापत्रयाची शेगडी, दु:खाचा बागबगीचा, मृत्युरूपी कावळ्यापुढें टाकलेला बळी, विंचवाचें पेव, वाघाचें वसतिस्थान, राक्षसीचें प्रेम, विषाचा घोट, चोरानें दिलेला विश्वास, रक्तपित्याचें आलिंगन, सापाचा मऊपणा, पारध्याचें गायन, धुराच्या कणांनीं भरलेलें आकाश– असला हा वाईट देह माझ्या भक्ताना मृत्यूनंतर कसा मिळेल? ब्रह्मलोकीं गेलेल्या जीवानाही पुनर्जन्म असतो, पण मत्स्वरूपात मिळालेल्या भक्ताना तो घडत नाहीं. एवढा इंद्र, पण सत्यलोकींच्या एका प्रहरात १४ इंद्र होऊन जातात. पण ब्रह्मदेवाच्या आठही प्रहराना डोळ्यांनीं पाहणारे असेही असतात, तेच ब्रह्मवेत्ते. ब्रह्मदेवाच्या दिवसाला प्रारंभ झाला म्हणजे जग आकाराला येतें आणि चार प्रहरानंतर हा आकारसमुद्र आटतो. अशा रीतीनें ब्रह्मलोकच्या एका दिवस–रात्रीमध्यें जगाची उत्पत्ति व संहार होतात.

हा एक अव्यक्त पदार्थ झाला,ज्यात अनेकत्वाचा एकत्वात समावेश होतो त्याला साम्य म्हणतात. पण व्यक्त–अव्यक्त अशा कल्पनेपलीकडचा दुसरा जो एक

सनातन अव्यक्त पदार्थ आहे तो मात्र केव्हाही नाहींसा होत नाहीं. कारण मूळ चैतन्य हें साकारही नाहीं, निराकारही नाहीं, किंवा काळपरिच्छिन्नही नाहीं. पाटीवर लिहिलेलीं अक्षरें पुसून टाकलीं तरी त्याचा बोध उरतोच, त्याप्रमाणें मरणाऱ्या जीवाच्या आकारात तें चिद्रूप अमर असतें. अक्षर याचा अर्थ असा कीं, आकार आल्यानं त्याचें निराकारत्व जात नाहीं. ते ब्रह्मही परब्रह्म होय. त्याला परमगति असें म्हणतात. मनाच्या चव्हाट्यावर विषयाचे बाजार भरतात, व राजा ज्याप्रमाणे बाजारातील व्यवहारावर स्वामित्व म्हणून कर वसूल करतो त्याप्रमाणें जीव हाही त्या सुखदुःखाचे जश भोगतो. पण करग्रहण करणारा हा राजा राजवाड्यात केव्हा झोपीं गेला तरी त्यामुळें बाजारचा व्यवहार थांबत नाहीं. सूर्याच्या प्रकाशामुळें जगाचा व्यवहार चालतो, पण स्वतः सूर्य हा कांहीं व्यापार करीत नाहीं किंवा करवीत नाहीं.

प्रकृति ही स्त्रीलिंगी व आत्मा हा पुल्लिंगी. ही प्रकृति या आत्मपुरुषाशीं पतिव्रतेप्रमाणें संसार करते. या आत्मपुरुषालाच योगी लोक परम गति म्हणतात. गर्वरहित, गुणातीत, निरिच्छ, सद्रूप असाचा गाव भीच आहे. आणि भक्ति हीच त्या गावाला पोहोंचणारी वाट आहे. आणि तेथें पोहोंचल्यावर ते परत येत नाहींत. उसाची साखर झाल्यावर साखरेचा परत ऊस होत नाहीं. परिसानें सोनें केलेलें लोखंड फिरून लोखंड होत नाहीं. आणि तूप झालेलें दूध फिरून दूध होत नाहीं. मात्र मरतांना असें चिद्रूप होण्याकरितां कांहीं ठराविक काळींच देहावसान केलें पाहिजे. मरणसमयीं इंद्रियसमुदाय स्मरणशक्ति टवटवीत असली पाहिजे. योग्य काळीं मृत्यु पावणाऱ्याची तशी असते. चैतन्याभोंव्या चेतनेशिवाय चेतना टिकत नाहीं, आणि ती चेतना आणि तें स्मरण सांभाळूनच देह टाकावयाचा असतो. मृत्युपूर्वी त्रिदोषादिकांची बाधा झाल्यास मात्र हें घडत नाहीं. अग्नि, ज्योति, दिवस काल, शुक्लपक्ष आणि उत्तरायण अशा पायऱ्या आत्मस्वरूपाकडे जाण्याच्या मार्गाला आहेत. त्याला अर्चिमार्ग म्हणतात. परंतु त्रिदोषबाधेनं आयत्या वेळीं जन्मभर केलेला योगाभ्यास हातचा जातो. अशा स्थितींत ज्यांना देह पडतो, तसेंच ज्यांना वद्यपक्षात रात्रकाळीं, दक्षिणायनात मृत्यु येतो त्यांचीही नवीन गति होते. म्हणजे ते धूम्रमार्गानें चंद्रलोकापर्यंत जाऊन परत जन्माला येतात. म्हणून एक जो सरळ सोपा मार्ग व दुसरा अवघड मार्ग ह्यांचें तारतम्य मनुष्यानें ओळखावें. समोर डोळ्यापुढें नाव दिसत असतां कोण पाण्यात कोण उडी घेईल? त्याप्रमाणें अकालीं देह न पडण्याची सावध-

गिरी ठेवावी नाहीं तर जन्मभरचा अभ्यास फुकट जाईल पण प्रारब्ध काय करील तें वेगळेच

पण या दोन मार्गांतील भेद समजला तरी मरणकाळ हा जीवाच्या हातचा नाहीं म्हणून मरणाची वाटही न पाहाता, ज्ञानाच्या साहाय्यानें देह स्थिति–असताच, मी ब्रह्म आहें, मी ब्रह्म आहें, अशी बोधप्रतीति झाली तर ती बरी नव्हे काय ? आणि योगसपन्न झाल्यान ही गोष्ट साधते योगी हा सर्व–म्हणजे ससारातील व स्वर्गातील दोनही–भोगाना ओवाळून टाकलेल्या चळी प्रमाणें तुच्छ मानतो वेदाध्ययनानें पुण्य लाभलें किंवा यज्ञ, तप, दान याच पुण्य मिळालें, आणि तें पुण्य फळाला आलें, तरी त्याला निर्मळ परब्रह्मप्राप्तीची सर नाहीं स्वर्गसुख मिळालें तरी, त्याची पायरी करून तिनवरून वर जाऊन मिळावें असें ज एक सुख आहे, तें परमसुख होय व तें योग्याना मिळतें

## ( ८ व्या अध्यायांतील निवडक वचनें )

१ किरीटी कामधेनूचा पाडा । वरी कल्पतरूचा आहे माद्रोडा
२ या कारणें श्री अनतें । तें मनोगत तयाचें पुसतें
होईल जाणूनि आइतें । वोगरूनि ठेविलें
३ जें अपत्य थानीं निगे । तयाची भूक ते मातेसीचि लागे
४ येऱ्हवीं सपुरपण तयाचें पाहावें । तरि शून्यचि नव्हे स्वभावें
वरी गगनाचेनि पाल्वें । गाळूनि घेतलें
५ जें ऐसेहि । इये विज्ञानाचिये खोळे
हालवलेंही न गळे । तें परब्रह्म
६ म्हणूनि कर्ता मुदल न दिसे । आणि सेवीं कारणही काहीं
नसे । माजी कार्यचि आपैसें । वाढोंचि लागे
७ तैसें अविभूतादि आघवें । हें अविद्येचेनि पाल्वें
झाकलें तव मानावें । वेगळें ऐसें
तेचि अविद्येची जवनीक फिटे । आणि भेदभावाची अवधी तुटे
मग म्हणों एक होऊनि जरी आटे । तरी दोनी काय होती

८ तैंवीचि अहंभाव जाये । तरी ऐक्य तें आधींचि आहे

९ मग मनप्राणसंयम । हाचि हवनसंपदेचा संभ्रम
येणें संतोषविजे निर्धूम । ज्ञानानळ

१० ऐसेनि हें सकळ ज्ञानीं समर्पे । मग ज्ञान तें ज्ञेयीं हारपे
पाठी ज्ञेयाचि स्वरूपें । निखिळ उरे

११ तैंवी सदभ्यासें निरंतर । चित्तासि परमपुरुषाची मोहर
लावीं मन शरीर । राहो अथवा जावो
जें नाना गतींतें पावविते । तें चित्त वरील आत्मयातें
मग कवण आठवी देहातें । गेलें कीं आहे

१२ जें गगनाहुनि जुनें । जें परमाणूहूनि साने
जयाचेनि सन्निधानें । विश्व चळे
जें सर्वातें यया विये । विश्व सर्व जेणें जिये

१३ का झाकलिये घटींचा दिवा । नेणिजे काय जाहला केव्हा

१४ म्हणोनि वेदविद् नर । म्हणती जयातें अक्षर
जें प्रकृतीसी पर । परमात्मरूप

१५ पैं नित्य सेविला मी निदानीं । सेवक होय

१६ तया देहावसन जैं पावे । तैं तिहीं मातें स्मरावें
मग म्या जरी न पावावें । तरी उपास्ति ते कायसी ?

१७ मी आपुलियातें आपुलीकडे । सुखेंचि आणीं

१८ पेरी शरीराचिया सांडीं । असतेपण हेंचि साटली
वाचूनि चांद्रिका ते ठेली । चंद्रींच आहे

१९ ऐसें जे हें शरीर । तें ते न एवलोचि मुक्ती नर
जे होऊनि ठेले अपार । स्वरूप माझें

२० परी निवटल्यिाचें जैसें । पोट न दुखे

२१ शारदीयेचिये प्रवेशीं । अभ्रें जिरती आकाशीं
मग ग्रीष्मातीं जैसीं । निगती पुढती
तैसी ब्रह्मदिनाचिये आदी । हे भूतसृष्टीची मांदी
मिळे जव सहस्रावधी । निमित्त पुरे

२२ जैसें वृक्षपण बीजासि आलें । कीं मेघ हें गगन जाहालें
तैसें अनेकत्व जेथ सामावलें । तें साम्य म्हणिपे

२३ तैं तया नाव सहज अव्यक्त । आणि आकाराये तेंचि व्यक्त
हे एकातत्व एक सूचित । येऱ्हवीं दोनी नाहीं

२४ जें हें विश्वचि होऊनि असे । परी विश्वपण नासलेनि न
नासे । अक्षरें पुसिल्या न पुसे । अर्थ जैसा

२५ जयापरौता पैस न देखिजे । या नाम परमगती

२६ परी रावो पहुडलिया सुखें । जैसा देशींचा व्यापार न ठके
प्रजा आपुलालेनि अभिलाखें । करितीच असती

२७ जैसा न चलवितोनि रवी । लोक चाले

२८ पैं गेलिया जया ठाया । तो ठावोचि होइजे

२९ तैसा ससार जया गावा । गेलासाता पाढवा
होऊनि ठाके आघवा । मोक्षाचाचि

३० हा गा हातींचें जे वेळीं जाये । ते वेळीं आणिका लाभाची
गोठीकें आहे

३१ ह्ये पुनरावृत्तीन्नीं घराणीं । आघवीं एकवटती जयाचिया
प्रयाणीं । तो स्वरूपसिद्धींचा कहाणी । कैसेनि आइके

३२ ऐसिया अनादिया दोनी वाटा । एकी उजू एकी अव्हाटा

३३ कां जें मार्गामार्ग देखावें । साच लटिकें वोळखावें
हिताहित जाणावें । हिताचिलागीं

३४ तेंवीं जो उजू वाट देखे । तो अव्हांटा न वचे

३५ म्हणोनि योगमार्ग गोमटे । शोधिलें दोन्ही
तंव एकें ब्रह्मत्वा जाइजे । आणि एकें पुनरावृत्ती येइजे

३६ मग मार्गातें कासया शोधावें । कोणें कोठुनि कें जावें
जरी देशकाळादि आघवें । आपणचि असे

३७ जें विटे ना सारे । भोगीतयाचेनि पवाडें पुरे
पुढती महासुखाचें सोयरें । मार्तंडचि

## अध्याय नववा

श्रीकृष्ण पुढे म्हणाले—मी हे सर्व गुप्त ज्ञान तुला दिलें याचें कारण तुला तें मिळविण्याची तीव्र इच्छा आहे, आणि तें मिळाल्यास तू त्याचा अनादर करणार नाहीस अशी माझी खात्री आहे स्तनात दूध असतें पण त्याची गोडी स्तनांपेक्षा तें पिऊ इच्छिणाऱ्या वासराला अधिक असते. तसेंच कणगींतून बीं काढलें आणि तें सुपीक जमिनीत पेरलें. या उदाहरणात दूध व बीज या गुप्त धनाचा सदुपयोगच झाला कीं नाहीं? त्याचप्रमाणें अर्जुना, तुझ्यासारख्या आस्थेवाईक मनाच्या गुह्य ज्ञान सागणें हा सागण्याचा योग्य उपयोग होय. म्हणून तुला ज्ञान-विज्ञान वेगवेगळें स्पष्ट करून सागतों म्हणजे त्यातील गूढपणा जाईल. सर्वोत्तम ज्ञान म्हणजे स्वरूपज्ञान, ज्याला सर्व ज्ञानामध्य गुरुत्वाची आचार्य पदवी आहे तें सर्व धर्मांचें निजधाम आहे तें गुरुमुखातून निघालेलें दिसतें, पण हृदयात स्वयंभू असल्याप्रमाणें अनुभवाला येऊ लागत हे ज्ञान पूर्ण सुख देणार, श्रेष्ठ, कधीं हातातून न जाणारें, किंवा विकार न पावणारें. तथापि म्हटलें तर सोपेंच आहे यावर शका अशी कीं, मग तें ज्ञान लोक का मिळवीत नाहींत? त्याचें उत्तर हेंच कीं, त्याच्या नशिबात तें नसतें. रक्त व दूध दोन्ही जवळ असता गोचिड दूध टाकून रक्त पितो व तें दूध वासराला लाभतें कमळ व बेडूक एकत्र राहात असता भ्रमर कमळातील पराग सेवन करतो आणि बेडकाला चिखल मिळतो घराच्या तळघरात खूप मोहरा साठविल्या आहेत पण दुर्दैवानें त्याचें ज्ञान न झालें तर काय उपयोग? त्याप्रमाणें सर्व सुखाचा आराम असा मी हृदयात असता त्याला न ओळखून प्राणिमात्र विषयाची इच्छा करतात

दूरून मृगजळ पाहून तोंडातील अमृताचा घोट थुकावा, किंवा परीस टाकून देऊन शिंप घेऊन ती गळ्यात बाधावी त्याप्रमाणें हे दुर्दैवी लोक मला न ओळखून संसाराच्या नदींत गटागळ्या खात राहातात. राहाणाऱ्याला मी नाहीं कोठें? कारण जग हें सर्व माझ्या एकाचाच विस्तार आहे. जें मूळ विरजल्यासारखें असतें तें अव्यक्त तत्त्वच विश्वाच्या आकारानें पातळ होऊन पसरतें त्याप्रमाणें मूळ महत्तत्त्वापासून शेवटीं देहापर्यंत सर्व भूतें माझ्याच ठिकाणीं असतात मात्र तीं माझ्या ठिकाणीं असलीं तरी मी त्यामध्य नसतों.

मींच जर सर्व आहे तर सर्व प्राणी व सृष्टि माझ्यामध्य आ ना म्हणण्यात

काय अर्थ ? माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं भूताच्या कल्पनेचा आरोप करणें हा निव्वळ भास होय. घागरी मडकीं यांचे आकार मूळ जमिनींत (मातींत) नसतात, तर ते कुमाराच्या बुद्धीनें उत्पन्न होतात. कापसाच्या पोटात कापड नसतें, पण वस्त्र नेसणाऱ्याच्या दृष्टीनें कापूस हा वस्त्ररूप वाटतो. प्रतिध्वनींत मिळणारें उत्तर आणि आरशात मिळणारें प्रतिबिंब यांतील शब्द व रूप आपलेंच नसतें काय ? आपण स्वतःभोंवतीं गरगर फिरलों तर भोंवळ आल्यामुळें बाहेरचें जग फिरल्यासारखें वाटतें. मी विश्वाचा आत्मा आहें व भूतसमुदायाचा आश्रय असा भासतों. तथापि मी सूर्यकिरण आणि प्राणिमात्र हें मृगजळ इतकाच संबंध आहे. वेगळेपणा हा आभास होय त्याला केवळ कल्पना कारण असते. जितकें आकाश तितका वायु व जितका वायु तितकें आकाश. पण केवळ पंख्यानें हलविल्यामुळें वायु व आकाश हे वेगळे वाटतात.

ह्या कल्पनारूपी झोंपेचा मार्ग मोडणाऱ्याला मर्म आहे. तें वर्म म्हणजे माया व प्रकृति याची खरी ओळख मनाला ठेवणें. मीं त्या मायेचा अंगीकार केला म्हणजे जगाला आकार येतो, आणि मीं तिचा त्याग केला म्हणजे लाट पाण्यात विरावी तसें घडतें. विरजणामुळें पातळ दुधाचें घट्ट दहीं होतें, किंवा जमिनींत पेरलेल्या बियास ओलावा मिळाला म्हणजे त्यातूनच वृक्ष–वनस्पति निघतात, परंतु वस्तुत भूतसृष्टि करण्याला मला कांहींच कराव लागत नाही. लोक म्हणतात, अमुक नगर राजानें बांधलें पण तें प्रत्यक्ष बांधण्यात रचण्यात स्वतः राजाच्या हाताला कांहीं श्रम पडतात काय ? राज्यातील प्रजेला राज्यसत्तेचा आधार असतो, परंतु हा आश्रय देण्याकरिता म्हणून राजाला काय श्रम करावे लागतात ? स्वप्नात प्रवास केला किंवा झोंपेतून मनुष्य जागेपणात आला तर या मजलींत प्रत्यक्ष पाय दुखतात काय ? नाहीं. तीच गोष्ट सृष्टि उत्पन्न करण्यासंबधानें मलाहा लागू आहे. वनस्पति वाढण्याला जशी भूमि, किंवा पाण्यात चादण्याच्या वेळीं पसरलासा दिसणारा जसा चंद्र, तितकाच सृष्टीच्या उत्पत्तीला व व्यवहाराला मी कारण आहें, त्याहून अधिक नाहीं. मीं केवळ प्रकृतीचा स्वीकार केल्यानें हें सर्व घडतें. तथापि पर्वताच्या पोटातील वस्तूंना जसा पाऊस लागत नाहीं तसेंच प्रकृतिसृष्टीचें हें कार्य मला कोणत्याही रीतीनें बंधनकारक होत नाहीं. घरात दिवा जळत असता प्रकाश पडतो, त्यात कोणीं कांहीं करावें किंवा न करावें, परंतु दिव्याला त्याचें कांहीं नाहीं. पण हें करण्याला नुसता तर्क उपयोगी पडत नाहीं, अनुमान पुरत नाहीं. मृगजळानें जमीन ओली होत नाहीं किंवा पाण्यात

जाळ पसरल्यानें त्यात चद्रबिंब पकडता येत नाहीं त्याप्रमाणें केवळ तर्कानें माझ्या स्वरूपसर्गीचा बोध आकलन करता येत नाहीं स्थूल दृष्टीनें हें कळणारें नाहीं अशा दृष्टीला मी देहधारी दिसतों. त्याना वाटते कीं मी परमेश्वर देह धारी असून त्याना मी दिसतो परतु ती त्याची समजुन खोटी, असमंजस ही गमा नव्हे ! पाण्यात प्रतिबिंबित झालेली नक्षत्रें हीं मोत्यें नसतात. गारगोट्या रत्नासारख्या दिसतात व निळ्या रगाचा साप नील मण्याच्या माळेप्रमाणें दिसतो.

*परतु हं सर्व खोटें नव्हे काय ? पेज पिऊन अमृताचे फळ मिळवूं* पाहाणें, आणि मला परमेश्वराला देहधारी समजून माझ्या खऱ्या स्वरूपाचे ज्ञान मिळवू पाहाणें हीं दोनही व्यर्थ होत. हे लोक मला नावानें संबोधतात. कर्ते पणाचा आरोप मजवर करतात, मला पूजेचे उपचार करितात. मला ब्राह्मण-क्षत्रिय इत्यादि म्हणतात. मी अमुक ठिकाणचा अशी कल्पना करतात. मला रूप, अवयव चिकटवितात. वस्त्र नेसवितात. दागिने घालतात. नैवेद्य देतात तात्पर्य, माझें आवाहन व विसर्जन आपल्या इच्छेप्रमाणें करतात. फार काय, पण अवतारसमाप्तीच्या कारणानें मी मेला असेंही मानून दु ख करितात ! पण *मनुष्याचे हे सामान्य धर्म माझ्या अगीं लावणे हें विपरीत ज्ञान किंवा अज्ञान नव्हे काय ?*

अशा लोकाचें जीवित व्यर्थ होय त्याच्या कर्माचा धिक्कारच केला पाहिजे त्यानीं शास्त्राची वटवट करणें हं लहान मुलानीं शस्त्राच्या चित्राचे खेळ करणें, किंवा खाता येत नसता माकडानें झाडावरचे नारळ तोडणें, तसें होय. हे लोक *तमोगुणरूपी राक्षसीच्या तोंडात गेले असें समजावें. किंवा भ्रांतीच्या डुडात* बुडून मेले असें म्हणाना. पण ज्याच्या शुद्ध मन क्षेत्रात मी क्षेत्रसन्यासी होऊन राहातों, जे विचारी नित्यविरागी नित्यसतुष्ट सात्त्विक भावाचे आधारस्तंभ किंवा ब्रह्मानदानें पूर्ण भरलेले घट यासारखे असतात, ज्याच्या सहजकर्मात नीति जागृत असते, तेच लोक मला ऐक्यभावानें वाढत्या प्रेमानें भजू शकतात. अशा भक्ताच्या कीर्तनानें पापें नाहींशीं होतात. पापें मधून शुद्धता देणारीं तीर्थें निकामी होतात यमलोक मोकळे पडतात. योगक्रिये-शिवायच मोक्षाचा अनुभव घेतात व वैकुठात प्राणिमात्राची गर्दी करून सोडतात.

हे भक्त, भजक कधींही न मावळणारे सूर्य, सदा पौर्णिमेचे पूर्णचंद्र, कधींन वितळणारे मेघ किंवा कृपाळू सिंह होत. मी एक वेळ योग्यांच्या हृदयांत सांपडणार नाहीं पण भक्तांच्या मेळ्यात अवश्य सांपडेन. असे भजत्य संसाराच्या रणांगणात विकारावर विजय मिळविण्याचा पराक्रम व जयघोष करूं शकतात. त्याचेवर समरसतेचा अभिषेक होतो. त्यांचे डोक्यावर तन्मयतेचें छत्र झळकूं लागतें व ते आत्मानुभवरूपी राज्यसुख भोगतात. ज्यांना अष्टांग योगद्वारा माझें भजन करणें कठिण जातें असे इतर भक्त नमनभक्ति करतात. म्हणजे वस्तुमात्रांत परमात्माच आहे असें समजून लोटांगण घालतात. नम्रभावानें ते इतके लवतात कीं, जरी काहा फळांच्या ओझ्यानें वांकलेली वृक्षशाखा. स्वतःचा मानअपमान टाकून देऊन मद्रूप होतात. याशिवाय ज्ञानयज्ञानें भजणाऱ्या भक्तांचें वर्णन पूर्वी आलेच आहे. या ज्ञानयज्ञात संकल्प हा वध्य पशु बांधण्याचा खांब, पंचमहाभूतें हा यज्ञमंडप, द्वैतभावना हा वध्य पशु, इंद्रियें व प्राण ही यज्ञसामुग्री, चित्तसमता ही वेदी ( यज्ञकर्माचा ओटा ), ज्ञान हा अग्नि, अज्ञान हें त्यांत ओतण्याचें तूप, बुद्धि, शांति इत्यादि पत्न्याघमचे आणि जीव हा यज्ञकर्माचा धनी ' यजमान ' असें रूपक समजावें.- आणि हा यजमान जेव्हां आत्मैक्यभावनेच्या पवित्र जळानें अवभृत स्नान करतो तेव्हां ह्या ज्ञानयज्ञाची समाप्ति होते. हा ज्ञानयज्ञ करणाराला भिन्नता विविधता दृष्टीस पडली तरी त्यामुळें त्याचें ज्ञान भेदरूप होत नाहीं. सर्व जग त्याला अनुभवानें परमात्मरूपच होऊन जातें. माझी व्याप्ति व त्यांची प्रतीति म्हणजे अनुभव ही सारखींच ठरतात. त्यांच्या ज्ञानाला मागेंपुढें वरखालीं कांहीं नसतें. त्यांचे भजन न करतां सहज होत असतें, . . . . जें कांहीं करतात तें सर्व मला अर्पण होतें. कारण यज्ञ, यज्ञक्रिया, यज्ञसाधन हीं सर्व मीच आहें.

जगाचा पिता मी आहें व मीच माताही आहे, आणि पितामहही का म्हणाना. म्हणून सर्व शास्त्रांची एकवाक्यता माझ्या ठिकाणीं होऊन मतभेद मोडतात. मायेची परमगति व विश्रांतिस्थान व कर्मक्षेत्र मीच असून सर्व कांहीं माझ्या आज्ञेनें चालतें. वेदांचा उपदेश, सूर्याची हालचाल, जगाची हालचाल, जगाचें जीवन व मरण, हें सर्व माझ्यामुळें होतें. शरण आले त्याचें रक्षण करणारा मीच एक आहें. मीच सर्वांवर सारखा उपकार करतों. संकल्प, वासना, संस्कार हे सृष्टीच्या पुनरावृत्ति करण्याकरतां अमर राहातात तें ठिकाण मीच आहें. सर्व विनाशी व अविनाशी मिळून मीच आहें. प्राणिमात्र मद्रूप

त्याना तें उमगत नाही, इतकेंच काय तें वाटत चिंतामणी आढळला असता तो त्यायेनें दवडला असें ज्याना घडतें असेहि दुर्दैवी लोक असतात. त्याप्रमाणें ज्ञान टाकून अज्ञेरेन केलेलें सत्कर्माचरण फुकट जातें. अधल्याला गरुडाचे पख मिळाले तरी ते काय उपयोगी ? आश्रमधर्म पाळून, यज्ञ करकरून, सोमरस पी-पिऊन कोणी यज्ञमूर्ति झाला तरी त्यानें पुण्याच्या रूपानें खरें-खर पापच पदरात घेतलें असें समजावें कारण त्यानें यज्ञद्वारा माझें आराधन केलें, पण इच्छा केली स्वर्गसुखाची ! हा अज्ञानी लोकाचा पुण्यमार्ग होय.

नरकात दु ख आहे अशा समजुतीनें स्वर्गात सुख आहे अशी प्रतियोगी समजूत झाली आहे पण स्वर्ग व नरक या दोन्ही आडवाटा असून त्यात चोरच भेटावयाचे पुण्यात्मक पापानें स्वर्ग मिळतो आणि पापात्मक पापानें नरक मिळतो. पण स्वर्गाला नेणारें जें पुण्य म्हणून वरून दिसतें त्याच्या आत पाप भरलेलें असतें. कारण स्वर्गसुखाच्या इच्छेनें केलेल्या यज्ञान मी परमात्मा याज्ञिकाच्या जवळ न येता उलट दूरच जातों. म्हणून ज्यान प्रत्यक्ष सरळ माझी प्राप्ति होते तेंच खर शुद्ध पुण्य होय. आता स्वर्गात अनेक प्रकारचें सुख आहे हें खर. कारण तेथे अमरपणाचें सिंहासन, ऐरावताचें वाहन, महासिद्धींची समृद्ध भाडारें, अमृताचे हौद, कामधेनूचे कळप, देवादिकानीं बनलेला सेवकवर्ग, चिंतामणींची फरशी केलेली जमीन, कल्पवृक्षाचीं उद्यानें, गाण ऐकविण्यासाठीं गधर्व, नाच दाखविण्याला अप्सरा, विलासाकरता रमा व ऊर्वशी, शय्यागृहातील सेवेला मदन, सडासम्मार्जनाला चद्र, निरोप्याचें काम करण्याला वायु, आशीर्वाद देण्याला बृहस्पति आणि नित्य पक्तीला देवदेवता-हीं सर्व सुखें, भोग व ऐश्वर्यें यज्ञ करणाऱ्याला मिळतात. पण अशा रीतीनें मिळालेल्या इद्रपदाला क्षय लागून शेवटीं याज्ञिकाला मृत्युलोकाला परत यावें लागतें व गर्भधारणेपासून सर्व दु ख पुन्हा सोसावें लागतें.

तात्पर्य, हें सर्व सुख नश्वर. म्हणून यज्ञसाधन हें शाश्वत सुख मिळविण्याला अयोग्य ठरतें. खरें शाश्वत सुख केवळ एका परमेश्वराच्या ज्ञानानें मिळतें. कारण जे भक्त केवळ माझी सेवा करून जन्म घालवितात व एकनिष्ठेनें माझें चिंतन करतात, त्याचा सेवक मीच होतों व त्याचा सगळा योगक्षेम मीच चालवितों. त्याच्या सर्व मनकामना पूर्ण करतों. त्याना हवें-नको, इष्टानिष्ट, या सर्वांचा विचार व चिंता, त्याना तें सुचण्यापूर्वीं, मीच करतों अप्राप्ताची प्राप्ति व प्राप्ताचें

संरक्षण हें त्यांच्याकरतां मी करतों. आतां यज्ञ करणारे हे माझ्याकरतां म्हणूनच यज्ञ करतात. परंतु त्यांची भावना इंद्रपदाविषयीं असल्यानें ती वांकडी वाट ठरते. माझें भजन करावयाचें तर केवळ माझ्या भावनेनेंच ते केलें पाहिजे. माझें खरें ज्ञान झालें नाहीं आणि भजन केलें तर तें काय उपयोगी? चांगलीं फुलें आणलीं व तीं डोळ्यांवर बांधलीं, चांगलें पक्वान्न रांधलें व तें कानांत घातलें, मिळून मलत्याला भलतें केलें तर त्याचा काय उपयोग? खरा यज्ञभोक्ता मी असतां, यज्ञकर्म हें मला उद्देशून न करतां ते इंद्रादि देवांना भजतात म्हणून त्यांना माझी प्राप्ति होत नाहीं. त्यांना स्वर्गलोक किंवा पितृलोक मिळतो, किंवा तामस कर्माच्या उपासनेनें भूतवेताळादिकांची गति मिळते. पण ज्यांनीं प्रत्यक्ष मलाच जाणलें, व मलाच उद्देशून सर्व कर्में केलीं, ज्ञान मिळविलें, पुण्य संपादलें, माझाच लोभ धरला, माझेंच वेड लावून घेतलें त्यांना मरणापूर्वींहि माझ्याशीं ऐक्य घडतें.

मग मरणानंतर ते दुसरीकडे कोठें जातील? त्याना सायुज्य मोक्षच मिळणार. मात्र मी परमात्मस्वरूप जाणलें असा गर्व कोणी वाहील तर तें फुकट होय. मजपुढें स्वतः शंकर, किंवा स्वर्गांतील देवांना भातुकलींतील खेळाप्रमाणें खेळविणारी लक्ष्मी, यांचीहि किंमत नाहीं. लक्ष्मीलाहि मजकडे येण्याला आपलें ऐश्वर्य व मोठेंपण टाकून स्वतःकडे लहानपणा घ्यावा लागतो. मग सामान्य लोकांची काय कथा! उलट माझ्या भक्तीच्या उत्कर्षानें कोणीं एखादें फळ, फूल, पान मला दिलें आणि तें वाळलेलें किंवा कसलेंहि असलें तरी मी त्याचा स्वीकार करतों. त्या संतोषभरांत त्या भक्तानें मला स्वर्ग वैकुंठ यांतील सर्व संपत्ति दिली असें मी मानतों. त्यांतच भव्य मंदिरें, रत्नालंकार, सुगंधी पदार्थांचे डोंगर, सूर्यानें मढविलेल्या दीपमाळा, कामधेनूंचे कळप, सर्व कांहीं मिळालें असें मी समजतों. मी पोह्यांकरितां सुदामदेवाच्या पुरचुंड्या आपल्या हातानें सोडल्याच कीं नाहीं? पण मला कांहीं न देतांहि केवळ माझें स्मरण ठेवून व अहंकार टाकून तुझ्याकडून होणारें स्वाभाविक सहजकर्महि मला अर्पण केलेंस तरी पुरें आहे. कारण त्या कर्मांतील फळाचा स्वार्थ तूं न ठेवलास तर तुला पुन्हां जन्म घेण्याचें कारणच नाहीं. म्हणून ही फलत्यागाची युक्ति एकदम अमलांत आण. असें करणारे भक्त आणि मी हे वटवृक्ष व बीज यां-प्रमाणें एकरूपच होऊं. वायूबरोबर फुलांतील सुवास निघून जातो, मग देठावर फूल मात्र ओस राहतें, त्याप्रमाणें भक्ताचा देह मात्र आयुष्याच्या मुठींत अडकून राहतो. बाकी तो माझ्या स्वरूपांत मिसळून गेलेला असतो. भक्त हा

कोणत्याहि जातीचा किंवा पूर्वी पापाचरण करणारा असला तरी तो सर्वतोपरी उत्तमच ठरतो जो बुडत होता तो नदीच्या कडेला पोहोचून वाचल्यावर त्याची बुडण्याची भीति कोठें राहिली ! अशाला पश्चात्तापानें पवित्र व श्रेष्ठ कुळात जन्म, किंवा योगाध्ययन, तपाचरण या सर्वांचें श्रेय मिळतें एकनिष्ठेच्या पेटींत मानवबुद्धि घालून भक्तानें ती पेटी विश्वासानें माझ्या स्वाधीन केली मग त्याला काय चिंता? दिव्यानें दिवा लावावा त्याप्रमाणें तो मद्रूप व सतेज होतो एरवी इतर सर्व प्रकारच्या ऐश्वर्याचा पसारा निष्फळ ठरतो झाड मोडेल इतक्या निंबोळ्या फळाला आल्या तरी ती केवळ कावळ्याचीच धन उत्तम पक्वान खापरात वाढून चवाठ्यावर ठेवले तर कुत्राच त्याला तोंड लावणार.त्याप्रमाणे भक्तिहीन लोकाना पाप हुडकीत येतात,पण पुण्यें त्याना टाळून निघून जातात माझा भक्त हा पशु असला तरी चालेल याला उदाहरण गजेंद्राचेंच ज्या लोकानीं सर्व मनोवृत्ति मलाच अर्पिल्या व त्या अर्पूनच जे जीवन वाहतात, ते दुष्ट जातीत जन्मलेले किंवा अविद्वान् किंवा राक्षस असले तरी ते माझ्यासारखेच ठरतात राजाच्या हुकमाची अक्षरें ज्यावर उमटविली आहेत असे कातड्याचे तुकडेहि चलनी नाण्याप्रमाणें व्यवहाराला उपयोगी पडतात उलट ही अक्षरें नसलेलें सोनेंरुपेंहि चलन होत नाहीं कोणा व्यक्तीची कोण जात किंवा कोण लिंग हे घेऊन मला काय करावयाचें ? परिसावर पडलेला घण हा लोखंडाचा असूनहि त्याचें सोनेंच होतें गवळणी त्या काय ? पण भक्तीने त्या मद्रूप झाल्या कंस हाहि भीतीनें का होईना मद्रूपच झाला त्याचप्रमाणें यादव हे नात्यानं, वसुदेवादि ममत्वानं नारदादिकाना भक्तीने मद्रूपता आली अशा रीतीनें मद्रूप होण्याच्या साधनाना तोटा नाहीं, पण माझ्याशी दृढ संबंध आला पाहिजे मग जे वेदविद्येचे माहेरघर जे सत्याचा आधार, असे पुण्यवान् ब्राह्मण ते मला येऊन मिळतील यात काय आश्चर्य ! चंदनाच्या सान्निध्यानें लिंबालाहि योग्यता येते, मग स्वत चंदनाला ती असणारच क्षत्रिय असून ऋषि झालेलेहि असेच हा मृत्यलोक अनेक दुःखानीं भरलेला आहे त्या दुःखाचा वर्षाव उघड्या अंगावर न घेता माझी भक्ति ही सरक्षणाकरता अंगा वर ढालीप्रमाणें धरली तर दुःखनिवारण होईल मृत्युलोकचा सर्वच व्यवहार विपरीत असतो कारण ज निव्वळ दुःखच आहे त्याला विषयभोगाला मनुष्य हा सुख मानतो पायाला जखम झाली तर लोक आपलें मस्तक तोडून त्या जख मेवर उपचार म्हणून बाघतील, निखाऱ्यावर अथरुण म्हणून निजतील, मृत्यु

लोकची रचना क्षणभंगुर आहे हें त्याना कळत नाहीं. ज्यापासून इहलोक-परलोक या दोहोंचा लाभ मिळणार त्या व्यवहारावर लोक एक पै देखील मांडवल घालीत नाहींत आणि सर्वस्वाची हानि होणार अशा व्यवहारावर कोट्यवधि रुपये खर्चतात. म्हाताऱ्याला तरुणापेक्षा आयुष्य कमी आणि मृत्यु अधिक जवळ असें असता त्याला वडील म्हणून नमस्कार करतात आणि ज्या वाढदिवसानें मृत्यु एक वर्ष अलीकडे येतो तो समारंभानें साजरा करतात. मृत्यु टाळण्याचा उपाय करावयाचा नाहीं आणि मेल्यावर मात्र रडत बसावयाचें. सापाच्या तोंडात सापडलेला बेडूक जीभ काढून माशी धरून खातो, त्याप्रमाणें मृत्यूच्या पाशात सापडलेलें आयुष्य वाहणारा मनुष्य विषयोपभोग घेत असतो. असो. माझें ध्यान ठेवून त्यापुढें आपले संकल्प जो धूपदीपासारखे जाळतो तोच माझें खरें यजन करतो.

---

## ( ९ व्या अध्यायांतील निवडक वचनें )

१ परी मौढी न बोलें होजी । तुम्हा सर्वज्ञाच्या समाजीं
देयावें अवधान हे माझी । विनवणी सलगीची

२ अमृताचिया ताटीं वोगरूं । ऐसी रससोय कैंची

३ तैसें तुमचें अवधान धायें । आणि तुम्ही म्हणा हें होये
ऐसें वक्तृत्व कवणा आहे । जेणें रिझा तुम्ही

४ बाळक बापाचिये ताटीं रिगे । आणि बापा जेंव जेववूं लागे

५ रोषें प्रेम दुणवटे । पढियंतयाचेनि

६ कां जैं दिठिवा तुमचा वरुषे । तै सकळार्थसिद्धि मती पिके
येऱ्हवीं कोंमेला उन्मेष सुके । जरी उदास तुम्ही

७ सहजें तरी अवधारा । वक्तृत्वा अवधानाचा होय चारा

८ म्हणौनि संवादाचा सुवावो ढळे । तऱ्ही हृदयाकाशा सारस्वतें [ वोळे
आणि श्रोता दुश्चित तरी वितुळे । मांडला रस

९ म्हणवूनि वक्ता तो वक्ता नोहे । श्रोतेनिविण

१० परी आमुचिये जीवींचें पडो । तुझ्या जीवीं
११ तैसें जें जाणितलेयासाठीं । संसार संसाराचिये गांठीं
 छात्रूनि बैसवी पाटीं । मोक्षश्रियेच्या
१२ पैं गा आणिकही एक याचें । जें हाता आलिया तरी न वचे
 आणि अनुभवितां कांहीं न वेंचे । वरी विटेहि ना
१३ तरी पवित्र आणि रम्य । तेवींचि सुखोपाय सुगम्य
 आणि सुसुख परम धर्म्य । वरी आपण पां जोडे
१४ हें अव्यक्तपणें थिजलें । तेंचि मग विश्वाकारें वोथिजलें
 तैसें अमूर्त मूर्तिमय विस्तारलें । त्रैलोक्य जाणे
१५ तैसी इये निर्मळ माझ्या स्वरूपीं । जो भूतभावना आरोपी
 तयासि तयाच्या संकल्पीं । भूताभास असे
१६ परियेसीं गा प्रियोत्तमा । यापरी मी विश्वेंसीं विश्वात्मा
 जो इया लटकिया भूतग्रामा । भाव्य सदा
१७ तैसें भूतजात माझ्या ठायीं । कल्पिजे तरी आमासे कांहीं
 निर्विकल्पीं तरी नाहीं । तेथ मीचि मी आघवें
१८ सर्व भूतें अव्यक्तीं । ऐक्यासि येती
१९ अगा नगर हें रायें केलें । या म्हणण्या साचपण कीर आलें
 परी निरुतें पाहातां काय सिणले । रायाचे हात ?
 जैसी रायें अधिष्ठिली प्रजा । व्यापारे आपुलालिया काजा
 तैसा प्रकृती संग माझा । येर करणें तें इयेचें
 म्हणोनि भूतें हन सृजावीं । कां सृजिलीं प्रतिपाळावीं
 इये करणीं न येती आघवीं । आमुचिया आंगा
२० तो जैसा कां साक्षिभूतु । गृहव्यापारप्रवृत्तिहेतु
 तैसा भूतकर्मीं अनासक्तु । मी भूतीं असें
२१ अथवा भूतें माझ्या ठायीं । आणि भूतांमाजीं मी नाहीं
 या खुणा तूं कंहीं । चुकों नको

२२ परी मृगजळाचेनि वोल्हाशें । काय मृगी तिमे
२३ जैसें स्वर्गीचेनि अमृतें । अमर नोहिजे
येतुलेनि अनामा नाम । मज अक्रियासि कर्म
विदेहासि देहधर्म । आरोपिती
२४ मज अकुळाचें कुळ वानिती । मज नित्याचे निधनें शिणती
मज सर्वांतरातें कल्पिती । अरि मित्र गा
२५ जव आकार एक पुढा देखती । तव हा देव येणें भावें भजती
मग तोचि बिघडलिया टाकिती । नाहीं म्हणौनि
२६ म्हणवूनि ज्ञानचि तें आधारें । ज्ञानासि करी
२७ जेथ आसेचिये लाळे । आत हिंसा जीभ लोळे
तेवींचि असंतोषाचे चाकळे । मसड चघळी
जेथ द्वेषाचिया दाढा । खसखसा ज्ञानाचा करिती रगडा
जे त्वगस्थि गवसणी मूढा । स्थूळबुद्धी
२८ तरी जयाचे चोखटे मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसन्यासीं
जया निजेल्यातें उपासी । वैराग्य गा
२९ जयाचिया आस्थेचिया सद्भावा- । आंत धर्म करी राणिवा
जयाचें मन ओलावा । विवेकासी
३० जया भक्तीची येतुली प्राप्ती । जे कैवल्यात परतें सर म्हणती
जयाचिये लीलेमाजीं नीति । जियाली दिसे
३१ तरी कीर्तनाचेनि नटनाचें । नाशिले व्यवसाय प्रायश्चित्ताचे
जें नामचि नाहीं पापाचें । ऐसें केलं
३२ कहीं एकाचेनि वैकुंठा जावें । तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें
ऐसें नामघोषगौरवें । धवळलें विश्व
३३ तो मी वैकुंठीं नसें । वेळ एक भानुबिंबींही न दिसें
वरी योगियांचींही मानसें । उमराडोनि जाय

३४ तयावरी जैत रे जैत । म्हणौनि ध्यानाचें निशाण वाजत
दिसे तन्मयाचें झळकत । एकच्छत्र
३५ तरी ज्ञानयज्ञ तो एवरूप । जेथ आदिसंकल्प हा यूप
महाभूतें मंडप । भेद तो पशु
३६ मग तो जीव हे भाप सरे । आब्रह्म परमात्मबोधें भरे
ऐसे भजती ज्ञानाध्वरें । एकत्वें येणें
३७ म्हणौनि विश्व भिन्नभिन्न । परी न भेदे तयाचें ज्ञान
जैसे अवयव तरी आनआन । परी एकचि देहींचे
तेविं नानाविधा व्यक्ती । आनानें नामें आनानी वृत्ती
ऐसें जाणती भेदला मूर्ती । अभेदा मातें
३८ अखंड सकळ हें सकळा मुखीं । सहज अर्पत असे मज एकीं
३९ आणि जाहालें जग जेथ राहे । जेणें जीवित वाढत आहे
तें मीवाचूनि नोहे । आन निरुतें
४० मियाचि नियमिल्यासाता । काल ग्रासितसे भूता
४१ मीचि एक अनेकपणें । वेगळालेनि प्रकृतिगुणें
जीत जगाचेनि प्राणें । वर्तत असें
४२ बीज शाखातें प्रसवे । मग तें रूखपण बीजीं समावे
तैसें संकल्पें होय आघवें । पाठीं संकल्पीं मिळे
४३ ऐसे दीक्षित जे सोमप । जे आपणचि यज्ञाचें स्वरूप
तिहीं तया पुण्याचेनि नावें पाप । जोडिलें देखें
४४ म्हणौनि मजवीण पाविजे स्वर्ग । तो अज्ञानाचा पुण्यमार्ग
४५ स्वर्ग नरक या वाटा । चोराचिया
स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे । पापात्मकें पापें नरका जाइजे
मग मातें जेणें पाविजे । तें शुद्ध पुण्य
४६ मग मी न पविजे ऐसें । जें पापरूप पुण्य असे
तेणें लाधलेनि सौरसें । स्वर्गा येती

४७ मग तया पुण्याची पाउठी सरे । सवेंचि इंद्रपणाची उटी उतरे
आणि येऊं लागती माघारें । मृत्युलोका

४८ ऐसे अनन्यगतिकें चित्तें । चिंतितसाते मातें
जे उपासिती तयातें । मीचि सेवीं

४९ ते एकवटूनि जिये क्षणीं । अनुसरले गा माझिये वाहणी
तेव्हांचि तयाची चिंतवणी । मजचि पडली

५० पाहें पां शाखा पल्लव रुखाचे । हे काय नव्हती एकाचि बीजाचे
परी पाणी घेणें मुळाचें । तें मुळींचि घापे

५१ मनें वाचा करणीं । जयाचिया भजनीं देवाचिया वाहणीं
ते शरीर जातिवेक्षणीं । देवचि जाले

५२ ऐसे जे चेष्टामात्रें । भजले मज
ते मरणा ऐलीचकडे । मज मिळोनि गेले पुढे
मग मरणीं आणिकीकडे । जातील केवीं

५३ एथ जाणीव करी तोचि नेणें । आथिलेपण मिरवी तेंचि उणें
आम्ही जाहालों ऐसें जो म्हणे । तो कांहींच नव्हे

५४ म्हणौनि थोरपण पन्हां साडिजे । एथ व्युत्पत्ती आघवी विसरिजे
जै जगा धाकुटें होइजे । तैं जवळीक माझी

५५ याळागीं शरीरसाडोवा कीजे । सकळ गुणाचें लोण उतरिजे
संपत्तिमद साडिजे । कुरवंडी करूनी

५६ पैं भक्ती एकी मी जाणें । तेथ सानें थोर न म्हणें
आम्ही भावाचे पाहुणे । भलतेया

५७ तें क्रियाजात आघवें । जैसें निपजेल स्वभावें
तें भावना करोनि करावें । माझिया मोहरा

५८ तें टाणिलें मज कर्म । तेव्हांचि पुसिलें मरणजन्म
जन्मासवे श्रम । वरचिलही गेले

५९ तेवीं आम्हा तया परस्परें । बाहेर नामाचींचि अंतरें
वाचूनि आतुवट वस्तुविचारें । मी तेचि ते
६० परिमळ निघालिया पवनापाठीं । मागें वोस फूल राहे देठीं
तैसें आयुष्याचिये मुठीं । केवळ देह
६१ यालागीं दुष्कृती जन्ही जाहाला । तरी अनुतापतीर्थी न्हाला
न्हाऊनि मजआत आला । सर्वभावें
६२ पवित्र तयाचें कुळ । आभिजात्य तेंचि निर्मळ
जन्मलेयाचें फळ । तयासीच जोडलें
६३ जैसा दीपें दीप लाविजे । तेथ आदील कोण हें नोळखिजे
तैसा सर्वस्वें जो मज भजे । तो मीचि होऊनि ठाके
६४ तैसें माझिये भक्तीविण । जळो तें जियालेपण
अगा पृथ्वीवरी पाषाण । नसती काई
६५ म्हणौनि कुळ उत्तम नोहावें । जाती अंत्यजही व्हावें
वरी देहाचेनि नावें । पशूचेंही लाभो
६६ ते पापयोनीही होतु का । ते श्रुताधीतही न होतु का
परी मजसीं तुकिता तुका । तुटी नाहीं
३७ राजाज्ञेचीं अक्षरें आहातीं । तियें चामा एका जया पडती
तया चामाघाठीं जोडती । सकळ वस्तु
वाचूनि सोनें रुपें प्रमाण नोहे । एथ राजाज्ञाचि समर्थ आहे
६८ म्हणौनि कुळ जाति वर्ण । हें आघवेंचि गा अकारण
एथ अर्जुना माझेपण । सार्थक एक
६९ अगा मी एकलाणीचें खागें । मज येवों ये भलतेनि मार्गें
भक्ति का विषय विरागें । अथवा वैरें
७० यालागीं पापयोनीही अर्जुना । का वैश्य शूद्र अंगना
मातें भजता सदना । माझिया येती

७१ म्हणौनि राजर्षी का ब्राह्मण । जया गति मति मीचि शरण
तया त्रिशुद्धी मीचि निर्वाण । स्थितीही मीचि
७२ तेवीं विषयाचें जें सुख । तें केवळ परम दुःख
परी काय कीजे मूर्ख । न सेविता न सरे
७३ म्हणौनि मृत्युलोकीं सुखाची कहाणी । ऐकिजेल कवणाचिये [ श्रवणीं
कैंची सुखनिद्रा आथरुणीं । इगळाच्या
जिये लोकींचा चंद्र क्षयरोगी । जेथ उदय होय अस्तालागीं
दु ख लेऊनि सुखाची आगी । सळित जगातें
७४ जो बहुवे विषयविलासें गुफे । तो म्हणती उवाई पडिला सापें
जो अभिलाषभारें दडपे । तयातें सज्ञान म्हणती
जयाचें आयुष्य थाकुटें होय । बळ प्रज्ञा जिरौनि जाय
तयाचे नमस्कारिती पाय । वडिल म्हणुनी
७५ तू मन हें मीचि करीं । माझिया भजनीं प्रेम धरीं
सर्वत्र नमस्कारीं । मज एकातें

## अध्याय दहावा

श्रीकृष्ण म्हणाला—घागरींत थोडें पाणी घातलं आणि तें गळून गेलें नाहीं असें पाहिलें म्हणजे तांत आणखी पाणी घालतात कोणाचा थोडासा प्रामाणिकपणा दिसून आला तर त्यावर आणखी विश्वास टाकावा ही जगाची रीतच आहे किंवा डोंगर दिसला म्हणजे ही जागा बसण्याला योग्य आहे असें पाहून मेघ मंडळ त्यावर बसतें, किंवा क्षाराची पुटें दिल्यानें सोन्याला कस चढतो, त्याप्रमाणें बोध करण्याला तूं योग्य आहेस असें पाहून मीच अतृप्त होऊन तुला आणखी सांगत आहें तें ऐक मुलाच्या अंगावर अलंकार घातलेले पाहून आईच्या डोळ्यांना बरें वाटतें, त्याप्रमाणें तुला बोध दिला आणि तो तूं घेतलास हें पाहून तुला आणखी सांगावेंसें वाटतें तें असें —मी मर्यादित नसून विश्वव्यापी आहे पोटांतील गर्भाला ज्याप्रमाणें आईचें वय कळत नाहीं त्याप्रमाणें, किंवा माशाला समुद्राचें माप कळत नाहीं त्याप्रमाणें, देव किंवा मोठमोठे ऋषि यानांहि माझें ज्ञान यथार्थ होत नाहीं तथापि जो भक्त सर्व बाह्य वृत्ति टाकून, पंचमहाभूतावर आरूढ होऊन, मी ( कृष्ण ) अनादि आहें, मुख्य ईश्वर आहें, असें जाणतो त्यालाच माझी खरी ओळख पटते तो सामान्य मनुष्यांत देहधारी असा एक दिसला तरी त्याचा मनुष्यपणा हा आभास असतो, पण तो खरोखर सत्यज्ञानाची मूर्ति असतो कापरांत पाढरा हिरा मिसळला तरी अंगावर पाणी पडल्यावर कापूर विरघळून जाईल आणि हिरा जसाच्या तसाच राहील अशा भक्ताच्या अंगचीं पापें त्याला सोडून जातात

चंदनवृक्षाला साप विळखा घालून बसतो, पण तें झाड जळूं लागलें म्हणजे साप त्याला सोडून जातो, त्याप्रमाणें ज्ञानाग्नीनें दग्ध झालेल्या जीवाला पाप व संकल्प सोडून जातात भूतादिकांचे भाव मूळ माझ्यापासूनच उत्पन्न होतात आणि निरनिराळ्या प्राण्यामध्यें त्यांच्या त्यांच्या प्रकृतीनुसार ते भाव शिरतात कांहीं भाव मला कळून व कांहीं मला न कळूनहि उत्पन्न होतात प्रकाश हा जसा सूर्यापासून, तसाच अंधारहि प्रकाशाच्या अभावानें उत्पन्न होणारा म्हणून सूर्यापासूनच म्हणावा लागतो, त्याप्रमाणें माझ्या अज्ञानामुळें कांहीं भाव उत्पन्न होतात उदा० सुख दुःख, भय अभय, कीर्ति अपकीर्ति, हे परस्परविरुद्ध भावहि माझ्यामुळेंच उत्पन्न होतात स्वर्गादि त्रैलोक्याची मांडणी नीट नव्हती ती करण्याकरितां मीं कश्यपादि सात महर्षि व चार

मनु उत्पन्न केले. मी बीजरूप असून त्यातूनच बुंधा, फांद्या, डहाळ्या, पानें, फुलें, फळें अशा क्रमानें सर्व सृष्टि उत्पन्न होते. मी निर्मिलेल्या लोकपालांपासून सर्व प्रजा झाली आहे, म्हणून हे सर्व एकरूपच होत. अभेदज्ञान हा खरा भक्तियोग हें पूर्वी सांगितलेंच आहे. सृष्टीच्या उत्पत्तीप्रमाणें तिची स्थितिहि मजमध्येंच आहे. माझें ज्ञान असलेले आत्मज्ञानी त्रैलोक्यांत सुखानें व्यवहार करितात. माझ्या स्वरूपाच्या प्रतीतीनें तृप्त होऊन जन्ममरण विसरतात. आणि दोन सरोवरांचें पाणी उसळलें म्हणजे एकमेकांत मिसळतें, किंवा दोन नद्या एकमेकींना मिळतात, त्याप्रमाणें माझे भक्तहि एकमेकांना मिळून आनंदरूप लाटांच्या माळा गुंफतात व त्यांजमध्यें ऐक्यरसाचा संगम होतो. मग ते प्रकट रीतीनें तृप्तीचा उद्गार बाहेर काढीत व गर्जना करीत, किंवा गुरु–शिष्यांप्रमाणें एकांतांत बसून दिल्याघेतल्या उपदेशाच्या रूपानें आनंदाचें सेवन करीत. मात्र हे दोघेहि स्वतःला विसरून जातात. त्यांना दिवसरात्रीचें भान राहत नाहीं. अशांना ज्या प्रेमाचा लाभ होतो तो त्यांनीं, स्वर्ग व मोक्ष यांच्या आडमार्गाला न जातां, स्वतः आपणच मिळविलेला असतो. तरी पण मी त्यांना तो आनंद दिला असें तें भलेपणानें बाहेर सांगतात. म्हणून माझें कर्तव्य हें कीं, मुलाला आवडेल ती वस्तु त्याची आई सोन्याची करून देते, त्याप्रमाणें भक्ताच्या उपासनेचा अधिकार मी वाढवितों. त्यांच्या एकनिष्ठतेची आवड मला असते. तसेंच माझें कौतुकहि भक्ताला असतें. स्वर्गसुखाची इच्छा करणाऱ्यांना तें मी मिळवून देतों, परंतु अहंकारनिरपेक्ष असें जें नाजुक प्रेमसुख तें मी प्रेमळ भक्तांकरितां राखून ठेवतों. त्यांच्या पुढें ज्ञानरूपी कापराची मशाल पेटवून त्यांचा मशालजी मीच होतों, व त्यांच्या मार्गांतील अज्ञान दूर सारतों.

नंतर अर्जुनानें श्रीकृष्णाची स्तुति करून म्हटलें, कीं देवा, देवर्षि नारदाच्या तोंडून मी तुझें स्वरूपवर्णन ऐकत होतों. पण वस्तुतः त्याच्या त्या गोड गाण्याचाच आनंद घेऊन तुष्ट होतों. त्यांतील खरें मर्म कळून नव्हतें. व्यासादि ऋषींनीं केलेल्या उपदेशाचेंहि असेंच झालें. पण, श्रीकृष्णा, तूं स्वतः आतां जें सांगितलेंस त्यामुळें मात्र सर्व कांहीं खरें कळलें. मनुष्य नेहमीं उद्योग करीत असतो, परंतु दैव अनुकूल होतें तेव्हांच त्या उद्योगाचें फळ मिळतें. तशीच गोष्ट आतांहि घडली आहे. गुरुकृपेचें दैव मला लाभलें. माळ्यानें बागेवर पुष्कळ मेहनत केली, तरी वसंत ऋतु येतो तेव्हांच फळाफुलांचा लाभ होतो. ज्वर उतरला म्हणजे अन्न गोड लागूं लागतें त्याप्रमाणें हें झालें आहे. कारण

केवळ जीवबुद्धीच्या सामर्थ्यावर तुझें ज्ञान होणें शक्य नाहीं. एरवीं वेदादिकांनीं तुझें स्वरुप कळल्याची बढाई उगीच हवी तशी मारावी यांत काय अर्थ ! तुझें स्वरुप जाणण्याला व समजून सांगण्याला तुला तूंच योग्य आहेस. इतर जलाशय जवळ असतां केवळ मेघांतून पडेल तेवढेंच पाणी चातकाला मिळणार. असो. तर आतां मला तूं आपल्या सर्व विभूति सांग, म्हणजे तुझ्या स्वरूपाची थोरवी कळेल. कारण त्यांच्या दर्शनानें तुझें स्मरण होईल. अमृत पुरे असें म्हणवत नाहीं तसेंच तुझें हें बोलणें. मग त्यांत पुनरुक्ति झाली तरी चालेल. रोज उगवतो म्हणून सूर्य कांहीं शिळा होत नाहीं.

हें ऐकून श्रीकृष्ण म्हणाला—ऐक ! माझ्या विभूति असंख्य आहेत. अंगावरील केसांसारख्या अगणित. तथापि त्यांतील कांहींचें ज्ञान झाल्यानें बाकीच्या विभूति व मुख्य स्वरुपाचें ज्ञान होऊं शकतें. प्रत्येक प्राणिमात्राचा आत्मा आहे तो मी आहें. आंतबाहेर आदिअंतीं सर्व मी आहें. सर्वांचें आश्रयस्थान मी आहें. इतकें बोलून देवानें विभूतींचीं नावें सांगितलीं तीं हीं. ( या सर्व विभूतींचें वर्णन गीतेच्या श्लोकांतील आहे. त्यांत ज्ञानेश्वरांनीं स्वतःचें विशेष कांहीं घातलेलें नाहीं म्हणून त्या सर्व विभूति येथें सांगितल्या नाहींत ). पृथ्वीतील परमाणु, आकाशांतील नक्षत्रें, यांची गणती कोण किती करील ? म्हणून उदाहरणादाखल पंचाहत्तर सांगितल्या, त्यांत एक कमी वा एक जास्त महत्त्वाची अशी मानावयाची नाहीं. आणि समारोपानें सांगावयाचें तर तें असें कीं, ज्या ज्या प्राण्यांच्या ठिकाणीं आणि वस्तूंच्या ठिकाणीं संपत्ति आणि दया, ऐश्वर्य आणि दया दिसतील त्या सर्वांना माझ्या विभूति समजाव्या. अशा पुरुषांची आज्ञा सर्व लोक मानतात. सूर्य सर्व जगाला एकदम प्रकाश देतो, किंवा कामधेनु सर्व कामना एकदम सफळ करूं शकते, त्याप्रमाणें हे लोक असतात. माझ्याविषयीं सामान्य–विशेष हा भेद नाहीं. मी एकांशानें सर्व जग व्यापतों म्हणून कोणत्याहि एका विभूतीच्या ज्ञानानें माझें सर्व ज्ञान होऊं शकेल. म्हणून सर्व विभूतींना सारखेंच भजावें.

## ( १० व्या अध्यायांतील निवडक वचनें )

१ तुमचा अनुग्रहो गणेश । जै आपुला दे सौरस
तैं सारस्वतीं प्रवेश । बाळकाही आथि

२ केउता कल्पतरुवरी फुलौरा । कायसेनि पाहुणेर क्षीरसागरा
कवणें वासीं कापुरा । सुवास देवों ?

३ का साडेपधरया रजतवर्णीं । तैसीं स्तुतीचीं बोलणीं
उगियाचि माथा ठेविजे चरणीं । हेंचि गलें

४ तैसी जे ब्रह्मविद्यारावो । सकळशास्त्राचा विसवता ठावो
ते भगवद्गीता वोविये गावों । ऐसें केलें
जे बोलणियाचे रानीं हिंडता । नायकिजे फळलिया अक्षराची [ वार्ता
परी ते वाचाचि केली कल्पलता । विवेकाची

५ होती देहबुद्धी एकसरी । ते आनंदमांडारा केली वोवरी
मग गीतार्थक्षीरसागरीं । जळशयन जालें

६ अहो गुळा साखरे माल्याचे । वावे तरी एकचि रसाचे
परी स्वाद गोडियेचे । आन आन जैसे
एक जाणोनिया बोलती । एक ठायेंठाय जाणविती
एक जाणों जाता हारपती । जाणते गुणेंसीं

७ देशियेचेनि नागरपणें । शांत शृंगारातें जिणें
तरी वोविया होती लेणें । साहित्यासी

८ जैसें आगानेनि सुंदरपणें । लेणिया आंगचि होय लेणें
तेथ अळंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना

९ तैसी देशी आणि संस्कृत वाणी । एका भावार्थाच्या सुखासनीं
शोभती आयणी । चोखट आइका

१० तैसें देशियेचें लावण्य । हिरोनि रसा आणिलें तारुण्य

११ अरचितयावरी सर्व सांडिजे । मग चोख तरी तोचि मांडारी कीजे

१२ पुढतपुढती पुढें देता । जोडे वानियेची अधिकता
म्हणौनि सोनें पाडुसुता । शोधूचि आवडे

१३ मी कवण पा केतुला । कवणाचा कै जाहला
या निरुनी करिता बोला । कल्प गेले

१४ उतरलें उदक पर्वत वळघे । जरी झाड वाढत मूळीं लागे
तरी मिया जालेनि जगें । जाणिजे मातें

१५ तो पाषाणामाजीं परिस । जैसा रसाआत सिद्धरस
तैसा मनुष्याआत तो अश । माझाचि जाण
तें चालतें ज्ञानाचें बिंब । तयाचे अवयव ते सुखाचे कोंम
येर माणुसपण तें माव । लौकिक भाग

१६ आणि माझें जाणणें नेणणें । तें तंव भूताचिया भावाचें करणें
म्हणौनि मूर्ती भावाचिया होणें । विषम पडे

१७ तेथ अध्यक्ष रचूनि ठेविले । इहीं जन

१८ पाहें पा आरंभीं बीज एकलें । मग तेंचि विरूढलिया बुड जाहालें
बुडीं कोंम निघाले । खादियाचे

१९ पल्लवीं फूल फळ । एव वृक्षत्व जाहालें सकळ
तें निर्धारिता केवळ । बीजचि आघवें

२० यालागीं सुभद्रापती । हे भाव इया माझिया विभूती
आणि याचिया व्यापी । व्यापिलें जग

२१ म्हणयूनि अभेदें जो भक्तियोग । तेथ शका नाहीं नये खग

२२ जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवत
हा भक्तियोग निश्चित । जाण माझा

२३ जैसीं जवळिकेचीं सरोवरें । उचबळलियां काळवती परस्परें
मग तरगांसी घवळारें । । तरंगचि होती

२४ जैसी कमळकलिका जालेपणें । हृदयींचिया मकरंदातें राखों नेणे
दे राया रंका पारणें । आमोदाचें
तैसेंचि मातें विश्वीं कथित । कथितेनि तोपें कथूं विसरत
मग तया विसरामाजीं विरत । आंगें जीवें

२५ तें जो जो खेळ दावी । तो तो पुढें सोनयाचा करूनि ठेवी
तैसी उपास्तीची पदवी । पोपित मी जायें

२६ परी आपणपेंवीण जें एक । तें तैसेंचि सुख साजुक
सप्रेमालागीं देख । ठेविलें जतन

२७ तयां तत्त्वज्ञान चोखटा । दिवी पोतासाची सुभटां
मग मीचि होऊनि दिवटा । पुढां पुढां चालें

२८ आजी आयुष्या उजवण जाहली । माझिया दैवा दशा उदयली

२९ तूं या कालयंत्रासि सूत्री । तूं जीवकळेची अधिष्ठात्री
तूं ब्रह्मकटाहधात्री । हें कळलें फुडें

३० विषयविषाचा पडिपाडू । गोड परमार्थ लागे कडू
कडू विषय तो गोडू । जीवासी जाहाला

३१ म्हणौनि माग्य जैं सानुकूळ । जालियां केले उद्यम सदा सफळ
तैसें श्रुतार्थीत सकळ । गुरुकृपा साच

३२ तैसें हें तुझें जाणणें आहे । म्हणौनि कोणाही ठावकें नोहे
आतां तुझें ज्ञान होये । तुजचिजोगें

३३ जरी थोरी तुझी पाहत आहों । तरी पार्शी उमे ठाकावयाही योग्य
या शोच्यतां जरी विनवूं विहों । तरी आन उपाय नाहीं [ नोहों

३४ जी कैसें मियां तूतें जाणावें । काय जाणोनि सदा चिंतावें
जरी तूंचि म्हणों आघवें । तरी चिंतनचि न घडे

३५ जया जया भावाचिया ठार्यी । तूतें चिंतितां मज सायास नाहीं
तो विवळ करूनि देईं । योग आपुला

३६ जें मंदराचळ न ढाळितां । क्षीरसागर न डहुळतां
अनादि स्वभावतां । आइतें आहे
३७ हां गा सूर्ये काय शिळा । अग्नि म्हणों येत आहे वोंविळा
का नित्य वाहतया गंगाजळा । पारसेपण असे !
३८ जे माझियाचि परी माझिये मती । आकळतीना
३९ जैसें बीज आलिया मुठी । तरूचि आला होय
४० तेवीं देखिलिया जिया देखवलें । विश्व सकळ
४१ तेवीं आदि स्थिती । अंतगती भूतांसि मी
४२ अशेषांही वाचां—। माजीं नटनाच सत्याचा
तें अक्षर एक मी वैकुंठींचा । वेल्हाळ म्हणे
४३ जगाचीं शुभाशुभें लिहितीं । प्राणियांच्या मानसांचा झाडा घेती
मग केलियानुरूप होती । भोगनियम जे
४४ जैशीं अवघींचि नक्षत्रें वेंचावीं । ऐसी चाड उपजेल जैं जीवीं
तैं गगनाची बांधावी । लोथ जेवीं
का पृथ्वीये परमाणूंचा उगाणा घ्यावा । तरी भूगोलचि काखे
तैसा विस्तार माझा पाहावा । तरी जाणावें मातें [ सुवावा
जैसें शाखांसीं फूल फळ । एकिहेळां वेटाळूं म्हणिजे सकळ
तरी उपडूनियां मूळ । जेवीं हातीं घेपे
४५ मेरुमंदरादिकीं सर्वी । सहित पृथ्वीतें विरवी
जो एकार्णवातेंही जिरवी । जेयींचा तेथें
४६ ऐसा अपार जो काळ । तो मी म्हणे लक्ष्मीलीळ
मग पुढती सृष्टीचा मेळ । सृजिता तो मी
४७ आणि ते गा मी वाचा । सुखासनीं न्यायाच्या
आरूढोनि विवेकाच्या । मार्गी चाले

४८ जेणें चोखाळत दिसे न्याय । तो व्यवसायात व्यवसाय
४९ अगा दमितयामाझारीं । अनिवार दंड तो मी अवधारीं
जो मुंगियेलागोनि ब्रह्मावेरीं । नियमित पावे
पैं सारासार निर्धारितया । धर्मज्ञानाचा पक्ष धरितया
सकळ शास्त्रामाजीं यया । नीतिशास्त्र तें मी
५० येरां विभूतिविस्तारासि काहीं । एथ सर्वथा लेख नाहीं
५१ म्हणोनि सानें थोर न म्हणावें । उच नीच भाव सांडावे
एक मीचि ऐसें मानावें । वस्तुजातातें
५२ तेवीं विश्वविभव तया आंगें । होऊनी असती
५३ तरी आता साधारण आणि चांग । ऐसा कैसेनि पां कल्पावा
वाया आपुलिये मती वंग । भेदाचा लावावा [ विभाग
५४ तेवीं माझ्या स्वरूपीं गोठी । सामान्यविशेषाची नाहीं

# अध्याय अकरावा

अर्जुन म्हणाला—देवटच्या विश्रांतीच्या ठिकाणीं व वेळीं तुमचें जें रूप त मला वर्णनान कळलें, मला स्वरुपज्ञान झालें. माझा अहकार जाऊन स्वतःच्या देहाचा अभिमान व कौरवाशीं न लढण्याचा विचार हा पाहा मीं टाकून दिला ! देवा, तू मला वेळींच सुविचार सागितला. माझें वेड घालविलें, माझी शुद्धि मला परत दिली. तुमच्या कृपेच्या मदिरात शिरून मी अमृतरसाचें भोजन आता करीत आहें. माझा उद्धार झाला. वेदानीं वर्णिलेलें तुझें महात्म्य मला पटलें. माझ्या मनावरील ढग गेले. माझ्या ज्ञानावर आलेलें शेवाळें दूर झालें. सर्प-विद्याच इत्यादि दूर होउन मला माझें गुप्त धन मिळालें. माझ्या बुद्धील परब्रह्माचें शेजघर लाभलें. तथापि तुझ अमर्याद स्वरूप जें कानानीं ऐकतों त डोळ्यानीं पाहावें अशी इच्छा झाली व उत्कठा लागली आहे. तुझें विश्वरूप पाहण्याची माझी पात्रता आहे कीं नाहीं हें मला कळत नाहीं. कारण इच्छेच्या जोरानें व उत्कठेनें मनुष्य आपली योग्यता विसरतो. ती योग्यता मजमध्यें नाहीं असें तुला वाटेल तर वेगळें. आपल किरणामृत चकोराप्रमाणें इतर प्राण्याना सेवू शकत नाहीं हें माहीत असलें तरी, तें सेवन करण्याची इच्छा कोणा प्राण्याला झाल्यास चद्र त्याला प्रतिबध करीत नाहीं. तू शत्रुनाहि मोक्ष देतोस. पूतन शिशुपाल, यानाहि तू ध्रुवाप्रमाणें स्थान दिलेंस. पतित अजामीळ, तुझ्या छातीवर लाथ मारणारा भृगु व शखासुर इत्यादिकावरहि तू उपकार केलेस, बळीचा द्वारपाल झालास. उलट मी तर तुझा भक्त, तुझें वासरू आहें.

हे ऐकून श्रीकृष्णाला आनद झाला व त्याने एकदम सर्वच विश्वरूप प्रकट केलें. त्यानें अनत ब्रह्माडाचें रूप घेतलें, स्थूल दृष्टि दूर केली, व आता हें सर्व नीट पाहा असें अर्जुनाला सागितलें. त्यात अर्जुनाला असें दिसलें कीं, सर्व तऱ्हेच्या परस्परविरुद्ध अशा गुणाचीं आकाररूपें प्रकट झालीं होतीं. त्यात सर्व रग होते. सौंदर्य कुरूपता या सर्वाचें प्रदर्शन होतें., सर्व सूर्य, अष्ट वसू, रुद्रगण, अश्विनादि देव, सर्व वायु हीं सर्व तेथें होतीं. प्रत्येक केसागणिक अनेक ब्रह्माडें वर खालीं नाचत होती. तें पाहून अर्जुनाचे डोळे दिपले. तेव्हा विश्वरूप पाहण्याला योग्य अशी दृष्टि श्रीकृष्णाना अर्जुनाला दिली. अर्जुनाच्या प्रेमामुळें श्रीकृष्ण त्याला सर्व प्रकारें स्वाधीन झाले व त्याचे सर्व हेतु पुरवू लागले.

म्हणून दिव्य दृष्टि देताच अर्जुनाच्या डोळ्यापुढील अंधकार नाहींसा झाला. अर्जुनाला सर्वच चमत्कारमय भासू लागलें. तो आश्चर्यांत बुडून गेला. कारण वर खालीं हें काहीं उरलें नाहीं. आकाश नाहींसें झालें. विश्वरूपानें सृष्टीची रचना गिळली. तें पाहून अर्जुनाला एकाग्रता आली. जणू काय त्याच्या ज्ञानावर मोहनास्त्र पडलें. मग तेथें त्यानें काय पाहिलें याचें वर्णन कोण करणार ? कृष्णाचीं काहीं मुखें पाहावीं तर सुंदर शोभिवंत, तर काहीं प्रलयाग्नीच्या महाकुंडाप्रमाणें भयंकर. तात्पर्य, त्यानें विश्वरूपाचें आदिअंत नसलेले शिखात पाहिलें. जें जें मनात आणावें तें तें दिसे. अलंकार, शस्त्रें, सर्व काहीं दिसलें. त्यानें सर्व अवयव पाहून घेतले. कंठ, मस्तक, मुकुट, त्यावरील फुलांचे घोस, गळ्यातील फुलांचे हार, चंद्राच्या घड्या घालून बनवावी तशी शुभ्र चंदनाची उटी इत्यादि त्याला दिसलें. मग त्यानें डोळे मिटून घेतले तरी विश्वरूप निरनिराळ्या चमत्कारानीं दिसतच राहिलें. कारण दिव्य दृष्टीमुळें, डोळे मिटले तरी किंवा अंधारातहि, दिसतेंच. पाहण्याची वस्तु व पाहणारा हा भेद निघून गेला. अंतःकरणात ब्रह्मानंद जागृत झाला. सर्वांगावर रोमांच व घर्मबिंदु उभे राहिले. कापूरकेळीच्या गाभ्यातून गळणाऱ्या कापुराच्या कणांप्रमाणें अर्जुनाच्या डोळ्यातून अश्रु गळू लागले. सात्त्विक भावात स्पर्धा सुरू झाली.

मग फिरून द्वैतावस्थेंत येऊन, अर्जुनानें आपण विश्वरूपात काय काय पाहिलें याचें वर्णन केलें आणि तो म्हणाला कीं, विश्वाचा असा पसारा मांडणारा जो तू तोच फिरून आमच्या रथावर सारथी, हें पाहून मला आश्चर्य वाटलें. मी विश्वरूपात पाहिलेला मुकुट आता तुझ्या डोक्यावर आहे. तरी पण तू एकाएकीं विश्वरूप कसें धारण केलेंस याचें आश्चर्य वाटतें. देवा, तूच परब्रह्म आहेस, सदासिद्ध व धर्माचा जिव्हाळा-ओलावा, साऱ्याच्या पलीकडच्या तत्त्वापलीकडचा सदतिसावा, अलौकिक पुरुष आहेस. मात्र हें विश्वरूप पाहून भय वाटून मी गडबडलों. अधीनें पोळलेला मनुष्य देह शांत करण्याकरिता समुद्राकडे यावा, पण समुद्राच्या उसळणाऱ्या लाटा पाहून भ्यावा व परत फिरावा तसें मला झालें आहे. सर्व देव, पितर, गंधर्व, देवता, वसु, सिद्ध हे सर्व तुला वंदितात. मला अशी भीति वाटू लागली आहे कीं, या विश्वरूपदर्शनानें माझा देह तर नष्ट होईलच, पण चैतन्यरूप आनंदाचा अंश असा जो अंतरात्मा त्यालाहि भयानें शहारे आले. म्हणून हें विश्वरूप तूं आता आवरून घे, तरच माझे प्राण वाचतील. तूं मायाजालिका आवरून घे. विश्वरूप दाखीव असें म्हणण्याची बुद्धि मला कोठून

झाली असें आता वाटत. मी माझ मला व जगताला अस्खलित विघ्न केलें की काय ? पूर्वी विभूतीच्या रुपान व्यापक स्वरूप मला कळले तेवढ पुरें नव्हतें का ?

पण अर्जुनाचा हा शोक व्यर्थ होता. कारण विश्वरूपदर्शनात भिवविणें हा श्रीकृष्णाचा हेतु नसून, मी कौरवाना मारणारा असा जो भ्रम अर्जुनाला झाला होता तो दूर करणें एवढाच तो हेतु होता. म्हणून या विश्वरुपात सर्व विश्व नाहींसें झालेलें दिसलें, तेथें कौरवपांडवाचा काय पाड ! त्या सगळ्याचा चुराडा झालेला तेथें दिसलाच की ! सर्वांचा काळ हा सगळे खाऊन पिरून निमल्या चारीत आहे, तेथें शिल्लक काय उरणार ? हें सर्व पाहून कोणाला भीति कधी न वाटेल ? म्हणून अर्जुन म्हणाला देवा, तूं आपल भगवतपण, म्हणजे पालन करण्याचा स्वभाव, परत अगीं आण म्हणजे सर्वांची भीति दूर होईल

श्रीकृष्ण म्हणाला—मी सर्वांचा काळ आहें, परतु पाडवाचा सरक्षक आहे सैन्याना व सेनापतींना आम्ही मारू, नाश करू, सहार करू, असा जो गर्व तुला झाला तो नष्ट करणें एवढाच माझ्या विश्वदर्शनाचा हेतु होता तो सफळ झाला म्हणून भिऊ नको. तूच शत्रूना मार आणि यश मिळीव आणि मला निमित्त पाहिजे तें करून दे मी या तुझ्या सर्व शत्रूना आतून आधींच मारिलें आहे, तेंच त्याना तू बाहेरून मार म्हणजे झालें तुला राज्य व यश दोन्ही मिळतील आणि सर्व लोक ती कथा आपल्या वाणीन सागू लागतील

तेव्हा अर्जुन म्हणाला—श्रीकृष्णा, तू म्हणतोस हें खर, पण तू काळ अस लास तरी सृष्टीच पालन करणेंच योग्य अशा वेळीं जगाचा सहार कसा करावा ? सहाराचा वेळ असते. तरुणपणीं म्हातारपण येऊ शकत नाहीं उत्पत्ति, स्थिति व लय याचा क्रम अनादिकालापासून ठरीव आहे

श्रीकृष्ण म्हणाला—अरे ! मी जें बोललों, म्हणजे सहार करीन असें म्हटलें, तें रणागणावरील या दोन सैन्यापुरतें आहे बाकीच्या सृष्टीला आत लागू नाहीं

अर्जुन म्हणाला—हे राक्षसादिक तुझ्या चरणाला न लागता का पळून गेले ? पण मीं हें तरी का विचारावें ? प्रकाशापुढ अंधार कसा टिकेल ? तुझें रूप प्रकट झाल्यावर ते कसे टिकतील ? तू पुराण पुरुष आहेस प्रकृति-पुरुषाचें मूळ आहेस. अनादि आहेस. जगाचें जीवन आहेस यम, अग्नि, वरुण, चद्र, ब्रह्मदेव इत्यादि सर्व तू आहेस असें म्हणून अर्जुनानें त्याला पुन्हा पुन्हा

नमस्कार केला व तो फिरून म्हणाला, तुझें हें खरें स्वरूप न जाणता तू आमचा आप्त एवढेंच नातें लक्षात ठेवून मी तुझ्याशीं वागलों. सम्मार्जनाकरिता सडा घालण्याच्या कामीं त्याऐवजीं मीं अमृत फुकट दवडलें, कामधेनु देऊन बदल्यात ढिंगरू घेतलें, परिसाला दगड मानून पाया भरण्याकडे त्याचा उपयोग केला, कल्पवृक्ष तोडून त्याचीं कुंपणें उभारलीं, ओढाळ गुराना हाकण्याकरिता रत्नाचा दगडासारखा उपयोग केला. तुझ्यासारख्याला असल्या क्षुद्र युद्धाकरिता सारथी करून बसवणें म्हणजे परमात्म्याला व्यवहाराला गुंपण. हेंहि असेच अप्रयोजकपणाचें नव्हे का ? अगदीं नातलगासारखे आम्ही तुझ्याबरोबर वागलों, विनोद केला, आदरातिथ्य स्वीकारलें, रुसलों, हट्ट केले, खेळात सल्गी-झोंबाझोंबी केली, दिलें ते माहून मागून घेतलें. आणि वरती आम्ही तुझें काय लागतों असें म्हणालों ! फार काय, स्वतःला शहाणे समजून तुला शहाणपणाच्या गोष्टी की रे सांगितल्या. अशा रीतीनें आम्हा अनेक अपराध केले त्याची तू क्षमा कर. आता मात्र तुझें महात्म्य मला कळलें, तुझ्या बरोबरीचा कोणीच नाहीं. मग तुझ्याहून मोठा कोण असणार ? पतिव्रता पतीशीं मन मोकळें करून बोलते त्याप्रमाणे माझ्या मनातलें सर्व आज तुजपुढें बोललों. मला विश्वरूपदर्शन दे असें मीं म्हणणें म्हणजे सोंगट्या खेळण्याला नक्षत्राचे फासे, किंवा चदाचदी खेळण्याला चद्राचा चेंडू, मुलानें आईला मागावा त्याप्रमाणें पोरकटच नव्हतें काय ? तू माझे सर्व लाड पुरविलेस, सर्व गुह्य ज्ञान सांगितलेंस, पण फिरून वाटतें कीं, तुला कटकटून भेटावें. तुझ्याशीं बोलावें म्हटलें तर विश्वरूपातील अनंत मुखें काय कामाचीं ? म्हणून आता हें विश्वरूप आवरून फिरून तुझें नेहमींच श्यामसुंदर चतुर्भुजरूप घेऊन दर्शन दे. तुझें नीलवर्ण रूप पाहिले म्हणजे पाचेच्या रत्नाला सुगंध सुटावा, किंवा आनंदाला ज्ञान यावें तसें वाटतें. ती वैजयंती, तो मुकुट, ती गदा, सर्व कांहीं पुन्हा दिसू दे.

हें ऐकून श्रीकृष्णाला मोठें आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, हें विश्वरूप तुलाच म्हणून दाखविलें. याहून अधिक चांगलें दुसरें मानू नकोस. अमृताचा समुद्र पिववत नाहीं, किंवा सुवर्णाचा पर्वत उचलून नेता येत नाहीं म्हणून त्याचा कोणी अनादर करीत नाहीं, त्याप्रमाणें विश्वरूप पाहिल्यावर चतुर्भुजरूपाची इच्छा करणें योग्य नव्हे. तुझी अशी गडबड कासावीस का व्हावी ? माझ्या चतुर्भुजरूपापेक्षा माझें विश्वरूप हेंच खरोखर उपासनेला अधिक योग्य आहे. न भिता विश्वरूपाचे ठिकाणीं प्रेम ठेव. पण अर्जुनाला हें पटत नाहीं असें

पाहून श्रीकृष्णान पुन्हा सगुण रूप धरलें प्रयम एखाद रत्न मागून घ्यावें व मग त्यात काहीं खोड काढावी, किंवा एखादी नवरीमुलगी पाहून नापसत करावी व मग ती पटत नाहीं असें सागाव त्याप्रमाणें हें घडलें. पण अर्जुनाचा तोहि हट्ट श्रीकृष्णानें पुरविला ठीकच आहे त्व हा मर्यादित वस्तु तत् या ब्रह्मदर्शक शब्दात मावणारच. विश्वरूप आवरून तो विस्तार मनुष्यदेहात सामावून घेणें हे समुद्रानें आपली भरती आपल्यातच रिचवून घ्यावी त्याप्रमाणें, किंवा दुकानदार वस्त्र सगळें उलगडून दाखवून त्याची पुन्हा पूर्ववत् घडी घाल्तो त्याप्रमाण, श्रीकृष्णाला शक्य होतें व तसेंच त्यानें केलें मग अर्जुनाला वाटलें कीं, आपण व श्रीकृष्ण यामध्य विश्वरूपाचा जो पडदा विनाकारण आला होता तो निघून गेला हें बरें झालें आणि फिरून पूर्वीसारखें कुरुक्षेत्र व तीं सैन्य, तो रथ, तो सारथी, सर्व काहीं दिसल तेव्हा अर्जुनाला हायस वाटलें चुकलेल्या मुलाला जणू काहीं आईनेभेटून तिनें त्याला स्तनपान दिलें. मग कृष्णानेंहि त्याला सागितलें कीं, माझ विश्वरूप पाहण कठिण आहे हेहि काहीं खोटें नाहीं, व तें पाहण्याला एका भक्तीवाचून दुसर साधन नाहा म्हणून मी तुला भक्तिमहात्म्य सागतों त श्रवण कर

---

## ( ११ व्या अध्यायांतील निवडक वचनें )

१ जेथ शातांचिया घरा । अद्‌भुत आला आहे पाहुणेरा
आणि येराही रसा पातिकरा । जाहाला मान
अहो वधूवराचिये मिळणीं । जैसीं वराडियाही लुगडीं लेणीं
तैसे देशियेच्या सुखासनीं । मिरवले रस
२ नातरी अवसेच्या दिवसीं । भेटलीं बिंबें दोन्हीं सरसीं
तेवीं एकवळा रसीं । केला एथ
३ तीरें सस्कृताचीं गहनें । तोडोनि मऱ्हाटी शब्दसोपानें
रचिलीं धर्मनिधानें । श्रीनिवृत्तिदेवें
४ जेथ शाततादुभुत रोकडे । आणि येरा रसा पडप जोडे
हें अल्पचि परी उघडें । कैवल्य जेथ

५ कां करविलेनि चोजें न रिझे । बाळका माय ?
तैवीं मी जें जें बोलें । तें प्रभु तुमचेंचि शिकविलें
६ हें सारस्वताचें गोड । तुम्हींचि लाविलें जी झाड
तरी आता अवधानामृतें वाड । सिंपोनि कीजे
७ म्हणोनि समर्थ जें जें करी । तें न हों न ये चराचरीं
८ आणि न पुरोंचि जरी म्हणें । तरी विश्वरूप देखिलियाविणें
सुख नोहेंचि परी जिणें । तेंही विपायें
९ अहो वासरू देखिलियाचिसाठीं । धेनु एडवदोनि मोहें उठी
मग स्तनामुखाचिये भेटीं । काय पान्हा धरे
१० होतों उदकाचिया आर्ती । रोहिणी पीत
११ केउती मृगजळाची वृष्टी । वडवानळेंसीं
१२ जळचर जळाचा आभार धरी। बाळक स्तनपानीं उपरोध करी
तरी तया जिणया श्रीहरी । आन उपायो असे
म्हणोनि भीडसाकडी न धरवे । जीवा आवडे तेंही बोलावें
१३ आणि जी आर्तीचेनि पडिभरें । आर्त आपली ठाकी पैं विसरे
जैसा तान्हेला म्हणे न पुरे । समुद्र मज
१४ तुझें औदार्य जाणों स्वतंत्र । देता न म्हणसी पात्रापात्र
पैं कैवल्यापेसें पवित्र । वैरियाही दिधलें ।
१५ बाप उदार देव अपरिमित । याचक स्वेच्छा सदोदित
असे सहस्त्रवरी देत । सर्वस्व आपुलें
१६ जो जागता स्वप्नावस्थे जाये । तो जेवीं स्वप्नींचें आघवें होये
१७ एकें जननलीलाविलासें । एकें पालनशीळें लालसें
एकें संहारकें सावेशें । साक्षीभूतें एकें
१८ एकें शुद्धस्फटिकसोज्ज्वळें । एकें इंद्रनीळसुनीळें
एकें अंजनवर्णे सकाळें । रक्तवर्णे एकें

१९ वदनींचिया वाफेसवें । होत ज्वाळामय आघवें
१० वातायनाचेनि प्रमासें । उडत परमाणु दिसती जैसे
भ्रमत ब्रह्मकटाह तैसे । अवयवसंधीं
२१ जें अतींद्रिय म्हणोनि व्यवस्थिलें । केवळ ज्ञानदृष्टीचिया भागा
तें तुम्हीं चर्मचक्षूंपुढें सूदलें । मी कैसेनि देखें [ फिटलें
२२ साच विश्वरूप जरी आम्हीं दावावें । तरी आधीं देखावयास साम-
र्थ्य कीं द्यावें
२३ पढविलें पाखिरू ऐसें न बोले । यापरी क्रीडामृगही तैसा न चले
२४ तीं अक्षरें नव्हती देखा । ब्रह्मसाम्राज्यदीपिका
अर्जुनालागीं चित्कळिका । उजळलिया श्रीकृष्णें
२५ दिशाचे ठावही हारपले । अवोध्वें काय नेणों जाहाले
चेइलिया स्वप्न तैसे गेले । लोकाकार
२६ मग तेथ सैंघ देखे वदनें । जैसीं रमानायकाचीं राजभुवनें
नाना प्रगटलीं निधानें । लावण्यश्रियेचीं
२७ कीं आनदाचीं वनें सासिन्नलीं । जैसी सौंदर्या राणीव जोडली
२८ तव नानावर्णें कमळवनें । विकासिलीं तैसें अर्जुनें
नेत्र देखिले पालिंगनें । आदित्याचीं
तेथेंचि कृष्णमेघाचिया दाटी- । मार्जी कल्पात विजूचिया फुटी
तैसिया वन्हिपिंगळा दिठी । भ्रूमगातळीं
२९ परब्रह्म आपुलेनि आगें । ल्यावया जाहाला आपणचि अवेगें
३० आपण आग आपण अळकार । आपण हात आपण हतियार
आपण जीव आपण शरीर । देखे चराचर कोंदलें देवें
३१ जयांचिया किरणाचे निखरेपणें । नक्षत्राचे होत फुटाणे
तेजें खिरडला वह्नि म्हणे । समुद्रीं रिघों
३२ कैसें मनुग्रहाचें करणें । पार्थाचें पाहणें आणि न पाहणें
तयाही सकट नारायणें । व्यापूनि घेतलें

३३ का आकाशीं गधर्वनगर । मृतळीं पिपीलिका बांधे घर
नाना मेरूवरी सपूर । परमाणु जैसे
३४ वार्षिये प्रथमदशे । वोहळल्या शैलाचें सर्वांग जैसें
विरूढे कोमलांकुरीं तेसे । रोमांच जाहाले
३५ मार्जी सापडलेनि आलिकुळें । जळावरी कमळकळिका जेवीं
तेवीं आतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरी कांपे [ आंदोळे
३६ परी या तुझिया रूपांआंत । जी उणीव एक असे देखत
जे आदि मध्य अंत । तीन्ही नाहीं
३७ जी एकेकीच्या अंगपातीं । होय जाय हे त्रिजगतीं
एवढियाही तुझ्या आंगीं मूर्तीं । कीं रोमा जालिया
३८ पैं चंद्र चंडांशु डोळा । दावितोसि कोपप्रसाद लीळा
एका रुससी तमाचिया डोळा । एका पाळितोसि कृपादृष्टि
३९ वणिवेनि पेटले पर्वत । कवळूनि ज्वाळांचे उमड उठत
तेसी चाटीत दाढा दांतात । जीभ लोळे
४० सुख दूरीं गेलें तरी प्राण । विपायें धरी जग
४१ देवा अविद्यार्णवीं पडिलों । जी विषयवागुरें आतुडलों
स्वर्गसंसाराचिया सांकडलों । दोहीं भागीं
४२ जी लोचना भाग्य उदेलें । मना सुखाचें सुयाणें पाहलें
जें अगाध तुझें देखिलें । विश्वरूप इहीं
४३ कैसा वारया प्रतुर्वात चढला । समुद्र कीं महापूरीं पडिला
विषाग्नि मारा प्रवर्तला । वडवानळासी
४४ आणि पाताळव्याळाचिया फूत्कारीं। गरळज्वाळा लागती अंबरीं
तैसी पसरलिये वदनदरी- । मार्जी हे जिव्हा
४५ महो देह पार्थिव कीर जाये । ययाची काकुळती कवणा आहे
परी आता चैतन्य माझें विपायें । वाचे कीं न वाचे

४६ ऐसें विश्वरूपाचिया महामारी । जीवित्व गेलें आहे चराचरीं
४७ आले मरणरसाचे लोंढे । आम्हावरी
४८ आता मुललों मी दिशा न देखें । आपणपें नेणें
४९ साटवी पसारा हा मागुता । महामारीचा
५० म्हणौनि वेगीं प्रसन्न होई देवराया । सहरीं सहरीं आपुली माया
कार्ढी मातें महामया— । पासोनियां
५१ अहा माग्या विपरीता । विघ्न उठिलें शाति करिता
कटकटा विश्व गेलें आता । तू लागलासि ग्रासूं
५२ कटकटा घातया । कैसें जहालें अनुग्रहा यया
मिया प्रार्थुनि जगा बापुडिया । आणिलें मरण
५३ म्हणौनि मोग्य तें त्रिशुद्धी न चुके । आणि बुद्धीही होणार सारि-
माझ्या कपाळीं पिटावें लोकें । तें लोटेल काह्या [ खी ठाके
५४ आता हा जळता वारा कें वेंटाळें । कोणा हें विषा भरलें गगन
५५ परी सिसाळें मुकुटेंसीं । पडिलीं दाढाचे साडसीं [ गिळे ॰
पीठ होत कैसीं । दिसत आहाती
५६ परी याचिया मुखा निभ्रात । न सुटेचि कांहीं
५७ आणि येतुल्यिाही आरोगण । करिता भुके नाहीं उणेपण
कैसें दीपन असाधारण । उदयलें यया
५८ तैसें आहाराचे नावें कांहीं । तोंडापासूनि उरलेंचि नाहीं
कैसी समसमित नवाई । भुकेलेपणाची
५९ बोल इतियेराहूनि तिखट । दिसती अग्निपरिस दासट
मारकपणें काळकूट । मद्गुर म्हणत
६० आतां कोल्हेरिचे वेताळ । तैसे निर्जीव हे आहाती
हालविती दोरी तुटली । तरी तियें खांबावरील बाहुलीं
मलतेनें लोटिलीं । उलथोनि पडती
६१ आपणचि आडासिळा कीजे । तो कौतुकें जैसा विंघोनि पाडिजे

६२ नातरी महामेघांचे उमाळे । घडघडीत एके वेळे
 का घुमघुमिला मंदराचळें । क्षीराब्धि जैसा
६३ कैसेनि आंगींचें तारुण्य काढावें। कैचें नव्हे तें वार्धक्य आणावें
६४ काय मध्यान्हीं सविता । मावळत आहे ?
६५ तूं सकळविश्वजीवन । जीवांसि तूंचि निधान
 भूतभविष्याचें ज्ञान । तुझ्याचि हातीं
६६ तव तंव नमस्ते । नमस्तेचि म्हणे
 आणिक स्तुतीही नाठवे । आणि निवातही नसवे
६७ परिसाचा खडवाचि जोडला । कीं फोडूनि आम्हीं गाडोरा
 कल्पतरू तोडोनि केला । कूप शेता [ घातला
६८ देवाचिया भोगायतनीं । खेळतां आशंकेना मनीं
 जी रिगोनिया शयनीं । सरिसा पहुडें
६९ तूं वर्णनीय परी शोभें । मातें वर्णिसी या सभे
 तरी मियां वरिगजे क्षोभे । अधिकाधिक
७० नातरी प्राणाचें सोयरें भेटे । मग जीवें भूतलीं जियें संकटें
 तिथें निवेदितां न वाटे । संकोच काहीं
७१ ऐसा कृतकृत्य केलों स्वामी । बहु लळा पाळिला तुम्हीं
७२ किंबहुना ऐसें पूर्वी । दृष्ट ना श्रुत
 तें हें विश्वरूप आपुलें । तुम्हीं मज डोळां दाविलें
 परी आता ऐसी चाड जीवीं । जे तुजसीं गोठी करावी
७३ जवळीक हे भोगावी । आलिंगावयासी
७४ कैसें नीलोत्पलातें रावित । आकाशाही रंग लावित
 तेजाची वोज क्षावित । इंद्रनीळा
७५ जैसा परिमळ जाहाला मरगजा । का आनंदासि निघालिया
 ज्याचे जानुवरी मकरध्वजा । जोडली बरव [ भुजा

७६ इंद्रधनुष्याचिये आडणी-। मार्जी मेघ गगनरंगणीं
७७ कोण हे वस्तु पावला आहासी । तया लाभाचा तोष न घेसी
७८ तें हें तुवा अनायासें । विश्वरूप देखिलें जैसें
इथे मनुष्यलोकीं तैसें । न फावेची कवणा
दैवें चिंतामणी लेइजे । कीं हें ओझें म्हणोनि साडिजे ?
कामधेनू दवडिजे । न पोसवे म्हणोनि ?
आग साडोनि छाया । आलिंगितोसि मा
हें रूप जरी घोर । विकृत आणि थोर
तरी कृतनिश्चयाचें घर । हेंचि करीं
७९ वस्तु घेउनि वाळिजे । जैसें रत्नासि दूषण ठेविजे
नातरी कन्या पाहूनिया म्हणिजे । मना न ये हे
८० जैसें स्वपद हें आघवें । तत्पदीं सामावे
अथवा द्रुमाकार साठवे । बीजकणिकें जेवीं
८१ हो का जे कृष्णाकृतीचिये मोडी । होती विश्वरूपपटाची घडी
ते अर्जुनाचिये आवडी । उकलूनि दाविली
८२ तेथ ग्राहकीये नव्हेचि लाग । म्हणोनि घडी केली पुढती
८३ काय काळातें जिणोनि आला । कीं महावात मागा साडिला
आपुलिया बाहीं उतरला । सातही सिंधु
८४ इंद्रियें प्रवृत्ती मुरली । वाचा वाचकपणा चुकली
ऐसी आपांपरी होती जाली । शरीरमार्मी
८५ माझिया हृदयरंगणीं । होताहे हर्षलताची लावणी
सुखेंसीं बुझावणी । जाहाली मज
८६ परी तेचि मक्ति ऐसी । पर्जन्याची सुदिका जैसी
घरावाचूनि अनारिसी । गतीची नेणें

८७ तैसें सर्वभावसंभारें । न धरत प्रेम एकसरें
मजमाजीं संचरे । मीचि होऊनी

८८ तैसें माझिये साक्षात्कारीं । सरे अहंकाराची वारी
अहंकारलोपीं अवधारीं । द्वैत जाय

८९ माजळ ओवीप्रबंधें । गोष्टी सांगिजेल विनोदें
ते परिसा आनंदें । ज्ञानदेवो म्हणे

## अध्याय बारावा

अर्जुन म्हणाला—श्रीकृष्णा, तुझें विश्वरूप अपूर्व पाहून मी भ्यालों, आणि सगुणरूप परिचयाचें म्हणून तें प्रेमानें पाहावेंसें वाटतें. व्यक्तरूप हें मर्यादित असलें तरी अव्यक्त अमर्याद रूपाचाच तो अंश. अमृताचा समुद्र काय व एक घोट काय दोनही सारखेच असें मला वाटतें. तुझें मत वेगळेंच दिसतें. ज्ञानी व योगी अव्यक्त रूपाची आवड धरितात, पण भक्त हे सगुण व्यक्त रूपाची आवड धरितात. पण या दोघांपैकीं, देवा, तुला अधिक कोण आवडतात?

श्रीकृष्ण म्हणाला—जे भक्त मला आपला आत्मभाव देतात त्यानाच मी श्रेष्ठ मानतों. पण सोहंसिद्धीकरिता, म्हणजे मी ब्रह्म अशी भावना उत्पन्न करून, अष्टांगयोगासारखे सायास व उठाठेव करितात तेही मलाच येऊन पोहोंचतात. अर्थात् या दोनही मार्गांत फळ तेंच, पण एकांत श्रम मात्र अधिक. त्या मार्गांत विघ्नें व मोह हीं फार. भूक लागली असता भूकच खावी, तहान लागली असता तहानच प्यावी, जागर्ण तेंच निजण, इंद्रियनिरोधन हाच विषयभोग, वृक्षादिक हेच मित्र, नेसायला थडी, पांघरावयाला ऊन्ह, डोक्यावर धरण्याला पाऊस! तात्पर्य, योग म्हणजे पतिवाचून नित्य सहगमन. तात्पर्य, अशा कठिण योगमार्गानें माझी प्राप्ति करण्याकरतां जे निघाले त्याना दुःखच वांट्याला आलें. शरीरधारी जीवाना अव्यक्त कसें भेटेल? पागळ्यानें वाऱ्याबरोबर धावेन या म्हणण्यांत काय अर्थ? म्हणून भक्त हेच असें कीं, ज्याना दुःखाशिवाय माझी प्राप्ति होते. भक्त धर्माप्रमाणें आचरण ठेवतो. सर्व प्रवृत्ति एकट्या माझ्याकडे लावतो. माझेंच निरंतर ध्यान करितो. भोग व मोक्ष हे तुच्छ मानतो. अशा भक्तावर प्रेम करून मी त्याला पदरीं घेतों. त्याचें कोणतेंही काम करितों. त्याला कशाची काळजी करू देत नाहीं. त्याला नावेवर बसवून नेल्याप्रमाणें नदीपार करतों. तू आपली बुद्धि व मन दोन्ही मला अर्पण केलींस म्हणजे त्याबरोबर अहंकार नाहींसा होऊन तुझें माझें अद्वैत होईल. सर्व वेळ नसलें तरी होईल तितका वेळ तरी तसें कर. म्हणजे वद्यपक्ष कला नित्य कमी कमी होत जाऊन शेवटीं चंद्र अदृश्य होतो, त्याप्रमाणें विषयभोगांतून तुझें चित्त निघून जाईल. अभ्यासानें सर्व कांहीं साध्य होतें. याचेंच नाव अभ्यासयोग असें आहे.

हा अभ्यासही तुला कठीण वाटला तर लौकिकांत राहून धर्मशास्त्रप्रमाणें सर्व कर्में कर. मात्र तें कर्म मला अर्पण कर. स्वतः तुझें नव्हे म्हणे म्हणजे झालें, हें

करूं कीं न करूं या विवेकाचें ओझें आपल्या बुद्धीवर घालूं नको. धर्माप्रमाणें वागतांना घडेल तें घडेल असें म्हणत जा. ईश्वरसमर्पण कर्म करणें प्रत्येक वेळीं कठीण वाटेल तर फक्त फलत्याग कर म्हणजे झालें. झाडें व वेली यांनीं फळें व फुलें यांना स्वतः जन्म दिला तरी तीं दुसऱ्याकरितांच होत असें मानून त्यांना टाकून देतातच कीं नाहीं ? पण हा फलत्याग सोपा असें मात्र समजूं नको. मनुष्यस्वभावामुळें ती गोष्ट अवघड आहे. मिळून सर्वांचें मुळाशीं अभ्यास हाच असतो. त्यांतल्या त्यांत ध्यानापेक्षां कर्मफलत्याग अधिक चांगला, आणि त्याहूनही शांतिसुखाचा भोग अधिक चांगला. अशा भक्ताचें वर्णन किती करावें ? त्याला प्रेमद्वेष, श्रेष्ठकनिष्ठपणा, रागलोभ कांहींच नसतात. मी-तूं हा भेद नसतो. सत्त्वांशानें पूर्ण भरलेला राहतो तोच भक्त, तोच योगी. अशावर माझें प्रेम असतें तें बोलून कसें दाखवूं ? भक्ताच्या गोष्टी बोलणें हा मला भुरळ घालणारा मंत्र ठरतो. अशा भक्ताची भीति कोणालाहि वाटत नाहीं. उन्मत्त जगाची खंति हा करीत नाहीं. उलट याच्याकडून लोकांना शीण होत नाहीं. तो निरिच्छ असतो.

काशीक्षेत्रांत मुक्ति मिळते, पण तेथें मरावें तेव्हां. हिमालयाची यात्रा केल्यानें पापें जातात, परंतु त्या यात्रेंत बहुधा मरणच येतें. गंगा ही पापनाशन करते, पण गंगास्नानांत बुडण्याची भीति असते त्याची काय वाट ? पण माझे प्रेमळ भक्त यांच्या संगतीची गोष्ट मात्र वेगळी. कारण उलट संतांच्या स्पर्शानें गंगेलाही पवित्रपणा येतो. मात्र सोयीकरितां, म्हणजे अद्वैतांत भजन होऊं शकत नाहीं म्हणून, तो देव व भक्त असा भेद करतो व आपल्या भजनानें लोकांना सन्मार्ग दाखवतो. आपल्या जवळचें कांहीं गेलें तें कधीं गेलेंच नाहीं, कधीं जाणारच नाहीं, असें मानतो. असा भक्त मला आवडतो.

दिवा हा कोणालाही उजेड देतो, वृक्ष कोणालाही म्हणजे तोडणाऱ्यालाही सावली देतो, ऊस हा पाणी पाजणाऱ्याप्रमाणें चरकांत घालणाऱ्यालाही गोडी देतो, चंद्र चांदणें सगळ्यांनाच देतो, तसा हा भक्त सर्वांनाच सारखा. आभाळाला रंग चिकटत नाहीं त्याप्रमाणें स्तुति किंवा निंदा ही त्याच्या अंगास लागत नाहींत. पाऊस पडला नाहीं म्हणून समुद्र कांहीं सुकत नाहीं. भक्त हा स्वतःच, स्थावर, व जंगम, दोन्ही, होतो. अशा भक्तापुढें मी माथा लववितो. तो भक्त मोक्षाचा अधिकारी स्वतः होऊन इतरांनाही मोक्ष देऊं शकतो.

तथापि त्याचा गर्व वाहत नाही. अशाचें आलिंगनसुख घडावे म्हणून मीं स्वत ला डोळे लावून घेतले व दोन हात पुरेनात म्हणून चार हात करून घेतले. भक्ताचें गुणवर्णन करणाराही मला आवडतो तात्पर्य, भक्तियोग हा चांगल्या जमिनींत पेरणी केल्यासारखा फलप्रद आहे मज माझें ध्यान करतो तर मी त्याचें ध्यान करतों भक्त माझी पूजा करतो, तर मी त्याची पूजा करतों.

---

## ( १२ व्या अध्यायांतील निवडक वचनें )

१ म्हणौनि साधका तू माउली । पिके सारस्वत तुझिया पाउलीं

२ नवरसीं भरवीं सागर । करवीं उचितरत्नाचे आगर
भावार्थाचे गिरिवर । निफजवीं मायें

३ ये मऱ्हाठियेचिया नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळ करीं

४ भक्तीं पाविजे व्यक्त । अव्यक्त योगें

५ मनाची नखी न लगे । जेथ बुद्धीची दृष्टी न रिगे
इंद्रियां कीर जोगें । काय होईल ?

६ मग सयमाची थाटी । सूनि सुरडिलीं उफराटीं
इंद्रियें कोंडिलीं कपाटीं । हृदयाचिया

७ प्राणशक्ति–चामुंडे । प्रहारूनि संकल्पाचे मेंढे
मनोमहिषाचेनि मुंडें । दिधली बळी

८ आणि शून्येंसीं आग । झुंझावें कीं
ताहानें ताहानचि पियावी । भुकेलिया भूकचि खावी

९ उनिदिवाचें पहुडणें । निरोधाचें वेल्हावणें
झाडासि साजणें । चावळावें गा

शीत वेढावें । उष्ण पांघुरावें
वृष्टीचिया असावें । घराआंत
किंबहुना पाडवा । अग्निप्रवेश नित्य नवा
भ्रतारावीण करावा । तो हा योग
डोंगर गिळता मुख । न फाटे काई

१० यालागीं पागुळा हेवा । नव्हे वायूसि पाडवा
तेवीं देहवता जीवा । अव्यक्तीं गति

११ विधितें पाळित । निषेधातें गाळित
मज देऊनि जाळित । कर्मफळें

१२ ऐसे अनन्ययोगें । विकले जीवें मनें आंगें
तयांचें कायी एक सांगें । जें सर्व मी करीं

१३ येऱ्हवीं तरी माझिया भक्ता । आणि संसाराची चिंता
काय समर्थाची कांता । कोरान्न मागे

१४ जे मन बुद्धि इहीं । घर केलें माझ्या ठायीं
तरी सांगें मग काई । मी तू उरे

१५ म्हणौनि अभ्यासासि कांहीं । सर्वथा दुष्कर नाहीं
यालागीं माझ्या ठाईं । अभ्यासें मिळें

१६ इंद्रियें न कोंडीं । भोगातें न तोडीं
अभिमान न सांडीं । स्वजातीचा
कुळधर्म चाळीं । विधिनिषेध पाळीं

१७ परी मनें वाचा देहें । जैसा जो व्यापार होये
तो मी करीत आहें । ऐसें न म्हणें

१८ माळियें जेउतें नेलें । तेउतें निवांतचि गेलें
तया पाणिया ऐसें केलें । होआवें गा

१९ वन्हीची ज्वाळा जैसी । वाया जाय आकाशीं
क्रिया जिरे ते तैसी । शून्यामाजीं

२० अभ्यासाहूनि गहन । पार्था मग ज्ञान
ज्ञानापासोनि ध्यान । विशेषिजे

२१ मग कर्मफलत्याग । तो ध्यानापासोनि चाग
त्यागाहूनिहि भोग । शांतिसुखाचा

२२ जीव परमात्मा दोनी । बैसले एकासनीं
जयाचिया हृदयभुवनीं । विराजती
तरी सिंधूचेनि मार्जे । जळचरा भय नुपजे
आणि जळचरीं नुबजे । समुद्र जैसा

२३ तेवीं उन्मत्तें जगें । जयासि खंती न लगे
आणि जयाचेनि आंगें । न शिणे लोक

२४ जगचि देह जाहालें । म्हणौनि प्रियाप्रिय गेलें

२५ आतबाहेरीं चोखाळ । सूर्य तैसा निर्मळ
आणि तत्त्वार्थींचा पायाळ । देखणा जो

२६ आपणचि विश्व जाहाला । तरी भेदभाव सहजचि गेला
म्हणौनि द्वेष ठेला । जया पुरुषा

२७ जो खाडावया घाव घाली । का लावणी जयानें केली
दोघा एकचि साउली । वृक्ष दे जैसा

२८ अरिमित्रीं तैसा । अर्जुना जया भाव ऐसा
मानापमानीं सरिसा । होत जाय

२९ दक्षिण उत्तर मारुता । मेरु जैसा पाडुसुता
तैसा सुखदु:खप्राप्ता । मध्यस्थ जो

३० जो निंदेतें नेघे । स्तुती न श्लाघे
आकाशा न लगे । लेप जैसा

३१ हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर
किंबहुना चराचर । आपण जाहाला

३२ म्हणौनि गा नमस्कारूं । तयातें आम्ही माथां मुकुट करूं
तयाची टांच धरूं । हृदयीं आम्ही

३३ तयांचें आम्हां व्यसन । ते आमुचें निधिनिधान
किंबहुना समाधान । ते मिळती तैं

## अध्याय तेरावा

श्रीकृष्ण पुढें म्हणाला—या देहाला क्षेत्र व त्या क्षेत्राला जाणणाऱ्याला क्षेत्रज्ञ म्हणावें सर्वक्षेत्रज्ञ असा मीच आहे क्षेत्र व क्षेत्रज्ञ याचें ज्ञान तेंच खरें ज्ञान साडेतीन हाताचा जो देह त्याच्या गुणाविषयीं वाद चालू आहेत. तर्कवादाचें युद्ध सुरू आहे आपलाच निर्णय खरा असें मानून घरोघर काथ्याकूट चालू असतो. कोणी या क्षेत्राला माळजमीन म्हणतो, कोणी सुपीक म्हणतो. वेदांनी नास्तिकांना उत्तर दिलें, पण पाखंडी म्हणतात कीं, तुमचें शब्दपांडित्य खोटें आहे याविषयीं आम्ही सुपारी ठेवून पैज मारण्यास तयार, आहों जैन यति वेदोक्त कर्म वाईट म्हणतात, पण डोक्याचे केस हातानें उपटणें हें कर्म मात्र चांगलें म्हणतात ! देहक्षेत्राच्या लोभानें योग्यांनी वनवास पतकरला, शंकरानें स्मशान स्वीकारलें, ब्रह्मदेवानें एकाएकीं चार तोंडें धरलीं, तरी क्षेत्र–निर्णय झाला नाहीं जीववादी म्हणतात कीं, जीवानें हें देहक्षेत्र प्राणरूपी कुळाला वगाईनें दिलें आहे कारण प्राणाच्या घरीं नोकर आहेत, जीवाचे घरीं नाहींत मग हा प्राणरूपी कुळवाडी इंद्रियरूपी बैल लावून शेती करतो पण पीक मात्र दुःखाचें येतें उलट बाप सांगून गौं देराव त्याप्रमाणें यथाविधि सत्कर्म केलें तर या क्षेत्रालाच सुखहि मिळू शकेल यावर प्रकृतिवादी म्हणतात, जीव हा कांहीं या क्षेत्राचा मालक नाहीं जाता जाता त्यांत वस्ती करणारा प्रवासी आहे प्राणी हाहि वतनेदार म्हणून या क्षेत्राची राखण करतो

पण या क्षेत्राचें वतन खरोखर प्रकृतीचें आहे व ती प्रकृति सज्ञ शेतकऱ्या प्रमाणें क्षेत्राची खेती घरींच करते तिचे तीन मुलगे सर्व काम करितात, असें कीं, रजोगुण पेरणी करतो, सत्त्वगुण रक्षण करितो, तमोगुण कापणी करतो, तेव्हां क्षेत्रांत पिकाची रास पडते यावर संकल्पवादी म्हणतो कीं, संकल्प हा ब्रह्मरूपी शय्यागृहांत निजलेला होता तो उठून काम करूं लागला, यामुळें पंचीकरणानें सर्व प्राणिसृष्टि उत्पन्न झाली त्यानेंच कर्माचे दगडी बांध घालून क्षेत्र नापीक होतें तें सुपीक केलें, व अहंकाराबरोबर भागीदारी करून भेदबुद्धीकडून चराचराची लागवड करविली यावर स्वभाववादी म्हणतो, छे ! या सर्व गोष्टी दुसऱ्या कोणीं केल्या नसून देहक्षेत्र हें स्वभावतःच उत्पन्न झालें, तें सर्व स्वतःचा भोग स्वतःच घेतें, तें इतर कोणाचें वतन नाहीं यावर काळ-वादी म्हणतात, सर्व सत्ता खरोखर काळाची आहे

तात्पर्य, हा क्षेत्रवाद संपणारा नाही. ऋषि, पुराणें, काव्यें, सूत्रें, तर्कवाद या सर्वांची गति क्षेत्रनिर्णयाच्या कामीं कुंठितच झाली आहे. असो. क्षेत्र म्हणजे पंचमहाभूतें, अहंकार, बुद्धि, अव्यक्त प्रकृति, दहा इंद्रियें, मन, दहा विषय, सुख, दुःख, द्वेष, संघात, इच्छा, चेतना व धृति मिळून छत्तीस तत्त्वांचें क्षेत्र बनतें. त्यांत अहंकार हा प्रकृतीच्या पोटीं गुप्त असतो. देहानें आकार घेतला म्हणजे तो अहंकार देहाला नाचवितो. आणि चमत्कार हा कीं, अज्ञान्यांपेक्षां तो ज्ञान्यांनाच अधिक घेरतो. इंद्रियें हीं विषयसमुदाय जिंकून घेतात. त्यांनीं मिळवून आणलेल्या लुटींत सुख व दुःख यांची निवड बुद्धि करते. बरें–वाईट, पाप–पुण्य हें तिला कळतें. आत्मा व जीव यांच्या मध्यंतरीं ती राहते.

प्रकृतीमध्यें परा व अपरा असे दोन प्रकार आहेत. जीवाला अव्यक्त प्रकृति म्हणतात. कारण तो स्थूल रूप टाकून सूक्ष्म रूपानें राहूं शकतो. शरीरामध्यें क्रियाशक्ति ही प्राणाची स्त्री आहे. पांच द्वारांच्या घरांतून ती वावरत असते. इंद्रियें व बुद्धि यांच्यामधील जागेत रजोगुणाच्या आश्रयानें मन राहतें; पण तें स्थिर नसतें. मन हेंहि वास्तविक कल्पनाच आहे. पण त्याच्या संगतीनें ब्रह्माला जीवदशा येते. प्रवृत्तीला जन्माला घालणें, कामाला बलवान् करणें, अहंकाराला चेतविणें, इच्छेला वाढविणें, आशेला चढविणें, भयापासून रक्षण करणें इत्यादि सर्व गोष्टी मन करितें. मन हें वायुतत्त्वाच्या आंतला गाभा असून तें बुद्धीचें द्वार झांकतें.

ज्ञानेंद्रियांचे पांच विषय शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे असून या द्वारांनीं ज्ञान बाहेर धांवतें व पांच कर्मेंद्रियांचा पहांड बांधून त्यावर कर्म चालू राहतें. म्हणजे, अशी वृत्ति कीं, विषय दिसतांच तिचा अभिलाष उत्पन्न करून मनाला धांवविते व भलत्याहि ठिकाणीं इंद्रियांना तोंड घालावयास लावते. द्वेष म्हणजे इच्छा तृप्त न झाल्यामुळें उत्पन्न होणारी वृत्ति. सुख म्हणजे कायावाचेचा व्यापार स्थगित करणारी वृत्ति. सुखानें प्राण शांत होतो आणि सात्त्विक वृत्ति वाढते. जणूं कांहीं जीवाला आत्म्याचा लाभच घडला! अर्थात् यांच्या उलट तें दुःख. चेतना म्हणजे आत्म्याची देहावरील सत्ता; अशी कीं, जी जागेपण, झोंप किंवा स्वप्न यांतहि नाहींशी होत नाहीं. तिच्या योगानें शरीररूपी वनाला वसंत ऋतु प्राप्त होतो.

पण ही सत्ता आत्म्याला टाऊकच असते असें नाहीं. आपल्या उदयानें समुद्राला भरती येते हें चंद्र जाणत नाहीं, किंवा राजाच्या सत्तेनें त्याच्या

नकळत शत्रुनिवारणाचें कार्यहि परस्पर हात नेत्र व अनत यामध्यें चेतना एकसारखीच वाटते धृति म्हणजे ती स्थिति, की जिच्यामध्ये स्वभावत विरोधी असणारी तत्त्वं मैत्री व एकजूट करून परस्पराचें पोषण करितात सघात म्हणजे वरील पस्तीस तत्त्वाचा समुदाय छत्तीस तत्त्वें जेथ एकरूपपणें एकत्र राहतात तेच देहरूपी क्षेत्र होय रथाग वेगळीं पण रथ एक, चार विभाग तरी सैन्य एक, अक्षर अनेक परतु वाक्य एक, असा हा सघात होय

ज्ञान त्याला म्हणाव, की जे जीव व ब्रह्म याचें ऐक्य करतें, इद्रियाचीं द्वार बद करतें, प्रवृत्तीचे पाय मोडत, मनाच दैन्य फेडत, द्वैत नष्ट करून साम्य–बुद्धि प्रकट करत ज्ञानामुळ सृष्टिससाराची कल्पना मुळासकट उपटून टाकिली जाते ज्ञान हे दाखविता येण्यासारखें नाहा परतु त्याच तेज इद्रियाच्या क्रियेवरूनहि दिसत वृक्षलता टवटवीत व सतेज दिसू लागल्या म्हणजे वसत ऋतु आला हे आपोआप कळतें वागणुकीवरून स्नेहबुद्धि किंवा प्रकाशावरून दिवा ओळखला जातो, त्याप्रमाणें इद्रियादिकाच्या आचरणावरून ज्ञान ओळखिलं जातें ज्ञानी मनुष्य आपला सन्मान होत असलेला पाहून मनान सुखी न होता गडबडून जातो सन्मान हे त्याला एक सकटच वाटत कोणी साधा नमस्कार केला तरी तो त्याला उपकार वाटतो विनयामुळ वादात ज्ञान प्रकट करण्यापेक्षा तें लपवण्याचाच प्रयत्न तो करतो इतक्या सहज गतीन आपणाकडे हलकेपणा घेऊन तो वागतो, की लोकाना वाटावें हा वाऱ्यानेच हलविला जात आहे त्याला एकातवास अधिक आवडतो तसेंच ज्ञानी हा दभरहित असतो तो आपलें सत्कर्म सोंडान कधीं सागत नाहीं गाय जशी पान्हा चोरते, किंवा कुलीन स्त्री जसे अवयव झाकते, तसेंच दाभिक नसणारा मनुष्य आपण केलेल्या चागल्या गोष्टी लपवितो तो देहावर अलकारादि भूषणें घालीत नाहीं उलट खोटें खोटें गोड बोलून लोकाची मनधरणीहि करीत नाहा इतका मितव्ययी कीं, लोकाना वाटावें हा कृपण आहे पण त्याच्या ठिकाणी पूर्णता इतकी असते कीं, सर्वांच्या सर्व इच्छा त्यानकडून पूर्ण होतात

ज्ञानी पुरुष अहिंसावादीच असतो या अहिंसेचा अर्थ पूर्वमीमासकानी मात्र विपरीत केला आहे कारण यज्ञामध्य ते पशुहिंसा करून तिलाच अहिंसा म्हणतात वृक्षाच्या खाचा तोडून त्याला त्याचेंच कुपण करावें, किंवा देऊळ मोडून त्याच विटादगडानीं त्या देवळाच्या रक्षणाकरिता म्हणून भित बाधावी,

हें विपरीत नव्हे काय ? पण यज्ञोपासना करण्याकरितां पशुवध करणारे याज्ञिक, किंवा एक जीव वाचविण्याकरितां दुसरा जीव मारून खाऊं घालणारा आयुर्वेद हे सारखेच होत. कारण जिवंत वनस्पतींची मुळें उपटणें, पानें कापणें, खोडें चिरून रस काढणें इत्यादि दुःखद क्रिया करून त्या द्रव्यांच्या उपयोगानें रोग निवारण्याचें औषध करणें ही देखील विपरीत अहिंसाच होय. दरोडा घालून त्यांतल्या पैशानें अन्नसत्र चालविणें, बैल विकून गोठा बांधणें, अंगावरील पांघरूण जाळून शेक घेणें, किंवा माती लावून पण पाणी न घेतां अंग स्वच्छ करणें, तशीच ही विपरीत अहिंसा होय. असे कांहीं अहिंसावादी पाणी गाळून पितात. कां, तर तसेंच्या तसें पाणी प्याल्यानें कृमिकीटकांची हिंसा होते !

खऱ्या ज्ञानी मनुष्याची अहिंसा केवळ त्याच्या आचरणावरूनच दिसून येते. कमलतंतूंना दुखवूं नये म्हणून भ्रमर जसा नाजूकपणें कमलावर बसतो, किंवा मांजरी जशी पिलांना न दुखवितां त्यांना तोंडात धरते, तसें हळुवार वागणें ज्ञानी माणसाचें असतें. तो कुणाला तुडविणार नाहीं, कुणाची झोंप मोडणार नाहीं, कुणाचें उल्लंघन करणार नाहीं. आधीं पुढें प्रेम चालतें आणि त्यामागून प्रेमाचे शब्द उमटतात, तसें त्याचें आचरण असतें. तो लोकांचें वर्म काढीत नाहीं, बोलण्यानें कोणाला भीति वाटूं देत नाहीं. त्याचे शब्द हे मूर्तिमंत नाद-ब्रह्मच असे मधुर व पवित्र वाटतात. अंकुर फुटलेले दिसतात पण ते रोप्याच्या गोळ्यालाच फुटल्यामुळें रोप्यासारखे मऊच असावे, तसे त्याचे शब्द इतरांना न बोचणारे असतात. त्याचे हस्तव्यापार सिद्ध पुरुषासारखे असतात. जणूं कांहीं ते हलविल्यानें वाऱ्याला धक्का लागेल किंवा आकाशाला नख लागेल अशी भीति त्याला वाटते. त्यानें हात वर उचलला तर तो मारण्याकरितां नसून अभयदानाकरितां असतो. आणि जशी त्याची इंद्रियांची वागणूक तसेंच त्याचें मन. कारण भुईंत रोवलेल्या बीजाचाच बाहेर वृक्ष होतो. तसें मन हेंच बाहेर इंद्रियद्वारा पसरतें व वावरतें. त्याच्या सौजन्यरूपाचा प्रवाह बाहेर वाहतो याचें कारण त्याच्या मुळांत तसाच समुद्र भरलेला असतो.

सहन करतों अशी जाणीव तो ठेवीत नाहीं. कारण त्याचें कांहीं सहन करावयाचें व ज्यानें तें सहन करावयाचें, ते दोघे एकच असे तो मानतो. आर्जव म्हणजे कोणाही प्राणिमात्राविषयीं प्रेम. त्यांत तो आपपरभाव ठेवीत नाहीं, आवडनिवड राखीत नाहीं. लोकांना जें सांगावयाचें ते प्रांजळपणें व निर्भयपणें सांगतो. त्याची दृष्टि कपटी किंवा ओशाळी नसते, बोलण्यांत संशय नसतो.

यानंतर गुरुभक्ति. ही तर प्रसिद्धच आहे. कारण गुरु–भक्त हा आपला देह व मन सर्वस्वीं गुरुसेवेला अर्पण करितो. जणूं कांहीं चित्तामध्यें पति स्मरून बसलेली विरहिणीच ! गुरुप्रमाणें गुरुकुळासंबधानें त्याचें प्रेम असतें. शिवाच्या पिंडीवर सतत अभिषेक करावा त्याप्रमाणें तो गुरुवर ध्यानाची अखंड धार धरतो. प्रेमळपणाचीं सर्व नातीं तो गुरूला लावून त्याच्याशीं वागतो. गुरु ही गाय व आपण तिचें वासरूं असें समजून मनानें त्याच्यामागें धांवतो. किंवा गुरु ही पक्षिणी व आपण तिच्या चोंचीतून चारा घेऊन खाणारें तिचें पिलूं अशी कल्पना करतो. गुरूने माग म्हटलें असतां काय काय मागावें याच्या कल्पनेंत तो दंग होतो. गुरुकृपा आपणाकरितांच संभाळून ठेवावी असाहि प्रयत्न तो करतो. गुरुवृक्षावरून पडणारें कोणतेंहि फूल आपणावरच पडावें म्हणून तो मनानें त्या वृक्षाखालची भूमि विस्तारतो व गुरुसंप्रदायाचें आचार हाच आपला वर्णाश्रमधर्म असें तो समजतो. गुरुवाक्याशिवाय दुसरें कांहींहि तो प्रमाण मानीत नाहीं. त्याच्या चरणधूळींत मोक्ष सांठविला आहे असें तो मानतो.

आतां खरें शुचित्व तेंच, कीं जें वस्तूंच्या आत व बाहेर सारखेंच असतें. मन शुद्ध नसेल तर केवळ शरीरशुद्धि ही विटंबना होय. प्रेताला अलंकार घालणें, गाढवावर तीर्थ शिंपडणें, कडू भोपळ्याला गुळानें मढविणें, ओसाड घराला तोरण बांधणें, भुकेलेल्याच्या अंगावर अन्न बांधणें, किंवा विधवेच्या कपाळीं शेंदूर लावणें–याप्रमाणेंच केवळ बाहेरची शुद्धि ही विटंबना होय. विषफळानें बाहेरून पिकल्या आंब्याचें रूप घेतलें तरी आंत शेणच ना ? आंत दारू भरलेला गडवा गंगेच्या पाण्यांत बुडवून ठेविला तरी ती विटंबनाच. उलट दिव्यावर स्फटिकाचें झांकण घातलें तरी बाहेर प्रकाश दिसतोच. त्याप्रमाणें अंतःशुद्धि असेल तर ती बाहेर दिसल्याशिवाय राहणार नाहीं. खरा ज्ञानी हा व्यवहारांत वागूनहि अलिप्त राहतो–जसा हिरा पाण्यानें भिजत नाहीं

किंवा लढा आधणात दिजत नाही ज्ञानी मनुष्य हा स्थिर बुद्धीचा असतो, जसा काही ग्रहचक्रें फिरत असता अढळ राहणारा ध्रुव ताराच

रस्त्यावरून प्रवासी चालतात पण स्वत रस्ता कधी चालत नाही वावटळीनें पृथ्वी हालत नाही त्याप्रमाणें ज्ञानी हा क्षुधादि देहधर्म व भयशोकादि मनोधर्म यांनी विचलित होत नाही हत्तीला फुलांनी मारलें असता तो माग फिरत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानी हा निंदादिकांनी परावृत्त होत नाहीं तो आपली मळ वृत्ति विसरत नाहीं तो अन करणाला जपतो एखादा निश्चयी नवरा दांडगट अशा आपल्या बायकोला बाहेर पडू देत नाहीं, कारण ती बाहेर पडली असता तिला झपाटणारे लोक तयार असतात वृत्ति जागची जागेवर ठेवण्याकरता तो यम, दम, योग, प्रक्रिया इत्यादि साधनांचें सहाय्य घेतो, म्हणूनच त्याला स्थैर्याचें यश लाभतें तो अहंकाराला थारा देत नाहीं. वैराग्य हे त्याजमध्ये नेहमीं जागृत असते ओकलेलें अन्न कोणी खात नाहीं, प्रेताला कोणी आलिंगीत नाही, जळत्या घरात कोणी शिरत नाही, त्याप्रमाणें तो विषयापासून नेहमीं दूर राहतो. स्वर्गभोगहि तो कुत्र्याच्या गासाप्रमाणें मानतो आपण देहामध्यें आहों अशी आठवणहि तो ठेवीत नाहीं ढग हे आकाशाला स्पर्श केल्याशिवाय राहतातच कीं! आपल्या पाठीवर काय भार लादला आहे याची बैलाला जाणीव नसते पण ज्ञानी हा या जन्माप्रमाणें मागील जन्मांचेंहि दुःख विसरत नाही पाण्यात शिरण्याच्या आधीं पोहणारा जसा कासोटा घालतो त्याप्रमाणे जन्माच्या अंतीं येणारा मृत्यु मनांत आधींच धरून तो सावध राहतो आपलें लग्न ठरलें हे ठाऊक झालेली वधू नाहीं का माहेराला विसरू लागत! व सासरी जाण्याची तयारी मनात करीत?

ज्ञानी म्हातारपणाचीं दुःखें तरुणपणातच ओळखतो आणि सर्व इंद्रियें शिथिल, वेडीवाकडी झाल्यामुळे शरिराची विटंबना कशी होईल, आपणाला पाहून लोक कसे भितील व खती करू लागतील, किंवा हा लवकर मरो असें मनात म्हणू लागतील हे तो मनानें ओळखतो आणि दिवे जाण्यापूर्वी बायका जशी घरातील झाकापाक करून मोकळ्या होतात त्याप्रमाणें तो आधींपासूनच उदास वृत्ति अंगीं आणतो तो शरीराची आस्था ठेवीत नाहीं. वाटेच्या वाटसरानें धर्मशाळेविषयीं कधीं आस्था ठेविली आहे! उन्हाचे वेळीं झाडांत काहीं थोडा वेळ विश्रांति घेणारा मनुष्य सटकून पुढे निघाला म्हणजे मग तो वृक्षाची आस्था ठेवतो

काय ! ज्ञानी ऐश्वर्यांत नांदत असूनहि अनासक्त राहतो, इष्टानिष्ट हा भेद करीत नाहीं. सूर्य किंवा समुद्र हा वर्षाच्या कोणत्याहि काळीं तेजानें व पाण्यानें भरलेलाच राहतो, तसा ज्ञानी हा समतावृत्तीनें नेहमा भरलेला असतो. तो मला एकनिष्ठेनें अनुसरतो, पण माझ्याशा ऐक्य पावूनहि माझें भजन करतो, एकांताची आवड धरतो, आत्मज्ञानावाचून इतर ज्ञान अज्ञानासारखें मानतो, अनेक ज्ञान पुढें आलीं तर त्यांत विवेक करितो आणि त्यानाहि अध्यात्मज्ञानाच्या मार्गाला लावतो. शुद्ध ज्ञानानें त्याची दृष्टि थेट ज्ञेयापर्यंत जाऊन भिडते. अशा हीं ज्ञानाचीं लक्षणें आहेत आणि त्यावरूनच ज्ञान ओळखलें जातें किंवा जाण

ज्ञान नाहीं तेथें अज्ञानच हें उघड आहे, पण अज्ञानाचीं हीं लक्षणें आहेत. अज्ञानी मनुष्य मान व प्रतिष्ठा यांची हाव धरितो, गर्वानें ताठ राहतो, आपण केलेल्या सत्कर्मांची प्रकट बढाईखोर वाच्यता करतो. लोकांना नकळत पिंपळाची मुंज होऊं शकतेच कीं! पण तीं 'या धर्म्यात्मानें केली हो !' असें लोकांनीं पाहून म्हणावें याकरिता पिंपळाभोवता मोठ्याच्या गवताची दोरी बांधतो. तो पूजेचा व पुजारी वेषाचा थाट मांडतो, हिंसा करितो, जगाला अनेक प्रकारें दुःख देतो व स्वतःहि अलस्था सुबुद्धि खानें सुखी व दुःखी होतो, स्तुतीनें स्फुरण वर चढतो व निंदेनें विरघळतो, कपट करून लोकांना फसवितो, घात बुद्धीनें मोह घालतो. त्याचें मन विकल्पानें भरलेलें असतें, जशी काहां लोकांनीं हाडें व काटे आत पेंकून दिलेली रानांतील ओसाड विहीरच ! त्याला पापाची लाज किंवा पुण्याची आस्था नसते. मात्र धनाची इच्छा अघोर. भयाच्या नावानेंच तो भिऊन जातो. सरड्याप्रमाणें तो मागेंपुढें, खालावर, अनिश्चितपणें भटकत असतो, माकडासारखा चंचल असतो. तो बिनबुडाचा असतो, देवाला वाहिलेल्या गुराप्रमाणें किंवा अधळ्या वृत्तीप्रमाणें वाटेल तिकडे हिंडतो, डोंगरावरच्या वाऱ्याप्रमाणें उगाच भडकतो. त्याच्या अंतःकरणांत वाईट विचार सहज प्रवेश करितात. उकिरड्यावर वाटेल तें टाकावें तसें त्याचें मन अनिष्ट गोष्टींनीं भरून गेलेलें असतें. विषयानें ठोकर मारून घायाळ केलें तरी त्यापासून तो मागें फिरत नाहीं, मृगजलामागें धावून उरीं फुटला तरी मागें परतत नाहीं, विद्या व तारुण्य यांनीं मस्त होतो, मीच सर्वांत मोठा, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान् असा गर्व वाहतो. त्याची विद्वत्ता एखाद्या दिव्यासारखी असते म्हणजे प्रकाश देण्याच्या गुणकारी दृष्टीनें नव्हे—तर वात खाणारा, तेल जाळणारा, काजळानें कोनाडा

काळा करणारा व उष्णता वाढविणारा, असा याच्या विद्वत्तेचा दीप असतो. एखाद्या अंत्यजाला राज्यच मिळावें किंवा सापानें लाकूड गिळावें, त्याप्रमाणें तो गर्वानें ताठ होतो. त्याला कोणत्याहि सद्भावनेचा पाझर फुटत नाहीं. मंत्रानें पुतळ्याचें विष उतरत नाहीं, त्याप्रमाणें सदुपदेशानें तो ताळ्यावर येत नाहीं, मृत्यूची आठवण ठेवीत नाहीं. रजोगुणानें प्राप्त झालेल्या सुखात तो गढून गेलेला असतो. विषयवृद्धि ही पडुरोगातील अंग-सुजेसारखी आहे हें तो ओळखत नाहीं. एखाद्या अकल्पित लाभानें तो नास्तिक बनतो, म्हणजे देव किंवा दैव यांच्यापेक्षा आपलें कर्तृत्व मोठें मानतो.

तात्पर्य, जें जें करूं नये तें तें तो करतो व कांहीं मलतेंहि करतो. गृहदारादिकांवरून त्याचें प्रेम निघत नाहीं. गारुड्याच्या माकडाप्रमाणें तो स्त्रीच्या आज्ञेनुरूप वागतो व देव, गुरु इत्यादींना जें अर्पावें तें तिच्या चरणीं वाहतो. जारिणी स्त्री मनात परपुरुष ठेवून वरून नवऱ्याच्या मनाची सपादणी करूं पाहते, त्याप्रमाणें तो अन्तःकरणात विषय ठेवून वर मात्र ईश्वरभजनाचा थाट करतो. गुरु व देव हे लहरीप्रमाणें बदलणें यात त्याला कांहीं वाटत नाहीं. श्रीकृष्णाला गोकुळअष्टमीच्या दिवशीं जितका मान द्यावा, तितकाच नागपंचमीचे दिवशीं तो नागाला मान देतो. सर्व विद्या व कला यात तो प्रवीण असतो. फक्त एक अध्यात्मशास्त्र त्याला कळत नाहीं. मोराच्या अंगभर पिसें असतात, पण ज्या एका दृष्टीनें मोर पाहतो ती दृष्टि पिसावरील शेंकडों डोळ्यांना नसते. अध्यात्म ज्ञानाशिवाय वाटेल तेवढी चटपट केली तरी ती फुकट. तो वृक्ष किंवा वेलीचा विस्तार खरा, पण त्याची जात अज्ञानाची. वास्तविक ज्ञानलक्षणें सांगितल्यावर अज्ञानलक्षणें सांगण्याचें कारण उरत नाहीं, पण स्पष्ट करून सांगितल्यानें कांहीं बिघडतहि नाहीं.

असो. ज्ञान म्हणून जें सांगितलें त्याचें ज्ञेय म्हणजे विषय हें ब्रह्म आहे, आणि तें जाणल्यावर जाणण्याचें किंवा करण्याचें इतर कांहीं उरत नाहीं आणि जाणणारा हाच ज्ञेय म्हणजे ब्रह्मरूप होतो. तें ब्रह्म विश्वरूपानें दिसतें, पण तो मिथ्या आभास आहे. ब्रह्माला आदि नाहीं, अंत नाहीं. अन् त्याच्या-विषयीं 'आहे', 'नाहीं' असे शब्द योजता येत नाहींत. त्याला सर्व बाजूंना सर्व इंद्रियें आहेत. परंतु तसें बोललें तरी मुळात तें खरें नाहीं. कांहीं नाहीं असा भाव किंवा विचार प्रकट करण्याकरितां झालें तरी कांहीं रूप असणारी अशी शब्दाकृति, मानवाकार कदाची–किंवाची लागतेच की नाहीं ! त्याप्रमाणें

ब्रह्माचें वर्णन करण्याकरिता द्वैताच्या भाषेनें बोलाव लागतें आणि अज्ञानी माणसें मात्र त्यामुळे गैरसमज करून घेतात आणि वर्णिलेले सर्व गुण हे निर्गुण ब्रह्माचेच खरे गुण आहेत असे मानतात. ब्रह्म हें अविनाशी रूपानें व सूक्ष्म स्थितीनें सर्व स्थावरजंगमाला व्यापून राहतें व तेंच ज्ञानाचें ज्ञेय होय सर्व जगद्रूपी भास म्हणजे गुणक्रियादि ब्रह्माच्या योगानेच भासतात क्षेत्रक्षेत्रज्ञ, ज्ञान, अज्ञान, ज्ञेय हे सर्व विषयविभाग फक्त समजुतीकरिता वेगळे करून सांगण्याचे असतात, आणि प्रकृतिपुरुष हा विभागहि असाच आणखी एक होय

पुरुष व प्रकृति हीं दोन्ही अनादि आणि पावलाबरोबर पाऊल टाकून चालणारीं आहेत कणसामध्यें भूस व दाणे हे बरोबरच सारखे वाढत असतात पूर्वी क्षेत्र म्हणून सांगितलं तें क्षेत्र हीच प्रकृति आणि क्षेत्रज्ञ म्हणून सांगितला तोच पुरुष होय पुरुष हा केवळ सत्ता आणि प्रकृति हा संपूर्ण क्रिया प्रकृतीच्या ठिकाणी आधीं इच्छा आणि बुद्धि उत्पन्न होऊन तीं अहंकाराला उत्पन्न करतात व त्याजकडून विषयाभिलाषानें जें करवितात तें कार्य किंवा कर्म होय आणि इच्छेनें उत्तेजित केलेल्या मनाकडून कर्मेंद्रियांच्या प्रेरणानुरूप होणाऱ्या क्रियेला कर्तृत्व म्हणतात इच्छित वस्तूचें कारण ही सत्ता आहे तिघांच्या समुदायानें प्रकृति कर्मरूप होते येथें असं भासतें कीं, स्त्री ही मिळवते व पुरुष नवरा हा बसून खातो प्रकृति व पुरुष यांमध्ये पत्नी व पति असा खरा संबंध नसतो प्रकृति ही कोणी अंगहीन पांगळा द्रव्यहीन म्हातारा अशा पुरुषाच्या सान्निध्यानें जग प्रसवते हें आश्चर्य आहे, पण तें आहे खरं पण हें जें फुकट श्रेय पुरुषाला मिळतें त्याचा मोबदला त्याला अशा रीतीने द्यावा लागतो कीं, तिच्या संगतीमुळे त्याला सुखदुःखादि भोगावीं लागतात तिचे उन्मत्तपणाचे खेळ, लहरीपणाचे खेळ, त्याला निमुटपणें पाहावे लागतात ती दैवी माया आहे कामरूपी वेलाचा तो मांडव आहे सर्व विद्या, कला, शास्त्रें यांना ती प्रसवते सर्व शब्द मात्र निजपासून होतो त्या पुरुषाकरिताच मी हें सर्व करितें असं ती भासविते हा पुरुष जसा अमर्याद तसेंच तिचं सौभाग्यहि अमर्यादित असतें मात्र या सौभाग्यामुळे त्या पुरुषाच्या तेजाला कमीपणा येतो

शुद्ध सोन्याला हिणकसाचें मिश्रण बाधणारच साधु झाला तरी पिशाच अंगात शिरल्यावर तो काय करणार नाहीं? ढगाला व्यापलेला सूर्य उदास दिसतो रत्न वस्त्रात गुंडाळलं तर कसं चमकणार? संगतीचा हा दोष अपरिहार्य आहे तापवून लाल केलेल्या लोखंडाला हवा तसा आकार देण्याकरिता लोहार त्यावर

घण मारतो, पण ते घाव अमीवरहि पडतात की नाही? त्याप्रमाणे पुरुषाला सर्व तऱ्हेचे आघात पुष्कट सोसावे लागतात वास्तविक नदीच्या तीरावर असलेल्या पर्वताचें प्रतिबिंब नदींत पडते यामुळे प्रवाहात प्रतिबिंबाची टळमळ होते, पण ती काही खऱ्या पर्वताला भासत नाहीं. अनात्मरूपी छत्तीस घटकात्मक प्रकृतीचा निरास विचारी पुरुषाला करतां येतो. कोणी ही गोष्ट आत्म ज्ञानानें, कोणी सांख्ययोगानें व कोणी कर्मयोगानें करितो, इतकेंच किल्येकांना या कामीं गुरूपदेशाहि तसाच उपयोगीं पडतो तात्पर्य, परमात्म्याला जाणण्याला असे विविध उपाय असतात, पण त्यांचा उपयोग न करणाऱ्याला पुनर्जन्मातून बाहेर पडताच येणार नाहीं. विविध, अनेक व विनाशी विश्वातून एकच अविनाशी पर मात्मरूप पाहणें हेंच ज्ञानी लोकांचें डोळसपण होय मूर्ख लोकच तेवढे देहाशी तादात्म्य पावतात त्याला काय करणार? ज्ञानी मात्र ज्या आत्मघात करून घेत नाहींत ते याच देहात मोक्षादि सर्व सुख प्राप्त करून घेतात साम्य येण्यावर त्यांना सुखनिद्रा लाभते आत्म्याला अकर्ता म्हणून जाणणें हीच मुख्य गोष्ट आहे घरात सर्व व्यवहार चालतात, पण स्वतः घर काहींच करीत नाहीं मुलें छायामीवर्ती फिरतात, पण स्वतः स्तंभ काहीं फिरत नाहीं आत्मा असावयाचा तेथेंच असतो तो देहात असतो हें म्हणणेंहि खोटें देह व आत्मा यांचा परस्पर विरोध किती वर्णावा? देह हा वाइटातला वाईट आहे तो अग्निकुंडात पडलेला लोण्याचा गोळा होय कुत्र्याच्या उदरातून तो विष्ठारूपानें बाहेर पडू शकेल किंवा कुजला तर किड्याचा ढीग होईल. पण आत्मा तसा नाहीं. देह व आत्मा यांच्यामध्यें अत्यंत विरोध आहे पण आत्म्यासबंधानहि अनेक गोष्टी 'आहेत—नाहींत' अशा विरोधदर्शनानेंच बोलाव्या लागतात जसें तो दृश्य नाही अदृश्य नाहा, शून्य नाहीं पूर्ण नाहीं सुखात्मक नाहीं दुःखात्मक नाहीं, बद्ध नाहीं मुक्त नाहीं इत्यादि क्षेत्रज्ञ हा केवळ क्षेत्राच्या आभासाला दाखवून देणारा प्रकाशक आहे, याहून अधिक काहीं नाहीं. ही डोळस बुद्धि यावी याकडेच सर्व साधनाचा ज्ञानी लोक उप योग करितात व तेच परमपदाला पावतात असे हे ज्ञान, एका घागरींतील पाणी दुसऱ्या घागरींत ओतावें त्याप्रमाणे, श्रीकृष्णानें अर्जुनाला दिलें

## ( १३ व्या अध्यायातील निवडक वचनें )

१ क्षेत्र आणि क्षेत्रज्ञातें । जाणणें जें निरुतें
ज्ञान ऐसें तयातें । मानू आम्ही
नेणों कोणाचें हें स्थळ । परी केसें अभिलाषाचें बळ
जें घरोघरीं कपाळ । पिटवीत असे

२ एक म्हणती हें स्थळ । जीवाचेंचि समूळ
मग प्राण हें कुळ । तयाचें एथ

३ अहो जीव एथ उखिता । वस्तीकर वाटे जाता
आणि प्राण हा बळौता । म्हणोनि जागे

४ तैसें क्षेत्र हें स्वभावें । वृत्ती कवणाची नव्हे
हें वाहे तया फावे । येरा तुटे

५ परी ऐसें हें रवडें । कीं अमुकेयाचेंचि फुडें
हें कोण्हाही वरपडें । होयचिना

६ नाना अप्रौढबाळकीं । तारुण्य राहे थोकीं
का न फुलता कळिकीं । आमोद जैसा

७ नवल अहंकाराची गोठी । विशेषें न लगे अज्ञानापाठीं
सज्ञानाचे झोंबे कंठीं । नाना संकटीं नाचवी

८ आणि सांख्ययोगमतें । प्रकृती परिसविली तूतें

९ जेथ दुजी जे जीवदशा । तिये नाव वीरेशा
अव्यक्त एथ ऐसा । पर्याय हा

१० तैसें सांडूनिया स्थूळ धर्म । महाभूतें भूतग्राम
लया जाती सूक्ष्म । होऊनि जेथ

११ इये तत्त्वमेळापैकीं । सुखदु खाची उखिविखी
बुद्धि करिते मुखीं । पाचें इहीं

१२ वाया मन हें नाव । येऱ्हवीं कल्पनाची सावेव
जयाचेनि संगें जीव– । दशा वस्तु

१३ संकल्पें सृष्टी घडी । सवेंचि विकल्पूनि मोडी
मनोरथाच्या उतरडी । उतरी रची

१४ ईहीं पाचै द्वारीं । ज्ञानासि धाव बाहेरी
जैसा कां हिरविया चारीं । भांबावे पशु

१५ जिये वृत्तीचिया आवडी । बुद्धी होय वेडी
विषया जिया गोडी । ते गा इच्छा

१६ आता यावरी सुख । तें एवंविध देख
जेणें एकेंचि अशेख । विसरे जीव

१७ का आघवियाचि इंद्रियवृत्ती । हृदयाचिया एकांतीं
थापटूनि सुषुप्ति । आणी जें गा
किंबहुना सोये । जीव आत्मयाची लाहे
तेथ जें होये । तया नाम सुख

१८ जडाजडीं अंशीं । रहाटे जे सरिसी । ते चेतना

१९ पार्था तयापरी । आत्मसंगती इये शरीरीं
सजीवत्वाचा करी । उपयोग जडा

२० ऐसीं हीं पांच भूतें । न साहती एकमेकातें
कीं तियेंही ऐक्यातें । देहा येती
द्वद्वाची उखिविखी । सोडूनि वसती एकीं
एक एकातें पोखीं । निजगुणें गा

२१ तैसीं छत्तीसही इयें तत्त्वें । मिळती जेणें एकत्वें
तेणें समूहपरत्वें । क्षेत्र म्हणिजे
आणि वाहतनि भौतिकें । पाप पुण्य एथ पिकें
म्हणौनि आम्हीं कौतुकें । क्षेत्र म्हणों

२२ पैं परतत्त्वाआरौतें । स्थावराआर्तौतें
जें कांहीं होतें जातें । तें क्षेत्रचि हें

२३ जया ज्ञानालागीं । गगन गिळिताति योगी
स्वर्गाची आढवगी । उमरडोनि

२४ जया ज्ञानाची रिगवणी । अविद्ये उणें आणी
जीवा आत्मया बुझावणी । मांडूनि दे

२५ जें ससारातें उन्मूळी । सकल्पक प्रक्षाळी
अनावरातें वेंटाळी । ज्ञेयातें जें

२६ अगा वृक्षासि पाताळीं । जळ सापडे मूळीं
तें शाखांचिय बहाळीं । वरीही दिसे

२७ का दर्शनाचिये प्रशस्ती । पुण्यपुरुष

२८ तरी कवणेंही विषयींचें । साम्य होणें न रुचे
संभावितपणाचें । वोझें जया

२९ सन्मानें जो साकडे
गरिमेतें आगाकडे । येवोंचि नेदी
पूज्यता डोळा न देखावी । स्वकीर्ति कानीं नायकावी
हा अमुक ऐसी नोहावी । सचि लोका

३० चातुर्य लपवी । महत्त्व हारवी
पिसेपण मिरवी । आवडोनी

३१ पैल चालत कीं नोहे । कीं वारेनि जात आहे
जना ऐसा भ्रम जाये । तैसें होइजे

३२ खडाणे आला पान्हा । पळवी जेवि अर्जुना
का उपवी पण्यागना । वडिलपण
नातरी कुळवधू लपवी । अवयवातें

१३३ नाना कृषावळ आपुलें । पाघुरवी पेरिलें
तैसें झाकी निपजलें । दानपुण्य

३४ किंबहुना स्वधर्मी थोर । अवसरीं उदार
आत्मचर्चे चतुर । येऱ्हवीं वेडा

३५ तैसी हिंसाची करूनि अहिंसा । निपजविजे हा ऐसा
पैं पूर्वमीमांसा । निर्णय केला

३६ तव तिये इष्टीचिया बुडीं । पशुहिंसा तव रोकडी
मग अहिंसेची थडी । कैंची दिसे ?

३७ अहो वर्षती वत्रळारें । मोडोनि केलीं देव्हारें
नागवूनि वेव्हारें । गवादी घातली
मस्तक पांघुरविलें । तव तळवटी उघडें पडिलें
घर मोडोनि केले । मांडव पुढें
नाना पांघुरणें । जाळूनि जैसें तापणें
का जालें आंगवणें । कुंजराचें
नातरी बैल विकूनि गोठा । पुस जावोनि बांधिजे गाठा
इया करणी कीं चेष्टा । काई हंसो

३८ तेथ कदर्थले प्राण । तेही हिंसा
एवं हिंसाचि अहिंसा

३९ का कमळावरी भ्रमर । पाय ठेविती हळुवार
कुचंबेल केसर । इया शंका

४० जीवांनळीं आथरित । आपुला जीव

४१ तैसेनि मार्दवें पाय । भूमीवरी न्यसीत जाय
लागती तेथ होय । जीवा सुख
स्वयं श्वसणें तें सुकुमार । सुख मोहाचें माहेर
माधुर्या जाहाले अंकुर । दशन तैसे

४२ पुढां स्नेह पाझरे । माघां चालती अक्षरें
शब्द पाठीं अवतरे । कृपा आधीं

४३ का नादब्रह्मचि मुसे आलें । कीं गंगापय असळलें
पतिव्रते आलें । वार्धक्य जैसें
४४ तैसे साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ
शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे
४५ अक्षम आणि संन्यासिलें । का निरिंधन आणि विझालें
मुकेनि घेतलें । मौन जैसें
४६ पैं मानसींचि जरी । अहिंसेची अवसरी
तरी कैंची बाहेरी । वोसंडेल !
४७ वाचूनि मनींचि नाहीं । तें वाचेसि उमटेल काई
४८ परी जिये वेळीं जैसें । जें होऊनि आत असे
बाहेरी ये तैसें । व्यापाररूपें
४९ तैसिया प्रेमाचिया स्फूर्ती । फावल्या रसवृत्ती
वाहविला मती । आकळेना
५० रत्नपारखियाचिया गावीं । जाईल गडकी तरी सोडावी
काश्मीरीं न करावी । भिडगण तेथें
५१ किंबहुना मज । तुमचिया कृपा काज
तियेलागीं व्याज । ग्रथाचें केलें
५२ तरी तुम्हा रसिकाजोगें । व्याख्यान शोधावें लागे
५३ हे अनाक्रोश क्षमा । जेथ आथी प्रियोत्तमा
जाण तेणें महिमा । ज्ञानासि गा
५४ जे जगचि सनोळख । जगेंसीं जुनाट सोयरीक
आप पर हे भाक । जाणणें नाहीं
५५ चोखाळपण रत्नाचें । रत्नावरी किरणाचें
तैसें पुढें मन जयाचें । करणें पाठीं
५६ दिठी नोहे मिणधी । बोलणें नाहीं संदिग्धी

५७ अमृताची धार । तैसें उजू अंतर
५८ सिंहासन होईन आपण । वरी गुरु करितां आरोहण
५९ जो गुरुदास्यें कृश । जो गुरुप्रेमें सपोष
६० जो गुरुकुळें सुकुलीन । जो गुरुबंधुसौजन्यें सुजन
६१ बाहेरीं कर्मे क्षाळला । भीतरीं ज्ञानें उजळला
किंबहुना इयापरी । बाह्य चोख अवधारीं
आणि ज्ञानदीप अंतरीं । म्हणौनि शुद्ध
६२ येऱ्हवीं तरी पांडुसुता । अंतर शुद्ध नसतां
बाहेरीं कर्म तो सर्वथा । विटंबू गा
मृत जैसा शृंगारिला । गाढव तीर्थी न्हाणिला
कडू दुधिया माखिला । गुळें जैसा
६३ काय करूं चित्रींव फळ । आत शेण
६४ म्हणौनि सद्भाव जीवगत । बाहेरीं दिसती फांकत
स्फटिकगृहींचे डोलत । दीप जैसे
६५ पाणियें हिरा न भिजे । आधणीं हरळ न शिजे
तैसी विकल्पजातें न लिंपिजे । मनोवृत्ति
६६ हें स्थैर्य निधडें । जेथ आंगेंजीवें जोडे
तें ज्ञानाचें उघडें । निधान साचें
६७ समाधीचे शेजेपासीं । वाढोनि धाली घ्यानासी
चित्त चैतन्यसमरसीं । आतू रते
६८ तें हें विषयवैराग्य । आत्मलाभाचें भाग्य
येणें ब्रह्मानंद योग्य । होती जीव
६९ ऋतुकाळीं तरी फळती । परी फळलों हें नेणती
तयां वृक्षांचिये ऐसी वृत्ती । कर्मीं सदा

७० सर्वेवीण जैसीं । अग्रें असती आकाशीं
देहीं कर्में तैसीं । जयासि गा

७१ पैं गा जो ययापरी । जन्मेंचि जन्म निवारी
मरणें मृत्यु मारी । आपण उरे
तया घरीं ज्ञानाचें । सांकडें नाहीं साचें
जया जन्ममृत्यूचें । निमालें शल्य

७२ दृष्टी जव आहे । तव पाहावें तेतुलें पाहे ।
मूकला आर्थी वाचा वाहे । सुभाषित

७३ म्हणौनि वार्धक्याचेनि आठवें । वार्धक्या जो नागवे
तयाच्या ठायीं जाणावें । ज्ञान आहे

७४ जो अनन्य यापरी । मी जाहलाही मातें वरी
तोचि तो मूर्तधारी । ज्ञान पैं गा

७५ तैसें ज्ञानजाता करी । आघवेंचि एकीकडे सारी
मग मन बुद्धी मोहरी । अध्यात्मज्ञानीं

७६ आणि तत्त्वज्ञान निर्मळ । फळ जें एक फळ
तें ज्ञेयहीवरी सरळ । दिठी जया
येऱ्हवीं बोधा आलेनि ज्ञानें । जरी ज्ञेय न दिसेचि मनें
तरी ज्ञानलाभही न मने । झालासाता

७७ म्हणौनि ज्ञान जेतुलें दावी । तेतुली वस्तुचि आघवी
तें देखे ऐसी व्हावी । बुद्धी चोख

७८ जेवढी ज्ञानाची वृद्धी । तेवढी जयाची बुद्धी
तो ज्ञान हें शब्दीं । करणें न लगे

७९ घाली विषेचा पसारा । सुये सुकृताचा डागोरा
करी तेतुलें मोहरा । स्फीतिसिया

८० आग चरिवरी चर्ची । जनातें अर्चिता वर्ची
तो जाण अज्ञानाची । खाणी एथ
आणि वन्ही वर्नी विचरे । तेथ जळती जैसीं जगमस्थावरें
तैसें जयाचेनि आचारें । जगा दुःख
८१ पडली वारयाचिया वळसा । धुळी चढे आकाशा
हरिखा वळघे तैसा । स्तुतीवेळे
८२ गार शेवाळें गुडाळली । का निंबोळी जैसी पिकली
तैसी जयाची भली । बाह्यक्रिया
८३ जैसें पोटालागीं सुणें । उघडें झाकलें न म्हणे
तैसें आपलें परावें नेणे । द्रव्यालागीं
८४ पापी जो निसुग । पुण्याविषयीं अतिनिलाग
जयाचिया मनीं वेग । विकल्पाचा
तो जाण निखळा । अज्ञानाचा पुतळा
८५ आवळें हातिरू मातलें । का डोंगरीं जैसें पेटलें
तैसें विषयीं सुटलें । चित्त जयाचें
८६ स्वर्गीही खावया जोडी । एथुनीची
८७ तैसा जो विषयालागीं । उडी घाली जळते आगीं
व्यसनाचीं आगीं । लेणीं मिरवी
८८ होईये तेंविलेनि मोजें । देवळविसें जैसीं फुजे
तैसा विद्यावयसा माजे । उताणा चाले
८९ नाहीं माझेनि पाडें चाड । मी सर्वज्ञ एकचि रूढ
ऐसा सर्वतुष्टीगंड । घेऊनि ठाके
९० अंत्यज राणिवे बैसविला । आरें घारण गिळिला
तैसा गर्वे फुगला । देखसी जो
९१ आणि आर्गी वृद्धतेची । सज्ञा ये मरणाची
परी जया तारुण्याची । भुली न फिटे

९२ वैरिया नीद आली । आता द्वंद्वें माझीं सरलीं
हें मानी तो सपिली । मुकला जेवीं
९३ न करावें तें करी । असमाव्य मनीं धरी
चिंतू नये तें विचारी । जयाची मती
रिघे जेथ न रिघावें । मागे जें न घ्यावें
स्पर्शे जेथ न लगावें । आग मन
९४ जो करणेयाचेनि नावें । मलतेंचि करी
९५ चित्त आरावी स्त्रियेचें । आणि तियेचेंचि छंदें नाचे
माकड गारुडियाचें । जैसें होय
९६ साच आणि चोख । तें स्त्रियेसीची अशेख
येरींविपयीं जोगावणूक । तेही नाहीं
इयेतें हन कोणी देखेल । इयेसी वेखासें जाईल
तरी युगाचि बुडेल । ऐसें जया
९७ ऐसेनि जयाचे चित्तीं । वैषम्याची वोळखती
वाहे तो महामती । अज्ञान गा
९८ कुणवट कुळवाडी । तैसा आनआन देव मांडी
आदिलाची परवडी । करी तया
९९ माझी मूर्ति निफजवी । ते घराचे कोनीं बेसवी
आपण देवोंदेवीं । यात्रे जाय
१०० ऐसा अखंड भजन करी । उगा नोहे क्षणभरी ।
अवघेन गावद्वारीं । अहेव जैसी
ऐसोनि जो भक्त । देखसी सैरा धावत
जाण अज्ञानाचा मूर्त । अवतार तो
१०१ मोराआगीं असेषें । पिसें असता डोळसें
परी एकली दृष्टी नसे । तैसें तें गा

१०२ तैसें शास्त्रजात जाण । आघवेंची अप्रमाण
पार्था अध्यात्मज्ञानेंवीण एकलेनी

१०३ तरी ज्ञेय ऐसें म्हणणें । वस्तु तें येणेंचि कारणें
जें ज्ञानेवाचूनि कवणें । उपाया नये
आणि जाणितलेयावरौतें । काहीं करणें नाहीं जेथें
जाणणेंचि तन्मयातें । आणी जयाचें

१०४ जें नाहीं म्हणों जाईजे । तंव विश्वाकारें देखिजे
आणि विश्वचि ऐसें म्हणिजे । तरी हे माया

१०५ म्हणौनि आथी नाथी हे बोली । जें देखोनि मुकी जाहली
विचाराची मोडली । वाट जेथें

१०६ म्हणौनि विश्वतश्चक्षू । हा अचक्षूच्या ठायीं पक्षू
बोलावया दक्षू । जाहला वेद

१०७ पैं गा मूर्ति तेंचि मुख । हुताशना जेसें देख
तैसें सर्वपणें अशेख । भोक्तें जें

१०८ पैं कल्लोळातें कल्लोळें । ग्रसिजत असे ऐसें कळे
परी असिते आसावेगळें । असे काई

१०९ पैं शून्य जें दावावें जाहालें । तें बिंदुलें एक केलें
तैसें अद्वैत सांगावें बोलें । तें द्वैत कीजे

११० म्हणौनि गा श्रुती । द्वैतभावें अद्वैतीं
निरूपणाची वाहती । वाट केली

१११ नामरूपसंबंध । जातिक्रियाभेद
हा आकारासीच मवाद । वस्तूसि नाहीं

११२ म्हणौनि हा मूर्ताकार । जेचूनि तेंचि तया आधार

११३ जैसें सरलिया खेळ । गाल होती एक
तैसें साध्यसाधनादिक । ऐक्यासि ये

११४ मीचि होती परी । हे मुख्य गा अवधारीं
सोहोपी सर्वांपरी । रचिली आम्हीं
११५ एक क्षेत्र एक ज्ञान । एक ज्ञेय एक अज्ञान
माग केले अवधान । जाणोनि तुझें
११६ तरी केवळ जे सत्ता । तो पुरुष गा पाण्डुसुता
प्रकृती तें समस्ता । क्रिया नाम
११७ म्हणौनि तीन्ही या जाणा । कार्यकर्तृत्वकारणा
प्रकृती मूळ हें राणा । सिद्धाचा म्हणे
११८ तव प्रकृति उद्यम करी । पुरुष भोगी
प्रकृतिपुरुषाची कुळवाडी । सांगता असगडी
जे आवुली जोडी । आवुला खाय
११९ अर्जुना कांहींचि जेथ नाहीं । तो प्रकृतीचा भर्तार पाहीं
१२० तो तरी अकर्ता । उदास अभोक्ता
परी इया पतिव्रता । भोगाविजे
१२१ हे अद्वयाचें दुसरें । हे नि सगाचें सोयरें
हे निराळेसिं घरें । नादत असे
इयेतें येतुलावरी । सौभाग्यव्याप्ता थोरी
म्हणौनि तया आवरी । अनावरातें
१२२ ऐसेंनि इया प्रकृती । आपुलिया सर्वव्याप्ती
तया अविकारातें विकृती- । मार्जी कीजे
१२३ राजा पराधीन जाहला । कीं सिंह रोगें रुधला
तैसा पुरुष प्रकृती आला । स्वतेजा मुके
१२४ हा प्रकृतीमार्जी उभा । परी जुई जैसा वोयबा
१२५ प्रकृति होय जाये । हा तो असतचि आहे
१२६ तैसीं मूर्ते अवघडें । परी वस्तु उजू

१२७ हे भूतग्राम विषम । तरी वस्तु ते एथ सम

१२८ जें आकाराचें पैल तीर । जे नादाची पैल मेर
तुर्येचें माजघर । परब्रह्म जें

१२९ हें काळानळाच्या तोंडीं । घातली लोणियाची उंडी
माशी पाख पाखडी । तव हें सरे

१३० नुसधीची शांतिकथा । आणिजेल कीर वाक्पथा
जे शृंगाराच्या माथा । पाय ठेवी
दारू वेल्हाळ देशी नवी । जे साहित्यातें वोजावी
अमृतातें चुकी ठेवी । गोडसपणें

१३१ म्हणौनि अक्षरीं सुमेळीं । उपमाश्लोक कोंदाकोंदी
झाडा देईन प्रतिपदीं । ग्रंथार्थासी

## अध्याय नवदावा

श्रीकृष्ण पुढें म्हणाला—ज्ञान हें आपलेंच असता उगीच परक होतें. या ज्ञानानें मोक्ष स्वाधीन होतो, व संसार वर डोकें काढीत नाहीं. सूक्ष्म व स्थूल देहाचें द्रुपण ओलांडून जीवाना सत्स्वरूप होता येतें. हा मोक्ष अनादि मिळतो. प्रकृतीकडून होणाऱ्या मूळ निर्मितीच्या वेळींहि त्याना जन्मावें लागत नाहीं. अज्ञानालाच महद्ब्रह्म म्हणतात. त्यालाच विकाराचे फाटे फुटतात. अव्यक्तवादी त्याला अव्यक्त म्हणतात व सांख्य प्रकृति म्हणतात, तर वेदांती त्याला माया म्हणतात. अज्ञान ही एक प्रकारची सांज वेळ आहे, म्हणजे तींत सत्यज्ञान नसतें व विपरीत ज्ञानहि पण नसतें. या अज्ञानानें गुडाळलेला जो चैतन्यरूपी प्रकाश त्याला क्षेत्रज्ञ असें नाव आहे. त्या क्षेत्रज्ञाची पत्नी अविद्या ही होय. ती निजलेल्याला जवळ करते व जागें असणाऱ्या पतीपासून दूर जाते. मायेच्या संगामुळें प्रथम रजोगुणात्मक बुद्धितत्त्व जन्मतें. मग मन, अहंकार इत्यादि अष्ट विकाराच्या हालचालीनें त्रिगुणात्मक गर्भपिंड पाहून, जीव त्यात प्रवेश करितो. आणि मग ओलाव्यामुळें बीजाला अंकुर फुटतात तसेच जीवालाहि फुटतात. मणिज (अंडज) उद्भिज, जारज इत्यादि भूतयोनि उत्पन्न होतात. या मुलावर माया निरनिराळे अलंकार घालते. ते मूल त्रिलोक व त्रिकाल व्यापतें. युगाच्या रूपानें पावलें टाकतें.

निरनिराळ्या शरीरात मीच माझें प्रसारण करविता व त्यात दोऱ्यानें बांधल्याप्रमाणे मीच राहतों. हे गुणरूपी दोरे तीन आहेत. ते सत्त्व, रज, तम. एकच वृत्ति तिरशी असू शकते. सत्त्वगुणी जीव सुख व ज्ञान यानीं विणलेल्या पाशात अडकतो व अष्ट सात्त्विक भावानीं गर्वाला चढतो. रजविणारा म्हणून रजोगुण हें नाव दुसऱ्या प्रकारच्या गुणाला आहे. त्याच्या योगानें अभिलाषा–तृष्णा–आसक्ति उत्पन्न होतात. अति तृष्णेनें तो साहस करितो किंवा गवताच्या काडीइतका लाभ झाला तरी कृतकृत्यता मानतो. तो इष्टापूर्त काम्य कर्मे करतो, व त्यानीं स्वर्ग मिळवीन म्हणतो. तमोगुण हा अज्ञानानें जीवाच्या डोळ्यावर पडणारा पडदा आहे. अविचार हा तमोगुणाचा महामंत्र होय. त्याच्या योगें जडपणा, मूर्खपणा, कटाळा, भ्रम, झोपेची आवड, प्रमाद इत्यादि अनिष्ट गोष्टी तमोगुणानें उत्पन्न होतात. जेव्हा सत्त्वगुण वाढतो तेव्हा तो जीवाकडून मी सुखी आहे असें म्हणवून घेतो. त्याप्रमाणे आरूढून पालटून रजोगुण व

तमोगुण हेहि एकमेकांवर प्रभावी होऊं शकतात, व त्या त्या प्रकारचीं फळें पाववितात. तमोगुणानें सारासार विचार नष्ट होतो, बुद्धि जड होते, स्मृति भ्रष्ट होते. तमोगुणाच्या मनुष्याच्या आचारभ्रष्टतेवरून कोणीहि सांगूं शकतो कीं, याचें शरीर म्हणजे महारवाडा आहे. घुबडाला अंधारांत दिसतें त्याप्रमाणें याला वाईट कृत्यें करण्यापुरतीच दृष्टि येते. तो मद्य न पितांच झोकांड्या खातो, वातविकार झाल्याशिवाय बरळतो, आणि प्रेमावांचून मुरकतो. तमोगुणाच्या स्थितींत मरणाऱ्याला पुढील जन्म माणसाचाहि मिळत नाहीं. सत्त्वगुणापासून पुण्य-कर्मच निष्पन्न व्हावयाचें. रजोगुणाचें कर्म बाहेरून गोड दिसलें तरी आंत दुःखच असणार. कडूलिंबाची लिंबोणी बाहेरून सुंदर दिसते पण आंत कडू असते.

सत्त्वगुणापासून ज्ञान, रजोगुणापासून लोभ, व तमोगुणापासून प्रमाद होतात. सत्त्वगुणी स्वर्गांत राजा होतो, रजोगुणी मनुष्यलोकांत जन्मतो, तमो-गुणी नरकांत जातो. हे तीन गुण एकत्र होऊन सूक्ष्म व स्थूल देह निर्माण करितात. ही निर्मिति म्हणजे जीवाला बंधनच होय. तथापि आत्मा गुणांना वश न होतां राहूं शकतो. नट स्वतःचें सोंग आरशांत दिसलें तरी स्वतःला विसरत नाहीं, आणि नदीकांठावर उभा राहिलेला मनुष्य पाण्यांतील आपलें प्रतिबिंब छिन्नविछिन्न झालेलें पाहून घाबरत नाहीं, त्याप्रमाणें आत्मा सम-जतो कीं, मी साक्षी अकर्ता आहें व गुण हेच कर्माला कारण आहेत. आत्मा मद्रूप झाल्यावर तो देहांत असला तरी गुणांच्या तावडींत सापडत नाहीं. अंगावरून टाकलेल्या कातीकडे साप परत येत नाहीं, व हवेंत गेलेला सुवास फुलांकडे परत येत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानी हा ब्रह्माशीं ऐक्य पावल्यावर परत गुणात्मक शरीराकडे येत नाहीं. मग ते गुण त्या शरीराकडून कांहींहि करवीनात का ! त्याची कर्माकडे क्वचित् प्रवृत्ति झाली तरी त्याला कर्तेपणाचा अभिमान असत नाहीं. रणांगणावर युद्ध झालें तरी त्याचें त्या रणक्षेत्राला काय होय ! पांथस्थ ब्राह्मण कोणत्याहि घराची काळजी बाळगत नाहीं. वाट दाखविण्या-करितां उभा केलेला खांब वाटसरूंची चौकशी कशाला करील ? कोंड्यापासून दाणा वेगळा निघाला म्हणजे त्याला त्या कोंड्याचें काय होय ? गाढ झोंप लागलेल्या मनुष्याला शेजारीं सर्प येऊन बसला किंवा उर्वशी येऊन निजली तरी एकच. तो सुख-दुःख, मान-सन्मान, स्तुति-निंदा यांचे पलीकडे असतो. सहजप्राप्त भोगानें तो विचलित होत नाहीं. ज्ञानी भक्त हा असा असतो. तो

विश्वासकट माझा व माझ्यासकट विश्वाचा स्वीकार करतो. सोन्याची टिकली सोन्यावरच बसविली तर ती वेगळी कशी होणार ? ऐक्यानें ज्याची दृष्टि विकसित होते, तोच ज्ञानी भक्त त्याला त्रिपुटी हे ब्रह्मच असते. सोहं वृत्तीनें बिंब व प्रतिबिंब हीं एकाच तेजानें जोडलीं जातात जळत जाळून व तेवढ्यापुरता प्रकाशून नंतर अग्नि विझतो, त्याप्रमाणें ज्ञान हें प्रथम अज्ञानाला नष्ट करतें व नंतर स्वतः नष्ट होतें अद्वैत्यालाच सायुज्य म्हणतात व तोच चवथा पुरुषार्थ म्हणजे मोक्ष

---

## ( १४ व्या अध्यायांतील निवडक वचनें )

१ तू जयाप्रति लपसी । तया विश्व हें दाविसी
 प्रकट तें करिसी । आघवेंचि तू
 पुढिलाची दृष्टि चोरिजे । हे दृष्टिबंद निफजे
 परी नवल लाघव तुझें । जे आपणपें चोरे
२ तरी तू जैसा आहासि तैसिया । नमो जी गुरुराया
 मज ग्रंथोद्यम फळावया । वेल्हाळा होई
 आता कृपामाडवल सोडीं । भरीं माझे मतीची पोतडी
३ माझी प्रज्ञावेली वेल्हाळ । काव्यें होय सफळ
 तो वसंत होयीं स्नेहाळ । शिरोमणी
 प्रमेय महापुरें । हे मतिगंगा ये थोरें
 तैसा वर्ष उदारें । दिठीवेनी
४ तरी कैसा पां असंगा संग । कोण तो क्षेत्रक्षेत्रज्ञयोग
५ आम्ही मागां तुज बहुतीं । दाविलें हें उपपत्तीं
 तरी आझुनी प्रतीती । कुशीं न रिघे
६ येऱ्हवीं ज्ञान हें आपुलें । परी पर ऐसेनि जालें
 जे आवडोनि घेतलें । भवस्वर्गादिक

७ मनें मन माळंनिया मार्गे । विश्राति जालिया आगें
ते देहीं देहाजोगे । होतीचि ना
८ जें मी जेव्हढें जैसें । तें तेचि जाले तैसें
९ मग म्हणे गा प्रज्ञाकाता । उजवली आजि वक्तृत्वता
जे वोला येवढा श्रोता । जोडलासी
१० अव्यक्तवादमतीं । अव्यक्त ऐसी वदती
साख्याचिया प्रतीतीं । प्रकृती हेची
वेदातीं इयेतें माया । ऐसें म्हणिजे प्राज्ञराया
११ आपला आपणपया । विसर जो धनजया
तेंचि रूप इया । अज्ञानासी
१२ अज्ञान थोरिये आणिजे । आपणपें तरी नेणिजे
तें रूप जाणिजे । क्षेत्रज्ञाचें
हाचि उभययोग । बुझें बापा चाग
सत्तेचा नैसर्ग । स्वभाव हा
१३ तेवीं लवकलिया दिठी । मग देखणें जें जें उठी
तया नाम सृष्टी । मीचि विये पैं गा
१४ तरी माझी हे गृहिणी । अनादि तरुणी
अनिर्वाच्यगुणी । अविद्या हे
इयें नाहीं हेंचि रूप । ठाणें हें अतिउमप
हे निद्रिता समीप । चेता दुरी
पैं माझेनिचि आगें । पहुडल्या हे जागे
आणि सत्तासमोगें । गुर्विणी होय
१५ महृची पेलले पोट । निवृची ते पाठी नीट
१६ आता यस्रो हे बहु बोली । ऐसें विश्व माया व्याली
तेय साद्य जाली । माझी सत्ता

१७ म्हणौनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें
तैसा नोहें, उखितें । आघवें मीची

१८ हें एकेचि वृत्तिच्या ठायीं । त्रिगुणत्व आवडे पाहीं
वयसात्रय देहीं । येकीं जेवीं

१९ जें विद्वत्तेचें भरे । भूत आगी

२० कीं विषयज्ञानें होये । गगनायेवढा

२१ तो दोंदाणा मानी । इंद्र ना मी

२२ आणि म्हणे आजि आन । मीवाचून नाहीं सज्ञान
चातुर्यचंद्रा गगन । चित्त माझें

२३ हें रज याचिकारणें । जीवातें रजाऊ जाणे
हें अभिलाखाचें तरुणें । सदाचि गा

२४ जीविताची कुरोंडी । वोवाळूं लागे कवडी
मानी तृणाचिये जोडी । कृतकृत्यता

२५ तयाचिपरी सुरकुडी । उकल नेणे

२६ झोंपीं जाता स्वर्ग । वाबो म्हणे

२७ केववा कैसें राहाटावें । कोणेसीं काय बोलावें
हें ठाकतें कीं नागवें । हेंही नेणे

२८ जे प्रज्ञा आतुलीकडे । न समाती बाहेरी वोसंडे

२९ नायिकणें तें कानाचि वाळी । न पाहणें तें दिठीचि गाळी
अवाच्य तें टाळी । जीभाचि गा

३० साग पा धनुर्धरा । रावो रायपणें डोंगरा
गेलिया अपुरा । होय काई ?
नातरी येथींचा दिवा । नेलिया सेजिया गावा
तो तेथें तरी पांडवा । दीपचि की

३१ आणि आड पडलिया । उद्यमजातां मलतियां
प्रवृत्ती धनंजया । हात न काढी
ऐसा अचाट छंद । घेऊनी उठी

३२ सुरवाडेंसि भिकारी । वसो पां राजमंदिरीं
तरी काय अवधारीं । रावो होईल ?

३३ म्हणौनि व्यापाराच्या हातीं । उसंतु देहा ना राती
तैसयाचिये पांती । जुंपिजे तो

३४ अविवेकाचेनि माजें । सबाह्य शरीर गाजे

३५ मदिरा न घेतां डुले । सन्निपातेंवीण बरळे
निष्प्रेमेंचि भुले । पिसें जैसें

३६ राई राईपण बीजीं । सांठवूनियां अंग त्यजी
मग विरूढे तैं दुजी । गोठी आहे ?

३७ म्हणौनि बा रे अर्जुना । येथ सत्त्वचि हेतु ज्ञाना
जैसा का दिनमाना । सूर्य हा पैं

३८ सर्वत्यागें चतुर्थी । भक्ति जैसी

३९ ते तनुत्यागीं स्वर्गींचे । राय होती

४० तैसें हें सांतःकरण । देहचि होवी त्रिगुण

४१ परि चोज हें धनुर्धरा । जे येवढा हा गुंफिरा
मोक्षाचा संसारा । उणा नोहे

४२ तैसें गुणीं गुणापरौतें । जें आपणपें असे आयितें
तिये अहं यैसे अहंते । मूळकेचिये

४३ सत्त्वरजतमांच्या । भेदीं प्रसर कर्मांचा
होत असे तो गुणांचा । विकार हा

४४ मी दावुनी गुण देखे । गुणता हे मियां पोखे
यथाचेनि निःशेखें । उरे तें मी

४५ नळिकेवरूनि उठिला । जैसा शुक शाखे बैसला
तैसा मूळअहंता ठेला । तो मी म्हणौनि
४६ का सौरभ्यजीर्ण जैसा । आमोद मिळोनि जाय आकाशा
माघारा कमळकोशा । न येचि तो
पैं स्वरूपसमरसें । तयाही गा जालें तैसें
तेथ किंधर्म हें कैसें । नेणे देह
४७ तैसी देहबुद्धि जाये । जें आपणपा आठी होये
तें आन काहीं आहे । तेंवाचूनी
४८ तैसें गुणागुणकार्य हें । आघवेंचि आपण आहे
म्हणौनि एकेका नोहे । तडातोडी
४९ का शरीरा आतील प्राणु । घरीं आतिथ्याचा ब्राह्मणु
नाना चोहटाचा स्थाणु । उदास जैसा
५० तैसा गुणाचिये गजबजे । डोलेना जो
५१ येऱ्हवीं तरी सहजें । सुखदु ख तेंचि सेविजे
देहजळीं होइजे । मासोळी जें
५१ पैं निद्रिताचेनि आंगेंसीं । साप तैसी उर्वशी
तेंवि स्वरूपस्था सरिसीं । दहीं द्वंद्वें
५३ निवटलें न उपवढे । जळीनलें न विरूढे
साम्यबुद्धि न मोडे । तयापरी
५४ तैसी साहोमाही मनें । वर्जिली असे
५५ या कारणें भेदातें । सांडूनि अभेदें चित्तें
आपणासकट मातें । जाणावें गा
५६ प्रतिबिंबोनि बिंबवरी । प्रभेची जैसी उजरी
ते सोहंवृत्ति अवधारीं । तैसी होय

५७ ना तरि जाळूनि तृण । वन्हिही विझे आपण
तैसें भेद नाशूनि जाण । ज्ञानही नुरे
माझें पैलपण जाये । भक्त हें ऐलपण ठाये
अनादि ऐक्य जें आहे । तेंचि निवडे

५८ परी माझें आराधन । भक्तीं होय सोपान

## अध्याय पंधरावा

नंतर श्रीकृष्ण म्हणाला—या संसाराला वृक्षाची उपमा चांगली बसते. मात्र तो वृक्ष विपरीत असताच त्याचें बूड वर व शेंडा खालीं असतो. साधें झाड जमिनीवर पडलें तर तें सुकतें, तसें हें नाहीं. याचीं मुळें वर व फांद्या खालीं ! यामुळें या मुळ्याचा अंत लागत नाहीं. या वृक्षानें आकाश व्यापलें आहे वरच्याप्रमाणें खालीहि याला मुळ्या फुटतात. यामुळें तो नेहमीं हिरवागार राहतो. याच्या पारंब्यामध्ये डाहळ्या उगवतात या वृक्षाला विश्वाचा आकार आहे. वृक्षाचें नाव अश्वत्थ आहे. याला ब्रह्म हें ऊर्ध्व आहे असें म्हणावयाच, कारण खाली संसार आहे म्हणून. या संसारवृक्षाच्या मुळाची 'माया' म्हणून प्रसिद्धि आहे ती आहे म्हणावी तर विचारानें तिला बाध येतो व नाहीं म्हणावी तर ती जगत्कार्य करते माया ही संपूर्ण विश्वाकाररूपी वस्त्राची घडी आहे. मायेच्या आळ्यामध्यें हा वृक्ष उगवतो व मूळ धरतो, आणि मग त्याला खालीं अंकुर फुटतो. त्याला महत्तत्त्व हें लुसलुशीत पान निघतें मग त्याला त्रिगुणात्मक शेंडा फुटतो मग पंचमहाभूतांचे कोंक सरळ फुटतात. त्यांना फुटलेल्या पानें मात्र सारखीं नसतात. मग आशेचें कांडें, इंद्रियांचे वेल, अशा क्रमानें वृक्ष वाढतो. पण त्याची वाढ ब्रह्मापलीकडे होऊं शकत नाहीं.

या वृक्षाला अश्वत्थ म्हणण्याचें कारण असें –अ म्हणजे नाहीं आणि श्व म्हणजे उद्या. याचा अर्थ हा उद्यापर्यंत टिकणारा नाहीं, प्रतिक्षणीं नाश पावणारा आहे हा अश्वत्थ म्हणजे साधा पिंपळ नव्हे हा वृक्ष नाश पावत असताहि अविनाशी असा भासतो. दानामध्यें खर्चलेला पैसा हा वेगळ्या दृष्टीनें द्रव्य संग्रहच ठरतो कीं ! नाश व पुनरुत्पत्ति हीं कशा होतात हें कळत देखील नाहीं साल गळलेली दिसावी तों आतून कांडें निर्माण व्हावीं असें घडतें. मन्वंतर व युगांतरें अशींच घडतात. अतिशय वेग मिळाला म्हणजे वस्तु स्थिर वाटते जोरानें चक्राकार फिरणारा भोंवरा स्तब्ध वाटत नाहीं काय ? हातात कोलती घेऊन जलद फिरविली तर अखंड तांबडी रेघ दिसते तसेंच हें आहे. मात्र ही गोष्ट, म्हणजे यातील खरें मर्म, ज्ञानी मनुष्यच जाणतो. या वृक्षाच्या डाहळ्या एकमेकांत एक गुंततात, वाऱ्यानें हलतात, मोडतात, एकमेकांवर घासतात.आणि असें झालें म्हणजे कांहीं डाहळ्या मोडून पडतात. त्याप्रमाणें वेदानें सांगितलेलीं आणि न सांगितलेलीं कर्मे अशाच गुतागुंत होऊन घर्षण पावतात. साऱ्या वृक्षांमध्यें

जें घडतें तेंच या अश्वत्थ वृक्षासंबधींहि घडतें, म्हणजे त्याच्या मुळ्या व वरचा विस्तार दोनही एकाच वेळीं वाढत असतात. धर्माचरणापासून श्रद्धे नुसार निरनिराळे लोक प्राप्त होतात, त्याप्रमाणें निरनिराळ्या स्वर्गाचीं फळ फुलें या वृक्षशाखांवर येतात. ब्रह्मादि लोक ह्या वरचीं मुळें असलीं तरी, व त्यांना प्रसिद्ध ऋषि–मुनींचीं नावें असलीं तरी, त्याचीं मुळें मनुष्यच असतात

मग असा हा प्रचंड वृक्ष उमळून पडणें किंवा उपटून निघणें शक्य आहे काय? उत्तर 'होय' असेंच आहे. कारण तो वृक्ष मायामय कल्पनामय आहे विचार जागृत झाला नाहीं तोंपर्यंत वृक्ष आहे, विचार व ज्ञान उत्पन्न झालें कीं हा संसारवृक्ष कोसळून पडतो. त्याला खरी उत्पत्तिच नाहीं, त्याचा अंत काय कठिण? अजाणत्या माणसाला इंद्रधनुष्य हें खरं धनुष्य वाटतें तसेंच हें आहे. हा वृक्ष आहे असा मानतो तेव्हांहि प्रतिक्षणीं त्याच्या रुपांत फरक पडत असतो. म्हणून ज्ञानानें त्याचा नाश होतो मात्र वैराग्याशिवाय तें होत नाहीं अहं इदं या वृत्ती लोपलेलें आत्मस्वरूप पाहावें, कारण तं पूर्वीचें आहेच विहीर उकरणेचे आधीं तिचे झरे तयार असतात विहीर उकरल्यावर ते झरे दिसून पडतात इतकेंच.आपल्या डोळ्यांत आपलें बुबूळ पाहावं तसेंच आत्मस्वरूप पाहणें होय. आत्मस्वरुपाचा लाभ झालेल्याला कर्में सोडून जातात याला दाखला हाच कीं, पावसाळ्याअखेर ढग आकाश सोडून जातात, किंवा दरिद्री या निर्दय पुरुषाला त्याचे आप्त कंटाळून सोडून जातात अथवा वृक्षाला आग लागलेली पाहून त्यावरचे पक्षी उडून जातात चंद्रसूर्यादिकांचा प्रकाश पडेल तेवढीच वस्तु मनुष्याला दिसते. पण आत्मस्वरुपाचा प्रकाश झाला म्हणजे विश्व लोपतें, दिसत नाहींसें होतें. उलट तो प्रकाश लोपला म्हणजे विश्व दिसू लागतें

माझ्या स्वरूपीं मिळाल्यामुळे जे परत येत नाहींत ते मूळचे वेगळे आहेत व नाहींत—दोन्ही म्हणता येईल. मी मूळ अविकारी असल्यामुळें मला अंश नाहींत. परंतु जीवलोकांतील जीवामुळें अंश भासतात. जीवलोक म्हणजे जीवाची घालमोड चालणारा संसार. स्वप्नांतील स्वभांत संसारी बनावं त्याप्रमाणें आत्मा देहधारी बनतो. या कामीं इंद्रियें त्याला साहाय्य करतात. जीव हा कर्मानुसार एखाद्या स्थूल देहांत प्रवेश करतो किंवा वाटल्यास तो देह सोडून जातो, आणि बरोबर मन इंद्रियादि असल्यामुळें नवा खटाटोप आरंभतो असें पाहणारे म्हणतात 'आत्मा जन्माला आला व जाव भोगू लागला.' झाड हललेलें दिसलं म्हणजे वारा आहे असें ठरतें हें खरं, पण झाड हलत

नाहीं तेव्हांहि वारा असतोच. आपण आरशा'त स्वतःला पाहिलें म्हणजे दिसतों, पण तसें न दिसतों तेव्हा खरोखर नसतो काय ? असड आत्मसत्तेवर अज्ञान दृष्टीनें कल्पिलेले असेच देह उत्पन्न होतात व नाश पावतात. विश्वातील सर्व प्रकाश माझा आहे. मीच पृथ्वीत प्रवेश करून सर्व भूताना धारण करितों. मीच चद्ररूपानें भरलेले चालतें अमृत सरोवर असतों, व त्याच्या किरणानीं वनस्पति उपजवितों. मीच जठराग्नि होतों व सर्व प्रकारचीं अन्नें पचवितों. स्वरूपवैचित्र्य व सुखदुःखें मीच निर्माण करतों. एकच आकाश ध्वनि पण निरनिराळ्या वाद्यांतून प्रगट झाल्यानें निरनिराळे सूर ऐकू येतात. तसेंच माझे होतें. याला कारण खरोखर मी नसून जीवाची बुद्धिच होय. स्वाती नक्षत्राचा तोच पाण्याचा बिंदु, शिंपल्यात पडला तर त्याचें मोतीं होतें व सर्पाचे तोंडात पडला तर विष होत. त्याप्रमाणें मी ज्ञानी असेल त्याला सुख देतों, अज्ञानी असेल त्याला दुःख देतों मी अज्ञान नाहींसें करून मग ज्ञानहि नाहासे करितो. साधा चोर वस्तु पळवितो, पण माग लागण्यासारख्या खुणा मागें ठेवतो. मी मात्र असा अद्वितीय चोर आहें की, अज्ञानाची चोरी करून जाताना चोरी उमगविणारा माग असे जे ज्ञान तेंहि बरोबर घेऊन जातों.

क्षर आणि अक्षर हे दोन अल्प मात्र पुरुष ससाररूप नगरात वस्ती करतात. पण त्यापलीकडे तिसराही एक पुरुष आहे, व तो प्रकट झाला म्हणजे त्या नगरासकट त्या पुरुषाना खाऊन टाकतो. त घडेपर्यंत त्या दोन अल्पमात्र पुरुषाचा व्यवहार चालू असतो, पण मौज ही कीं, त्यापैकी एक पुरुष आधळा व एक पागळा असतो. अहकारावर स्वार होऊन जें चैतन्य ससार व स्वर्गरूपी रानात धावतें त्या चैतन्याला क्षर पुरुष असें नाव आहे आत्मा उपाधिरूप झाला म्हणून त्याच्यावर क्षरपणाचा आरोप आला. उपाधींच्या नाशाबरोबर तो नाश पावतो असे भासतें. उपाधींच्या नाशवंतपणामुळें क्षर हें नाव आहे आणि दुसरा जो अक्षर पुरुष तो यथार्थ ज्ञान व विपरीत ज्ञान याच्या मध्यमार्गी आहे. मातीचें रूप प्राप्त न झालेल्या चिखलाच्या गोळ्यासारखें अक्षर पुरुषाचें स्वरूप केवळ मध्यस्थ असे आहे. अज्ञानावस्थेला अक्षर ही सज्ञा आहे जसे अमावास्येच्या दिवसाचें चद्राचेंच पण सर्व कलारहित स्वरूप. फळ पिकल्यावर झाड जसें बीजात राहत त्याप्रमाणें, उपाधींचा नाश झाल्यावर या उपाधी व क्षर पुरुष दोनही जेथें लीन होऊन राहतात त्याला अव्यक्त म्हणतात. ज्या अव्यक्ताला वेदांतात बीजभाव असें नाव दिलें ते अव्यक्त त्या अक्षर

पुरुषाचें राहाण्याचें ठिकाण आहे. ज्या अव्यक्तापासून जीवत्व ही कल्पना विश्व या कल्पनेस उत्पन्न करीत स्वतः उत्पन्न होते, त्या दोन्ही कल्पनांचा लय जेथें होतो तो अक्षर पुरुष समजावा. अक्षर पुरुष यालाच ब्रह्मभाव म्हणता आलें असतें, परन्तु तो स्वप्न व जागृति या अवस्थांपत येऊ शकतो म्हणून त्याला तसें म्हणता येत नाही. जें चैतन्य क्षरपुरुषरूपी कार्याचें कारण आहे त्याला अक्षरपुरुष म्हणतात. त्रिविधज्ञानावाचून जें केवळ ज्ञान राहिलें तो क्षराक्षराहून वेगळा व त्यापलीकडचा उत्तम पुरुष होय. लाकडात अग्नि राहावा त्याप्रमाणें तो क्षराक्षरांत राहतो. त्याला मात्र स्वप्न, जागृति, सुषुप्ति कांहीं नाही. उत्तम पुरुषालाच परमात्मा म्हणतात. द्रष्टा व दृश्य या दोन्ही कल्पना जाऊन जी स्थिति असते ती अनुभवानें पाहणारा तोच उत्तम पुरुष. तोच विश्रांतीचा विसावा होय. जगद्भासरूपी आपला विकास व जगताचा प्रलयरूप संकोच या दोहोंला तो स्वतःच कारण असतो.

---

## ( १५ व्या अध्यायांतील निवडक वचनें )

१ सूर्यें अधिष्ठिली प्राची । जगा राणीव दे प्रकाशाची
 तेवीं वाचा श्रोतयां ज्ञानाची । दिवाळी करी

२ श्रवणसुखाच्या मांडवीं । विश्व भोगी माधवी
 तैसी सासिने बरवी । वाचावल्ली

३ तैसें मोक्ष देईल ज्ञान । येथ कीर नाहीं आन
 परि तेंचि थोर ऐसें मन । शुद्ध होआवें
 तरी विरक्तीवाचूनि कहीं । ज्ञानासी तगणेंचि नाहीं

४ जैसा भानु उंची नेणों कें । रश्मिजाळ तळीं फांके
 संसार हें कावरूलें । झाड तैसें

५ यया फळ ना सुथिता । फूल ना सुरभिता
 जें कांहीं पडुसुता । तें रूखचि हा

६ ज्ञातृज्ञेयाविहीन । नुसधेंचि जें ज्ञान
 सुखा भरलें गगन । गाळींव जें

७ जे भवद्रुमबीजिका । जे प्रपचचित्रभूमिका
विपरीतज्ञानदीपिका । साचली जे

८ घन अज्ञान सुषुप्ति । तो बीजांकुरभाव म्हणती
येर स्वप्न हन जागृति । हा फळभाव तियेचा

९ जैसा न लोटता क्षण । मेघ होय नानावर्ण
का विजु नसे सपूर्ण । निमेषभरी

१० ये हवीं दानशीळ पुरुष । वैंचकपणेंचि सचक
तैसा व्ययेंचि हा रुख । अव्यय गमे

११ सहारवात प्रचडें । पडती प्रळयाताँचीं सालडें
तव कल्पादीचीं जुबाडें । पाल्हेजती

१२ अप्रवृत्तीचे खणुवाळे । कोंभ निघती सरळ
घेत पान पालव डाळें । प्रमादाचीं

१३ मग तमाचें तें दारुण । स्थिरावलेया वाउवाण
सत्त्वाची सुटे सत्राण । वाहुटळी

१४ एव माळोवाळी उत्तरोत्तर । ऊर्ध्वशाखाचा पैसार
वुडीं साना अग्रीं थोर । फळाल्य हा

१५ म्हणोनि ब्रह्मेशानापरौतें । वाढणें नाहीं जीवातें
तेथूनि मग वरौतें । ब्रह्मचि कीं

१६ पार्था उर्ध्वींचिया ब्रह्मादि । मनुष्यत्वाचि होय आदि
म्हणौनि इथें अर्धी । म्हणितलीं मूळें

१७ तैसा जव पार्था । विवेकें नुघडी माथा
तव भत नाहीं अश्वत्था । भवरूपा या

१८ तैसें मूळ अविद्या स्याये । तें ज्ञान जैं उमें होये
तैंचि मया अन आहे । य हवीं नाहीं

१९ वाचूनि ज्ञानेंवीण एकें । उपाय करिसी जितुकें
तिहीं गुफति अधिकें । रुखीं इयें

२० परि तेंचि ठीला परजे । तेंवें वैराग्याचें नवें
अभंगबळ होआवें । बुद्धीसी गा

२१ मग इद्तेसि वाळलें । जें मीपणेंवीण दाहारलें
तें रूप पाहिजे आपलें । आपणाचि

२२ जिव्हे आपुली चवी चाखणें । चक्षु निज बुबुळ देखणें
आहे तमा ऐसें निरीक्षणें । आपुलें पैं

२३ निकवडचा निष्ठुरा । उभगिजे जेविं सोयरा
तैसें नागवती विकारा । वेंटाळू जे
फळली केळी उन्मूळे । तैसी आत्मलाभें प्रबळे
जयाची क्रिया दाळेंदाळें । गळती आहे

२४ तैसें आत्मप्रातीसाठीं । वस्तु विखुरली बारावाटीं
ते एकवटिती ज्ञानदृष्टी । अखंड जे

२५ जैसा काढिलिया मंदराचळ । राहे क्षीराब्धि निश्चळ
तैसा नुठी जया सळ । कामोर्मीचा

२६ म्हणौनि चंद्रसूर्य कडवसा । पडती वस्तूच्या प्रकाशा
यालागीं तेज जें तेजसा । तें वस्तूचें आग

२७ पुढतीं जे तेथ गेले । ते न घेतीनी माघौतीं पाउलें

२८ तेविं जहातें जीवविता । देहअहंता उपजविता
मी जीव गमे पडुसुता । जीवलेंकीं
पैं जीवानिया बोधा । गोचर जो हा धांदा
तो जीवलोक शब्दा । अभिप्राय

२९ तैसें अनादिपण न मोडे । माझें अक्रियत्व न सडे
परि कर्ता भोक्ता ऐसें आवडे । ते जाण गा भ्रांति

३० जैसा अपमानिला अतिथि । ने सुकृताची संपत्ति ॥

३१ पैं रुखु डोलत देखावा । तरी वारा वाजत मानावा
रुखु नसे तेथ पाहवा । नाहीं तो गा !

३२ जैसें तारागणीं भरलें । गगन समुद्रीं बिंबलें
परि तें तुटोनि नाहीं पडिलें । ऐसें निवडे

३३ सळाळाची लगबगी । फेडूनि खळाळाच्या मार्गीं
देखिजे चंद्रिका का उगी । चंद्रीं जेवीं

३४ हा गा बोलणतयाच्या ग्रंथीं । काइ तुटती संसारगुंती
कीं परिवेसलिया पोथी । वाचिली होय

३५ जळ शोषुनि गेलिया सविता । ओलांश पुरवीतसे जे मागौता
ते चंद्रीं पाहुणा । ज्योत्स्ना माझी

३६ एवं मीचि आघवें जन । जना निरवितें मीचि जीवन
जीवनीं मुख्य साधन । वन्हिही मीचि

३७ जैसें एकचि आकाशध्वनी । वाद्यविशेषीं आनानीं
वाजावें पडे भिन्नीं । नादांतरीं

३८ हें असो स्वातीचें उदक । शुक्तीं मोतीं व्याळीं विख
तैसा सज्ञानासी मी सुख । दुःख तों अज्ञानासी

३९ पैं अग्रें दिवस हरपला । तोही दिवसेंचि जाणों आला
तेवीं मी नेणोनि विषय देखिला । मजचित्तव भूतीं

४० तेवीं समूळ अविद्या खाये । तें ज्ञानही जै बुडोनि जाये
तन्ही नाहीं कीर नोहे । आणि न साहे असणेंही
पैं विश्व घेऊनि गेला मार्गेसी । तया चोरातें कवण कें गिंवसी
जे कोणी एसी दशा देसी । शुद्ध तें मीं

४१ सुखा नेणोनि पुसावें । मग आम्हीं परिसऊं बैसावें
तो गा हा पाड नव्हे । सोयरेया

४२ पैं दोहीं ओठीं एक बोलणें । दोहीं चरणीं एक चालणें
तैसें पुसणें सांगणें । तुझें माझें

४३ एक आंधळा वेडा पंगु । येर सर्वांगें पुरता चागु
परि ग्रामगुणें संगु । घडला दोघां

४४ ऐसिया वळघोनि स्वप्ना । धावत भवस्वर्गाचिया राना
तया चैतन्य नाम अर्जुना । क्षर पुरुष गा

४५ जो आपुलेनि विसरें । सर्व भूतत्वें अनुकरें
तो आत्मा बोलिजे क्षरें । पुरुषनामें

४६ ऐसें उपाधीचेनि पाडें । क्षणिकत्व यातें जोडे
तेणें खोंकरपणें घडे । क्षर हें नाम
एवं जीवचैतन्य आघवें । हें क्षर पुरुष जाणावें

४७ पैं आटोनि गेलिया सागर । मग तरंग ना नीर
तया ऐसी अनाकार । जे दशा गा

४८ ऐसें जीवकार्यकारण । जया मायासंगाचें लक्षण
अक्षर पुरुष जाण । चैतन्य तें

४९ जैसा वन्हि काष्ठ जाळूनियां । स्वयें जळे'
तैसें अज्ञान ज्ञानें नेलें । आपणही वस्तु देऊनि गेलें
ऐसें जाणणेंनिवीण उरलें । जाणतें जें

५० म्हणौनि पुरुष क्षराक्षर । दोन्ही देखोनि अवर
यातें म्हणती पर । आत्मरूप

५१ सुखाचि सुख जोडलें । जें तेज तेजासि सापडलें
शून्यही बुडालें । महाशून्यीं जिये

५२ तैसा काहींचि कोणीकडे । कायिसेनिहि वेंचीं न पं
जयाचें सांगडें । जयासीचि

५३ तो गा मी निरुपाधिक । क्षराक्षरोत्तम एक
म्हणौनि म्हणे वेदलोक । पुरुषोत्तमु

५४ म्हणौनि माझिया भजना । उचित तोचि अर्जुना
गगन जैसे आलिंगना । गगनाचिया

५५ साचचि बोलाचे नव्हे हें शास्त्र । पै संसार जिणतें हें शस्त्र
आत्मा अवतरवीते मंत्र । अक्षरें इयें

५६ हरपलें दानूनि जैसा । भाग सरे वीरविलासा
ज्ञानचि कळस वऱ्ये तैसा । कर्मप्रासादाचा

५७ जेव्हा द्राक्षीं घातलें । तेव्हा वाया गेलें गमलें
परि फळपाकीं दुणावलें । देखिजे जेवीं

५८ सेवतीये अरसिकाहीं । आग पाहता विशेष नाहीं
परि सौरभ्य नेलें तिहीं । भ्रमरीं जाणिजे

## अध्याय सोळावा

श्रीकृष्ण म्हणाले—आता तुला दैवी व आसुरी संपत्ति म्हणजे काय हें थोडें सांगतों दैवी संपत्तींत अगदीं प्रथम अभयाचा उल्लेख केला पाहिजे विहित व निषिद्ध कर्मे याविषयी अहंकाराला उत्पन्न होऊं न देणें आणि अशा रीतीनें संसाराचा धाक टाकणें याला अभय म्हणतात. तसेंच द्वैत भावानें उत्पन्न होणारें भय नसणें हें अभय होय. यथार्थ ज्ञानाच्या बरोबर राहून त्याचें रक्षण करणारा शिपाई हें अभय होय त्यानंतर सत्त्व–शुद्धि हा दैवी संपत्तीचा दुसरा प्रकार आहे जळत नाहीं व विझत नाहीं अशा अग्नीसारखी जी वृत्ति तिला सत्त्व–शुद्धि म्हणतात शुक्ल व कृष्ण या पक्षांमधील चंद्र, किंवा पावसाळ्यातला पूर संपला व उन्हाळ्यातला ओहोट सुरू झाला नाहीं या मध्यंतरींची जी गंगेची अवस्था, तिला दाखला सत्त्वशुद्धीला देता येईल. या वृत्तींत संकल्प विकल्पाची ओढ नसते दैवी संपत्तीचा तिसरा गुण म्हणजे ईश्वरविषयींच्या अनन्य भावानें योग किंवा ज्ञान यांत मग्न होणें हा होय. चौथा गुण दान म्हणजे अनेक प्रकारांनी परोपकार करणें किंवा उपयोगी पडणें त्यानंतर दम हा दैवी संपत्तीचा गुण येतो दमाचा अर्थ विषय आणि इंद्रियें यांची एकतानता होऊं न देणें किंवा ताटातूट करणें दमाच्या योगानें विषयाचा वारा इंद्रियांच्या द्वारांत वाहाण्याचा बंद होतो आणि त्या द्वारांत वैराग्याचा अग्नी पेटवून ठेवतो त्यानंतर यज्ञ. त्याचा अर्थ मनुष्यमात्रानें वर्णाश्रमधर्माप्रमाणें जें जें विहित कर्म किंवा विधि किंवा अनुष्ठान तीं करणें हें यज्ञकर्म होय. मात्र तें कर्म फलाशा न ठेवतां केलेलें असलें पाहिजे तसेंच कर्तेपणाचा अहंकार नसलेलें पाहिजे

हा यज्ञ म्हणजे मोक्षाच्या वाटेवरचा वाटाड्या आहे तसेंच स्वाध्याय हाहि दैवी संपत्तीचा गुण आहे स्वाध्याय म्हणजे वेद, स्तोत्रें, मंत्र, इत्यादिकांचें पठण. त्यांत नाममंत्रहि येतो यानंतर तप हा गुण त्याचा अर्थ प्राण, इंद्रियें व शरीर यांना आत्मप्राप्तीकरितां झिजविणें हें तपाचें बाहेरचें अंग होय पण त्याला आंतलेंहि एक अंग आहे तें अंग म्हणजे आत्मानात्मविचार जागृत ठेवणें यानंतर आर्जव त्याचा अर्थ सर्व प्राणिमात्राशीं भलेपणानें वागणें अहिंसा म्हणजे तें एक प्रकारचें थंड तेजच म्हणाना ! अहिंसा म्हणजे जगाला कायावाचामनें सुख देण्याची उत्कट बुद्धि पाणी हें डोंगराच्या कडा फोडतें

पण तेंच डोळ्याला लावले तर मऊ लागतें. सत्य ही देखील दैवी संपत्ति. सत्य म्हणजे तेच कीं जे कानाला मधुर लागतें, पण त्याचबरोबर तीक्ष्ण शस्त्राप्रमाणें संशयाचें छेदन करतें. प्रिय असूनहि पसवीन नाहीं व खरें असलें तरी सुपत नाहीं, तें सत्य होय. यानतर अक्रोधत्व. डोक्याला लाथ लागली तरी सर्पानें फडा काढू नये, आत तूप पडलें असताहि अग्नीनें प्रदीप्त होऊ नये, त्याप्रमाणें राग येण्यासारखी गोष्ट घडली तरी राग न येणें यास अक्रोधत्व म्हणावें. यानतर त्याग. त्याचा अर्थ अहता आणि विषयादि संस्कार याना टाकणें. यानतर शांति. तिचा अर्थ प्रथम ज्ञेय नाहींसें करुन मागाहून ज्ञाता व ज्ञान याच्याहि नाशानें उत्पन्न होणारी वृत्ति.

यानतर अपैशुन्य. म्हणजे आपले व परके, पात्र व अपात्र, हें कांहीं न पाहता त्याचे दोष विसरुन, त्याचा कमीपणा नाहींसा करुन, कोणाच्याहि मर्माला न दुखवून, त्याला उत्तम पुरुषाच्या बरोबरीला, सुस्थितीला, आणणें व त्याजवर उपकार करणें. त्याच्याविषयीं कासावीस वाटणें हेंच अपैशुन्य होय. यानतर दया. ती म्हणजे प्राणिमात्राला कृपाळूपणानें वागविणें. वाहत्या पाण्याला खड्डा दिसला तर तें तो खड्डा भरुनच पुढें जाईल, त्याप्रमाणें दयाळू हा दु:खितास सतुष्ट करुन मगच पुढें पाऊल टाकील. पाणी स्वत नाश पावेल, पण आपला आश्रय करणाऱ्या गवत काडीचाहि समाळ करील दयाळू मनुष्य हा दुसऱ्याच्या दु:खानें दु:खी होतो. यानतर अलोलुपत्व म्हणजे अनासक्ति–म्हणजे सहज कौतुकानें सुद्धा विषयाची इच्छा न करणें. सूर्य कमळ उमलवितो, परंतु त्याच्या सुवासाला स्पर्श करीत नाहीं. स्वतः निर्माण केलेल्या वनश्रीकडे वसत ऋतु पाहातो काय? नतर मार्दव म्हणजे मऊपणा. उदा० आईचें मुलाविषयीं प्रेम, किंवा जसा काहीं सर्वांगानीं सुखकर कापूरच

यानतर 'ऱ्हीं' म्हणजे लाज. हाहि दैवी सपत्तीचाच प्रकार होय. म्हणजे असा कीं हातून अनुचित गोष्ट झाली कीं जी खेदकर विनयशील वृत्ति उत्पन्न होते ती लाज. राजाला पराभवामुळें, मानी पुरुषाला अपमानामुळें, पतिव्रतेला वैधव्याचे स्मरण करुन देणारे शब्द ऐकल्यानें जी वृत्ति उत्पन्न होते तिला लाज म्हणतात, व लाज असणें ही दैवी सपत्तिच होय. यानतर 'अचापल'. म्हणजे प्राणाच्या जयानें कर्मेंद्रियाचे व्यापार बद करुन साधलेली स्थिरता, मन व प्राण यांचें नियमन केल्यानें आलेली स्थिति. यानतर तेज. अध्यात्मिक तेज तेंच कीं, ज्याच्या योगानें आत्मचिंतनामुळें विषयाची बाधा कमी करुन परमेश्वरा-

कडे धावण्याची अंतःकरणाची वृत्ति होते. यानंतर क्षमा. आपण सर्व कांहीं सहन करतों या विचारानें येणाऱ्या मोठेपणाच्या योगानें उत्पन्न होणारा गर्व नाहींसा करून वागणें. अंगावर केश धारण केले असतांहि त्यांचा भार न वाटणें, रोग खवळले, किंवा प्रिय वस्तूंचा वियोग झाला, किंवा अप्रिय वस्तूंचा योग घडला, तरी तें सहन करण्याचा जो गुण त्याला धृति किंवा धैर्य म्हणतात व तीहि दैवी संपत्तिच होय. धैर्य हें तापदुःखादिकांना गिळून टाकते.

यानंतर शौच म्हणजे शुद्धता. शरीरानें निष्काम आचरण व मनानें खरा विवेक म्हणजे आत्मानात्मविचार अशी जोड मिळणें हेंच खरें शुचित्व. म्हणजे जशी कांहीं गंगेचें पाणी भरलेली सोन्याची घागर. यानंतर अद्रोहत्व. जगाचें पाप गंगा नाहींशी करते, जगाला प्रकाश देत सूर्य प्रदक्षिणेला निघतो, त्याच-प्रमाणें अद्रोही मनुष्य इतरांचीं संकटें निवारण करीत, दुसऱ्याचें सुख वाढवीत, आत्महितांत प्रवेश करतो. यानंतर अमानित्व. या दैवी संपत्तीचें स्वरूप पूर्वी सांगितलेंच आहे. असे हे दैवी संपत्तीचे सव्वीस गुण-प्रकार आहेत. ज्याच्या अंगीं हे आले त्याला मुक्ति आपण होऊन शोधीत येते-जशी कांहीं पतिव्रता हातांत पंचारती घेऊन पतीला ओवाळण्याकरतां यावी.

अशा रीतीनें दैवी संपत्ति म्हणजे काय हें कळलें तरी त्याच्या उलट जी आसुरी संपत्ति तिचेंहि ज्ञान होणें अवश्य आहे. आसुरी संपत्ति ही एक मोठी कांटेरी वेल आहे. सर्व विषय मिळून कालकूट बनतें, तसा सर्व दोषांचा समुदाय म्हणजे ही आसुरी संपत्ति होय. यांत प्रथम दंभ येतो. दंभ याचा अर्थ आपण केलेलें धार्मिक किंवा इतर सत्कृत्य याची वाच्यता मोठ्या बढाईखोर-पणानें करणें. गुरूनें आपल्याला गुप्त विद्या दिली ती आपण चव्हाट्यावर मांडली तर निरुपयोगीच होणार. त्याप्रमाणें आपलें सत्कृत्य आपण तोंडानें सांगितल्यानें तें फुकट जातें. जो धर्म तोच अधर्म होतो. यानंतर दर्प म्हणजे मस्ती. चार अक्षरें आलीं कीं हा मस्तवाल मनुष्य इतर सर्वांना तुच्छ मानूं लागतो. एखाद्या घोड्यानें इंद्राच्या ऐरावतालाहि कमी मानावें, किंवा केवळ कुंप-णावर चढतां आलें म्हणून सरड्यानें आपण स्वर्गाला गेलों असें म्हणावें, तशी दर्पानें ग्रस्त झालेल्याची स्थिति होते. तो वेदांविषयींहि मत्सर बाळगतो, ईश्वर-राहा खाईन म्हणतो. दुसऱ्याचें तोंड पाहण्याची वेळ आली असतां त्याच्या दृष्टींत क्रोधानें विष भरतें.

यानतर क्रोध. दुसऱ्याचें भाग्य पाहून सतापी वृत्ति होणें याचच नाव क्रोध क्रोधी मनुष्यानें तोंडावून निघालेले शब्द हे बाणासारखे तीक्ष्ण असतात व डोळ्यांतून निखारे पडावे तसे ते लाल होतात. अज्ञान याचा अर्थ प्रसिद्धच आहे. जन्मांधाला रात्र किंवा दिवस कळत नाहीं, तद्वीच अज्ञानीं माणसाला विवेकाची दृष्टि राहत नाही. त्याला तारतम्य राहत नाहीं. या दोषांची सख्या थोडी म्हणून आसुरी सपत्तीचा अनिष्टपणा कमी 'असं होत नाहीं. दैवी संपत्ति ही मोक्षरूपी सूर्यानें उजाडलेली पहाटच होय. आणि आसुरी सपत्ति ही निशाच्या पायांत लोखंडी बेडी होय. या दोनहि सपत्तीचे धनी आपापल्या गुणाप्रमाणे वागतात हें उघडच आहे आसुरी संपत्ति देहाबरोबर वाढत जाते कोष-कीटक हा आपल्या भोंवती रक्षणाकरिता घर बाधतो पण त्याला दार ठेवावयाचें विसरतो आणि मग आत कोंडला जातो, तसा हा मनुष्य समजावा. त्याला पुण्यकर्माकडे प्रवृत्ति किंवा पापकर्मांकडून निवृत्ति घडत नाहीं. तो वाटेल तें करीत सुटतो. शेळीच्या तोंडाप्रमाणे त्याचें तोंड कशालाहि लागेल ईश्वर, वेद, न्याय, अन्याय, स्वर्ग, नरक या सर्व प्राचीन विचारव्यवस्थेला तो थोताड म्हणतो. योगी, भक्त, याज्ञिक, सन्यासी, या सर्वांना तो मूर्खांत काढतो देह-सुख तेंच पुण्य व देह-दुःख हें पाप मानतो चोरानें एखाद्या श्रीमंताला मारून त्याचें द्रव्य घेतलें तर तो म्हणतो कीं, ' माझ्या गाठीं पुण्य असल्याशिवाय हें धन मला कसें मिळालें असतें ? मोठा मासा लहान माशाला खातो हे खरें असले तरी मासा या जातीचें निसतान झालेले नाहीं यावरून बलवानानें अशक्ताला खावें हें अयोग्य ठरत नाहीं प्रजावृद्धीकरिता विवाह करावयाचे म्हणून मनुष्य विवाहाला मुहूर्त पाहतात. पण पशु व पक्षी यांची प्रजा इतकी वाढते, ते काय मुहूर्त पाहून लग्न करतात ? चोराच्या खिशातल्या पैशानें सावाच्या खिशातील पैशाइतकाच जिन्नस मिळतो, मग चोरीच्या पैशाला दोष कोणचा ? विषयवासना उत्पन्न होते, तर तिच्यामुळे व्यभिचार घडणारच काम हाच सर्व कामें करितो, व वेळ येईल तेव्हा काम हाच द्वेष उत्पन्न करतो. म्हणून सर्व जगाला मूळ कारण काम हाच होय'—अशा विचारानें ते नास्तिक व धर्मलंड बनतात. त्याना स्वर्गाविषयीं आदर किंवा नरकाविषयीं भीति वाटत नाहीं. जगाचा नाश करण्याकरिता उदय पावणारे धूमकेतू किंवा पापाला फुटणारे अंसे हे आसुरी लोक एकच जाणतात कीं, जे वाटलें म्हणून आहे त्याविरुद्ध वागावयाचें. ते कामाच्या जोडीला दंभ व मान हे घेतात.

जसा काही माज आला असता दारू पाजलेला हत्तीच. जन्मभर परपीडा करणें, एवढेंच त्याचें काम. देवाच्या नावानें सोडलेली गाय, तिला कोणी प्रतिबंध करीत नाहीं म्हणून वाटेल तें खात सुटते; त्याप्रमाणें हा आसुरी मनुष्यहि वागतो. तो विषयाची इच्छा व चिंता अमर्याद वाढवितो, पण सर्व काहीं हवें तें कोणाला कधीं मिळतें काय? अज्ञानी कोरड्या आशा मनात घेऊन त्याच्या जाळ्यात आपण गुंतावें इतकेंच फळ त्यांना मिळतें. तरी ते सर्व प्रकारचीं पापें, अपराध करितात. वाटेल त्या युक्त्या करतात. शिकारी लोक फासे, पोती, जाळी, कुत्री, ससाणे, चिकाटे, भाले अशीं शिकारीचीं साधनें योजतात, तशाच आसुरी मनुष्याच्या युक्त्या विविध असतात. तो आपण मिळविलेल्या लुटीचा गर्व वाहतो आणि हळूहळू सर्व जगातील धनाचा धनी होईन म्हणतो. इतरांना तो मारील किंवा निदान दास करून ठेवील. सिद्धा-प्रमाणें मी करीन तें होईल असें तो म्हणतो, तो कुबेराला तुच्छ लेखतो, स्वतःचें कुळ ब्रह्मदेवाहून अधिक शुद्ध व श्रेष्ठ आहे असें तो मानतो, जारणमारणादि अपप्रयोगांचा तो जीर्णोद्धार करितो, आपल्या मनोरथांची बडबड नेहमा त्याच्या तोंडात असते. पण आसुरी मनुष्य नरक मानीत नसलीं तरी शेवटीं त्याच नरकात पडतात व यमाची जाचणी भोगतात. आत्मसंतुष्टीमुळें ते इतर सर्वांना तुच्छ मानतात. त्यातल्या एखाद्याला म्हणजे आसुरी मनुष्याला एखाद्या वेळीं यज्ञ करताना कोणी पाहिलेंच तर इतकेंच समजावें कीं, तें ढोंग आहे. त्यानें यज्ञ एवढ्याचकरिता आरंभिला कीं, लोकांना येऊन त्याला आहेर करावे. वासरू मेलेल्या दुभत्या गाईच्या पुढें त्या मेलेल्या वासराचा पेंढा ठेवून व तिला फस-वून दूध काढतात, त्याप्रमाणें यज्ञ हा फसवणुकीचें साधन असतो. तसेंच जारणमारण इत्यादि प्रयोग करिताना ते प्राणिमात्रांना दुःख देतात तें मला ईश्वरालाच होतें. अशा या लोकांची मनुष्यपणाची पदवी मी काढून घेतों व त्यांना तमोयोनींत घालतों. हेतु हा कीं, त्यांनाहि दुःख कसें असतें तें कळावें. आणि नंतर ते अत्यंत वाईट जन्माला येतात. काम, क्रोध, लोभ, हे दुःख-मार्गावरील वाटाडे आहेत किंवा नरकाच्या उंबऱ्यावर मारलेले तीन खिळे आहेत. हे नसतील तरच चारांतील एखादा पुरुषार्थ लाभेल. मनुष्याच्या पायात या तीन कड्यांचा साखळदंड असतो. तो तुटेल तेव्हा सुखाच्या मार्गावर पाऊल पडेल. अशा स्वेच्छाचारी माणसाला ऐहिक सुखादि मिळत नाहीं, मग पारलौकिक कोठून मिळणार! म्हणून याविषयीं वेदाची आज्ञा या

उपदेश मानावा कारण त्यात पुरुषार्थ संपादण्याचें शास्त्र सांगितलें आहे शास्त्रानें टाकाव म्हणून सांगितलें तर टाकावें आणि काहीं घ्यावें म्हणून सांगितलें तर तें विष असलें तरी घ्याव श्रुति माउली हीच जीवाचें ब्रह्माशीं ऐक्य करते शास्त्राप्रमाणें वागणारे लोक लोकसंग्रह करणारे होतात कारण त्यांच्या हातात विश्वप्रामाण्याचा शिक्का असतो

---

## ( १६ व्या अध्यायातील निवडक वचनें )

१ जो अविचारार्ती रुसोनिया । गिळी ज्ञानाज्ञानचांदणिया
जो सुदिन करी ज्ञानिया । स्वबोधाचा

२ शब्दाचिया आसकडीं । भेदनदीच्या दोही थडीं
आरडत विरहवेडीं । बुद्धिबोध

३ म्हणौनि अद्वयबोधपाटणीं । तेथ महानंदाचीं दाटणी
मग सुखानुभूतींचीं घेणीं देणीं । मदावों लागती

४ न दिसणें दिसणेंनसीं मावळवी । दोहीं झाकिलें तें सैंध पाल्वी
काय बहु बोलों ते आघवी । उखाचि आनी

५ तेथ शाकही कीर बहुत म्हणावा । तयाचा हर्षवेगाचि तो घ्यावा
उजळोनि दिव्यतेजा हातिवा । ते भक्तीचि पाहावी

६ परि मी आजि तुझ्या गुणीं । लाचावलों अपराध न गणीं
मलते करीं परी अवधणीं । नुठीं कदा

७ एवं इयें विषयीं कीर । जाणते झुझावले अपार
परि मुमुक्षु इतर । साकांक्ष जाले

८ मरूनि प्रपंचाचा घोंट । कीजे देखताचि देखतया द्रष्ट
आनंदसाम्राज्याचा पाट । बांधिजे जीवा

९ जेथ एक एकातें पोखी । ऐसे बहुत पदार्थ येकीं
संपादिजती ते लोकीं । संपत्ति म्हाणिजे

१० आता सत्त्वशुद्धि जे म्हणिजे । ते ऐशा चिन्हीं जाणिजे
तरी जळे ना विझे । रासोंडी जैसी

११ तैसी संकल्पविकल्पाची वोढी । साडूनि रजतमाची कावडी
भोगिता निजधर्माची आवडी । बुद्धि उरे

१२ तैसें अधिकारपर्यालोचें । हें यज्ञ करणें सर्वांचें
परि त्रिय फळाशेचें । न घापे माजीं

१३ ना तरी ठेविलें देखावया । आदर कीजे दिविया
का शाखा फळें यावया । सिंपिजे मूळ

१४ तें द्विजासीच ब्रह्मसूत्र । येरा स्तोत्र का नाममंत्र
आवर्तवणें पवित्र । पावावया तत्त्व

१५ तैसा स्वरूपाचिया मसरा- । साठीं प्राणेंद्रियशरीरा
आटणीं करणें जें वीरा । तेंचि तप

१६ तैसें श्रवणसुखचतुर । परिणमोनि साचार
बोलणें जें अविकार । तें सत्य येथें

१७ तरी गिळोनि ज्ञेयातें । ज्ञाता ज्ञानही माघौतें
हारपे निरुतें । ते शांति पैं गा

१८ तैसी ज्ञेया देता मिठी । ज्ञातृत्वही पडे पोटीं
मग उरे तेंचि किरीटी । शांतीचें रूप

१९ जैसा पुजूनि देवो पाहिजे । पेरूनि शेता जाइजे
तोपौनि प्रसाद घेइजे । अतिथीचा

२० तैसे पुढिलाचेनि तापें । कळवळलिये कृपें
सर्वस्वेंसीं दिधलेंही आपणपें । न्यूनचि मानी

२१ तैसे ऐहिकींचे का स्वर्गींचे । भोग पाइक जालिया इच्छे
परि भोगावें हे न रुचे । मनामाजीं

२२ परी महाभूतें पोटीं वाहे । तेवींचि परमाणूमाजीं सामाये
या विश्वानुसार होये । गगन जेसें
२३ हें बहु असो देहपणें । नामरूपासि येणें
नाहीं गा लाजिरवाणें । तयाहूनि
२४ ऐसें ईश्वराकडे निज । धावे आपसया सहज
तया नाव तेज । आध्यात्मिक तें
जैसें देह वाहोनि रोमा । वाहणें नेण
२५ तैसें अधिभूताधिदैवा । अध्यात्मादि उपद्रवा
पातलेया पाडवा । गिळूनि घालीं
२६ किंबहुना दिवसराती । पुढिलाचे सुख उन्नती
आणित आणित स्वार्थी । प्रवेशिजे
२७ गंगा शंभूच्या माथा । संकोचली जेवीं पार्था
तेवीं मान्यपणें सर्वथा । लाजणें जें
२८ एवं इहीं सव्विसें । महासंपदा हे वसत असे
मोक्षचक्रवर्तीचें जैसें । अग्रहार होय
२९ कीं गुणकुसुमाची माळा । हे घेऊनि मुक्तिबाळा
वैराग्यनिरपेक्षाचा गळा । गिंवसीत असे
३० नाना विषवर्गे एकवट । तया नाव जैसं बासट
आसुरी संपत्ति हा खोट । दोषाचा तैसा
३१ का विद्या गुरूपदिष्टा । बोमाइलिया चोहटा
तरी इष्टदाचि परि अनिष्टा । हेतु होती
३२ तैसा दृष्टादृष्टाचा सरता । धर्म जाला तो फोकारिजे देखा
तरि तारिता तोचि दोखा- । लागीं होय
म्हणौनि वाचेचा चौबारा । घातलिया धर्माचा पसारा
धर्मचि तो अधर्म होय वीरा । तो दंभ जाणं

३३ अभ्रच्छायेचिया जोडी । निर्दैव घर मोडी
मृगांबु देखोनि फोडी । पाणियाडें मूर्ख
३४ तैसा विद्याविनोदविभवें । देखे पुढिलाचीं दैवें
तरी तव रोष दुणावे । क्रोध तो जाण
आणि मन सर्पाची कुटी । डोळे नाराचांची सुटी
बोलणें ते वृष्टि । इंगळांची
येर जें क्रियाजात । तें तिखयाचें करवत
ऐसें सबाह्य खसखसित । जयाचें गा
३५ ना तरि ते नानारसीं । रिघोनि दर्वी जैसी
परि रसस्वादासी । चाखो नेणें
३६ का दिधलें मागुतें येईल । कीं न ये हें पुढील
न पाहता दे माहवल । मूर्ख चोरा
तैसिया प्रवृत्ति निवृत्ति दोन्ही । नेणिजती आसुरीं जनीं
३७ तरि विश्व हा अनादि ठावो । येथ नियंता ईश्वररावो
चावडिये न्यावो अन्यावो । निवडी वेद
३८ यज्ञमूढ ठकिले यागीं । देवपिसे प्रतिमालिंगीं
नागवले भगवे योगी । समाधिभ्रमें
३९ वळी अबळातें खाय । हेंचि बाधित जरी होय
तरी मासया का न होय । निर्संतान
४० तरी पशुपक्ष्यादि जाती । जया मिती नाहीं संतती
तया कोणें प्रतिपत्ती । विवाह केले
४१ येथ उर्वशिया इंद्र सुखी । जैसा का स्वर्गलोकीं
तैसाचि कृमिही नरकीं । लोळतु आहे
म्हणौनि नरक स्वर्ग । नव्हे पापपुण्यभाग
जे दोहीं ठायीं सुखभोग । कामाचाचि तो

४२ एवं कामावाचूनि कांहीं । जगा मूळचि आन नाहीं
ऐसें बोलती पाहीं । आसुर गा ते

४३ किंबहुना उघड । आगीं लाऊनिया पाखंड
नास्तिकपणाचें हाड । रोंविलें जीवीं

४४ विरूढलिया अशुभ । फुटती तैं ते कोंभ
पापाचे कीर्तिस्तंभ । चाळते ते

४५ मग आपुलें केलें फोकारिती । आणि जगातें धिकारिती
दाहीं दिशीं पसरिती । स्पृहाजाळ

४६ वांछित तंव न पवती । मग कोरडियेचि आशेची संतति
वाढऊं वाढऊं होती । कोशकिडे
आणि पसरिला अभिलाष । अपूर्ण होय तोचि द्वेष
एवं कामक्रोधाहूनि । अधिक पुरुषार्थ नाहीं

४६ एकातें साधुनि मारितो । एकाचीं सर्वस्वें हरिती
एकालागीं उभारिती । अपायमंत्रें
पाशिकें पोतीं वागुरा । सुणीं ससाणे चिकाटी खोंचारा
घेऊनि निघती डोंगरा । पारधी जैसें

४८ हे मारिले वैरी थोडे । आणीकही साधीन गाढे
मग नांदेन पवाडें । येकलाचि मी

४९ मी भोगभूमीचा रावो । आजि सर्वसुखाती ठावो
म्हणौनि इंद्रही वावो । मातें पाहूनि

५० माझिया कुळाचा उजाळु । का जातिगोताचा मेळु
पाहतां मज्याहि हळु । उणाचि दिसे

५१ मातें गाती वानिती । नटनाचे रिझविती
तया देईन मागती । ते ते वस्तु

५२ म्हणौनि गा सुमति । जे कुमनोरथा पाळिती
ते आसुर येती वस्ती । तया ठाया
५३ मग ठवों नेणती कैसे । आटिवा लोहाचे रसाव जैसे
का उववले आकारें । शिळाराशी
तैसे आपुलिये वरवे । आपणचि रिझता जीवें
तृणाहीहूनि आधवें । मानिती नीच
५४ पै वासरुवाचा मोकसा । गाईपुढे ठेऊनि जैसा
उगाणा घेती क्षीररसा । बुद्धिवंत
तैसें यागाचेनि नावें । जग वाऊनि हावें
नागविती आधवें । अहेरावारीं
५५ सती आणि सत्पुरष । दानशीळ याज्ञिक
तपस्वी अलौकिक । सन्यासी जे
का भक्त हन महात्मे । इयें माझीं निजाचीं धामें
५६ म्हा सागता वाचा रडे । आठविता मन खिरडे
करा रे मूर्खी केवढे । जोडिले निरय
५७ जया आपणपें पोटिये । आत्मनाशा जो बिहे
तेणें न धरावी हे सोये । सावध होइजे
५८ जें कहीं अवचटें । हे तिन्ही सांखळ तुटे
ते सुखें आपलिये वाटे । चालों लाभे
५९ तैसा कामादिकीं तिघीं । साडिला सुख पावोनि जगीं
सग ठ हे मोक्षमार्गी । सज्जनाचा
६० ऐसा जो कामक्रोधलोभा । झाडी करूनि ठाके उभा
तोचि येरुद्धिया लाभा । गोसावी होय
६१ तरि माझालागीं मुल्का । ब्राह्मण पाणवुडा रिघाला
की तेवढी पावला । नास्तिक्यवाद

६२ एव परत ना स्वर्ग । ना ऐहिकही विषयभोग
तेथ केउता प्रसग । मोक्षाचा तो

६३ शास्त्र म्हणेल जें साडावें । तें राज्यही तृण मानावें
जे घेववी तें न म्हणावें । विषही विरु

६४ कार्यकार्यविवेकीं । शास्त्रेंचि करावीं पारखीं
अकृत्य तें कुडें लोकीं । वाळावें गा

६५ जे विश्वप्रामाण्याची मुद्दी । आजि तुझ्या हातीं असे सुबुद्धी
लोकसग्रहासि त्रिशुद्धी । योग्य होसी

## अध्याय सतरावा

अर्जुन म्हणाला—शास्त्राप्रमाणें वागावें हें म्हणणें ठीक दिसतें, पण त्या-प्रमाणें वागण्याला स्थळ, आयुष्य, शिक्षक, गुरु, बुद्धि हीं प्रत्येकाला हवीं तथा कशीं लाभणार ?

श्रीकृष्ण म्हणाला—मग तुझें म्हणणं काय, कीं वरील अडचणींमुळें मनुष्यानें शास्त्रज्ञानाची अपेक्षा न ठेवता आपल्याच श्रद्धेन वाटेल तसें वागावें! पण नाहीं. नुसत्या श्रद्धेनें कार्यभाग होत नाहीं. श्रद्धेचें स्वरुप स्वभावत शुद्ध आहे, परतु ती तशी शुद्ध लाभेल तेव्हा ना? शास्त्र कळत नाहीं तशी श्रद्धाहि वळत नाहीं कारण, ती त्रिगुणानून उत्पन होते. श्रद्धेला शुद्धता देईल असा त्या त्रिगुणातील सत्त्व हा एकच गुण असतो, आणि दुसरे दोन गुण नेहमीं त्याचा पाडाव करण्याकरिता झगडत असतात. रजोगुणाचा वरपगडा झाला म्हणने ती श्रद्धा कर्मकेरसुणीच होते. केरसुणीला जसें काय न लोटावें हें कळत नाहीं, त्याप्रमाणें रजोगुणानें ग्रासलेल्या बुद्धीला काय न करावें हें कळत नाहीं. म्हणून आपणाला शास्त्र न कळे तरी, ज्याना तें कळतें असे आपणाला वाटते [illegible] गतात तसें तरी आपण वागावें.

विटाळहि नको त्याला 'तू दूर हो!' इतके सांगण्यापुरता तरी संसर्ग त्याच्याशी येणारच! अशा रीतीनें मीं राजस व तामस श्रद्धांचा केवळ उल्लेख केला.

सत्त्वगुण अंगीं येण्याला अनुपानहि सात्त्विक असलें पाहिजे. त्यांत प्रथम आहार म्हणजे अन्न घेतें. रस-भरित, स्निग्ध, परिपक्व, रुचकर, ओलसर, मितप्रमाण इत्यादि आहार तो सात्त्विक होय. अशा आहारानें सुखाचें देणें-घेणें वाढतें, आनंदाशीं सख्य जमतें. कडू, खारट, कडकडीत, उन्ह, कढत कढत, तिखट, कोरडे, रुक्ष, मसालेदार, इत्यादि पदार्थ हा रजोगुणाला आवडणारा आहार होय. आणि तमोगुणी आहाराचें तर वर्णनच नको! उष्टें, कुजलेलें, कच्चें, करपलेलें, घाणेरड, पदपदलेलें, आंबुसलेलें, सडलेलें, मादक इत्यादि खाद्य म्हणजे तामस आहार होय. हें अन्न खाणें नुसतें अपायकारकच नव्हे तर पापकारकहि समजावें.

अन्न व आहार याप्रमाणें यज्ञहि त्रिगुणात्मक असतो. सात्त्विक यज्ञ तो समजावा कीं, जो करणारा कर्तेपणाचा अहंकार किंवा फलाची इच्छा धरीत नाहीं, जो यज्ञाचें साहित्य यथासांग सिद्ध करितो व त्याची योजना बिनचूक करतो. सात्त्विक मनुष्य घरीं तुळशीचें झाड लावून तें सांभाळतो, मग त्याला काय फळ आहे, कीं फूल आहे, कीं त्याच्या सावलीचा उपयोग होण्यासारखा आहे? तरी पण तो सांभाळतोच. तात्पर्य, निःस्वार्थी यज्ञ तो सात्त्विक यज्ञ. याचें उलट राजस यज्ञांत इतर गोष्टी सात्त्विक यज्ञासारख्याच निर्दोष असतात, परंतु राजस यज्ञांत फलाची आशा-इच्छा हा दोष असतो. उदा॰ एखाद्या राजाला घरां मेजवानीला बोलावलें तर खर्च करावा लागतो हे खरें, पण ती मेजवानी श्राद्धाच्या दिवशींच करावी, म्हणजे पितरांना पक्वान्न मिळतें आणि श्राद्ध सांगसफल होऊन वर याच्या घरीं 'महाराज' जेवायला येतात अशी कीर्तिहि लाभते व मोठेपणाहि लाभतो! त्याचप्रमाणें कांहीं मनकामना धरून जो यज्ञ करतो त्याच्या मनांत असें असतें कीं, दीक्षित, यज्ञ करणारा म्हणून लोकांत मला मान्यता मिळावी आणि यज्ञ-फल म्हणून स्वर्ग मिळावा. तिसरा प्रकार तामस यज्ञाचा. त्यांत विधि निषेध असा कोणाचाच पाळला जात नाहीं, नुसता उच्छृंखलपणा असतो. त्या यज्ञाला ब्राह्मण चालत नाहीं, मग विधि, मंत्र, दक्षिणा हीं कोठली? पण निपुत्रिकाचें घर जसें ओसाड पडतें, तसें तामस यज्ञांत केलेला खर्च व श्रम सर्व फुकट जातात! तो यज्ञाचा नुसता देखावा असतो.

आतां तीन प्रकारचें तप कसें तें ऐक—शारीरिक तप म्हणजे आवडत्या

देवतेसंबधान केलेली उपासना. तो तपी पूजेचे सर्व उपचार उत्तम करितो, नम्रता-बुद्धि ठेवतो, सेव्याची सेवा करतो, आईबापांना तसेंच आपल्या गुरु-लादि देवतेसमान पूजतो. तो विषयपराङ्मुख, निगर्वी व परोपकारी असतो. या तपाला मुख्य आधार देहाकडून होणारें आचरण. वाङ्मय तप म्हणजे दुसऱ्याला सुख होईल व सहजासहजीं सर्वांचें हित होईल असें भाषण करणें. वाङ्मयतपी लोकांशीं व्यवहारधर्मानें बोलत नसतो तेव्हां तोंडानें ईश्वरनामाचें किंवा वेदमंत्राचें पठण त्याचें चालू असतें. मानसिक तप त्याला म्हणावें कीं ज्या मनस्थितींत सर्व संशय फिटून मन स्वस्वरूपीं लीन होतें. प्रकाश आहे पण उष्णता नाहीं, अन्न रसमय आहे पण त्याला जडता नाहीं, किंवा अवकाश असावा पण पोकळी नसावी, त्याप्रमाणें या मानस तापसाचें मन पूर्ण विश्रांति भोगतें, संकल्पविकल्प विसरतें, चंचलपणा टाकून देतें, आणि चंद्रापेक्षांहि निष्कलंक असतें. आत्मज्ञानाची भूमिका तयार झाली म्हणजे मग वाचेचाहि उपयोग करण्याचें कारण उरत नाहीं. म्हणून मग मानसिक तपच चालतें.

राजस दान तें, की ज्यात आधीं स्वार्थाची इच्छा होते आणि मग क्रिया घडते जसं दुधाची इच्छा करून गाईला चारा घालावा, किंवा आधीं धान्याकरता पेव अथवा कोठार तयार करून मग शेतात पेरावयास निघावें, किंवा अहेरावर नजर ठेवून लग्नाची आमंत्रणें द्यावीं, किंवा व्याजाची रक्कम अगोदर काढून घेऊन मग कर्ज द्यावें, किंवा आधीं हातात द्रव्य घेऊन मग औषध द्यावें! राजस दान करणाऱ्याला आपलें काहीं वेंचलें असें वाटून कदाचित् पश्चातापहि होतो व तो मनात म्हणतो, 'अरेरे, उगीच दान केल, फुकट गेलें!' असो तामस दान तें म्हणावें की ज्यात सर्वच गोष्टी अशुद्ध व अयोग्य असतात! दान कशाचं कर? तर चोरीच्या पैशाचें! दिलें कोणाला? तर भाट, गारुडी, वेश्या, जुगारी, नर्तकी इत्यादि नीच लोकाना! पण अगदा चुकूनच असेंहि होतं कीं, आयत्या वेळीं एखादा सत्पात्र ब्राह्मणच दान घेण्याला पुढें यावा किंवा दान करण्याचं स्थळ हीं क्षेत्र–भूमि वा पुण्य–भूमि आहे असें उमगावं घुणा आप णाकडून लाकूड कोरतो पण त्यातच चुकून अक्षर उमटतं, किंवा टाळी वाज विली तर त्यात चुकून कावळा सापडतो, तशाच रीतीन तमोगुणी माणसाच्या नशाला एखाद्या पुण्यकारक स्थलाचा व कालाचा योग लाभावयाचा! पण तो काहीं लक्षात घ्यावयाचा नाहीं कारण, चुकून सत्पात्र ब्राह्मणाच्या हातावर त्यानें दान दिलें तरी तें थोडेंच असावयाचें अशा काहीं हीं तीन प्रकारचीं दान आहेत

रजोगुण व तमोगुण याचा पडदा दूर केल्याशिवाय शुद्ध सत्त्वगुण प्रभावी होत नाहीं ज्याच्या योगानें सात्त्विक कर्माच्या आटोक्यात मोक्षरत्न येतें तें साधन म्हणजे 'ॐ तत्सत्' या तीन शब्दाचा मंत्र ती एक नामरूपक ब्रह्माची खूण आहे त्याचा उच्चार केला असता तो ओळखून ब्रह्म ओ देतं या नाम मंत्रानेंच ब्रह्मदेवामध्ये सृष्टि उत्पन्न करण्याची शक्ति येते सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वी सर्व गोंधळ होता पण ब्रह्मदेवानें या नाममंत्राचा उच्चार केल्यामुळ त्याला सृष्टिकर्म करता आलें, व त्या सृष्टीतील लोकाना ब्रह्मदेवानें त्रिलोकाचें इनाम दिलें! ॐ हा सर्व मंत्राचा राजा आहे पण हा नाममंत्रहि योग्य वेळेला सुचला व म्हटला पाहिजे शिवाय त्याच्याहि विनियोगाचा एक प्रकार आहे तो साधला पाहिजे कर्माच्या प्रारंभीं ॐ काराचा उच्चार करावयाचा असतो तो केल्यानें पुढील कार्य निर्विघ्न होतें त्या नाममंत्राच्या उच्चारानं हं घडतं कीं, यज्ञ, दान, तप हीं कर्में बंधकारक असलीं तरी ॐकार प्रणवाच्या उच्चारानें त्याना मोक्ष

मार्ग सापडतो नाव नौका ही जमिनीवर ओढून नेण्यास जड, पण तीच पाण्यात असली म्हणजे स्वतः चालू लागते व आत बसणाऱ्यांना वाहून नेते. 'तत्' या शब्दानें जें ब्रह्म जाणलं जातें त्याला तें कर्म फळासह अर्पण करणें हा नाम मंत्राचा गुण आहे, व त्याची सांगता शेवटीं आणखी 'न मम' या शब्दांना होते. हा शब्द असा आहे कीं, त्याच्यामुळे जें ब्रह्मपरत्वानं असतें तें आत्मत्वानें अनुभवास येण्याचें टळतें. सत् शब्दानें असत् पदार्थमात्राचा निरास होतो. कर्म व ब्रह्म यांचें ऐक्य झाल्यावर त्यात आपणासह अद्वैताचा अनुभव घ्यावा सत् या शब्दाचा दुसरा एक उपयोग असा आहे कीं, एकादी गोष्ट म्हणजे गुण किंवा क्रिया कमी पडल्यामुळें सत्कर्माला असत्कर्माचें स्वरूप येण्याची भीति असते ती सत् या शब्दानें टळते रोगाला औषध मिळावें त्याप्रमाणें सत् हा शब्द अपायहारक ठरतो अपायाचा संबंध असा कीं चूक ही सर्वांच्या पाठीस लागलेलीच आहे रोज ठरल्या वाटेनें चालणारा मनुष्यहि एकादे वेळीं चुकून भलत्या वाटेला लागतोच कीं नाहीं ? मोठा रत्नपारखी खरा, परंतु एकादे वेळीं खोटें रत्नच उचलून पदरात घेतो ! अर्थात् क्वचित् संभवनीय अशी पण जी चूकच ती सत् शब्दाच्या उपयोगानं टळते. म्हणून 'सत्' हा शब्द 'ॐ' व 'तत्' यांपेक्षाहि अधिक प्रबुद्ध व प्रौढ समजावा. हा निर्द्वंद्वात्मक नाममंत्र ब्रह्म व्यक्त करण्याला उपयोगी आहे तें नाव व ती वस्तु एकच होत आणि ती वस्तु म्हणजे ब्रह्म म्हणून ब्रह्मार्पण हाच विनियोगाचा बिनचूक प्रकार होय त्या विनियोगानेंच कर्माचा प्रयोग आचरावा या नामाचा उपयोग न करता, सात्त्विक श्रद्धेचा आधार न घेता, केवळ दुराग्रहानें एकाद सत्कर्म केलें तर तें खडकावर पडलेल्या पाण्याप्रमाणें निष्फळ ठरत.

---

## ( १७ व्या अध्यायांतील निवडक वचनें )

१ त्रिगुणत्रिपुरीं वेढिला । जीवत्वदुर्गीं आडिला
तो आत्मशंभु सोडविला । तुझिया स्मृती
२ जो ध्यानें सूये मानसीं । तयाआंगीं नाहीं तू त्याचे देशीं
ध्यानहि विसरे तेणेंसी । वाल्म तुज
तूतें सिद्धचि जो मेणे । तो नादे सर्वज्ञपणें

३ तैसी शास्त्रांची मोकळी । या कै कोण वेंटाळी
एकवाक्यतेच्या फळी । पैसिजे कै
जाळयाही एकवाक्यता । का लाभे वेळ अनुष्ठिता
कैचा पैसार जीविता । येतुलालिया

४ तयाऐसें आम्ही होआवें । ऐसी चाड बांधोनि जीवें
घेती तयाचे मागोवे । आचरावया

५ तव वैकुंठपीठींचें लिंग । जो निगमपद्माचा पराग
जिये जयाचेनि हें जग । अगच्छाया

६ नुसधियाचि श्रद्धा । झोंबों पाहसी परमपदा
तरी तैसें हें प्रबुद्धा । सोहोपें नोहे

७ चंदन होय शीतळु । परी अग्नीसी पावे मेळू
तें हातीं धरिता जाळू । न शके काई

८ तें प्राणिये तव स्वभावें । अनादिमायाप्रभवें
त्रिगुणाचेचि आघवे । वळिले आहाती
तेथही दोन गुण खाचती । मग एक धरी उन्नति
तें तैसियाचि होती वृत्ति । जीवाचिया
वृत्तिऐसें मन घरिती । मनाऐसी क्रिया करिती

९ म्हणूनि प्राणियाच्यापैकीं । पडिली श्रद्धा अवलोकीं
ते होय गुणासारिखी । तिहीं यया

१० एव सत्त्वरजतमा- । वेगळी श्रद्धा सुवर्मा
नाहीं गा जीवग्रामा- । माजी यया

११ ऐसेनि हा सकळ । जगडंबर निखिळ
श्रद्धेचाचि केवळ । वोतला असे

१२ जे हे सात्त्विक श्रद्धा । जतन करावी प्रबुद्धा
येरी दोनी विरुद्धा । सांडाविया
हे सात्त्विकमति जया । निर्वाहती होय धनंजया

१२ तो न पढो कां ब्रह्मसूत्र । न होदो सर्व शास्त्र
सिद्धांत न होतु स्वतंत्र । तयाच्या हातीं

१४ तयांचीं आचरतीं पाउलें । पाळूनि सात्त्विकी श्रद्धा चाले
तो तेंचि फळ ठेविलें । ऐसे लाहे

१५ म्हणौनि आपुलिया परी । शास्त्र अनुष्ठिती कुसरीं
जाणे तयातें श्रद्धाळू जो वरी । तो मूर्खही तरे

१६ आपणां परावां देहीं । दुःख देती जें जें कांहीं
मज आत्मया तेतुलाही । होय शीण

१७ म्हणौनि श्रद्धा जे सात्त्विकी । पुढतीं तेचि पैं येकी
जतन करावी निकी । सर्वोपरी

१८ म्हणौनि सात्त्विक रस सेविजे । तैं सत्त्वाची वाढी पाविजे

१९ आंगें सानें परिणामें थोर । जैसें गुरुमुखींचें अक्षर
तैसा अल्पीं जिहीं अपार । तृप्ति राहे

२० येणें सात्त्विक रसें । जंव देही मेहो वरिषे
तंव आयुष्यनदी उससे । दिहाचि दिहा

२१ वाफेचिया सिगे । वावीही लाविल्या लागे
तैसें उन्ह मागे । राजस तो

२२ आवींचि द्रव्यें चुरमुरीं । वरी प्रवहिजती मोहरी
जियें घेतां होती धुवारी । नाकेंतोडें

२३ तेंही वाळाचे हातवरी । चिवडिलें जैसी रार्डी करी
कां सवें बैसोनि नारी । गोतांबीळ करी

२४ तैसें मने देहीं । यजननिश्चयाच्या ठायीं
हारपोनि जे काहीं । वाछितीना

२५ प्रतिपाळ तरी पाटाचा । झाडीं कीजे तुळसीचा
परी फळा फुला छायेचा । आश्रयो नाहीं

२६ जरि राजा घरासि ये । बहुत उपयोगा जाये
आणि कीर्तिही होये । जगामाजा
तैसा घरूनि आवाका । म्हणे स्वर्ग जोडेल असिका
दीक्षित होईन मान्य लोका । घडेल त्याग

२७ तैसें वायाचि सर्वस्व वेंचे । मुख न देखता श्रद्धचें
नागविलें निपुत्रिकाचें । जैसें घर

२८ तया प्रिय देवताल्या । यात्रादिकें करावया
आठहीं पाहार जैसे पाया । उळिग घापे

२९ लिंग का प्रतिमा का दिठीं । देखतखेंवो अगेष्टी
लोटिजे का काठी । पडली जैसी

३० पार्था समस्तही हें करणें । देहाचेनि प्रधानपणें
म्हणौनि ययातें मी म्हणे । शरीर तप

३१ पाणी मुदल झाडा जाये । तृण ते प्रसंगेचि जिये
तैसें एका बोलिलें होये । सर्वांहि हित

३२ ऋग्वेदादि तीन्ही । प्रतिष्ठीजती वाग्मवनीं
केली जैसी वदनीं । ब्रह्मशाळा

३३ तैसी नाना विकल्पजाळें । साडूनि गेलिया सकळें
मन राहे कां केवळें । स्वरूपें जें
तपनेंवीण प्रकाश । जाड्येवाण रस
पोंकळीवीण अवकाश । होय जैसा

३४ बुजाली वैराग्याची वोरप । जिराली मनाची धाप काप
तेथ केवळ जाली वाफ । निजबोधाची

३५ ते स्वलाभ लाभलें लाभलेपणें । मन मनपणाही धरू नेणें
शिवतलें जैसें लवणें । आपुलें निज

३६ जे पुरतिया सत्त्वशुद्धी । आचारिजे आस्तिक्यबुद्धी
तें तयातेंचि गा प्रबुद्धी । सात्त्विक म्हणिपे

३७ विश्वाचिया स्तोत्रा । आपण होआवया पात्रा
विश्वें आपलिया यात्रा । करावया यावें

३८ पहुरणीं जें दुहिलें । तें तें गुरू न दुभेचि व्यालें
का उभें शेत चारिलें । पिकावया नुरे
तैसें फोकारिता तप । कीजे जें साक्षेप
तें फळीं तव सोप । नि शेष जाय

३९ ऐसी नानापरी हे काया । घाय सूता पैं धनंजया
तप कीजे नाशावया । पुढिलातें

४० किंबहुना हे वोखटी । घेऊनि क्लेशाची हातवटी
तप निपजे तें किरीटी । तामस होय

४१ जाल्या सुबीजप्रसंग । पडे क्षेत्रवाफेचा पाग
तैसाचि दानाचा हा लाग । देखतसें

४२ अनर्घ्य रत्न हाता चढे । तैं भागराची वोढी पडे
दोन्ही जाली तरी न जोडे । लेतें आंग
परि सण सुहृद सर्पांच । हे तीन्ही येकीं मिळती
जै भाग्य धरी उन्नती । आपुल्याविषयीं

४३ का जयाचें ठेविलें तया । देऊनि होय उतराइया
नाना हडपे विडा राया । दिधला जैसा

४४ आणि दान जया द्यावें । तयातें ऐसेया पाहावें
जया घेतलें नुमचवे । कायसेनही
साद घातलिया आकाशा । नेदी प्रतिशब्द जैसा
का पाहिला आरसा । येरीकडे

४५ नाना दिढीं घालूनि आहेग । आवतू जाइजे सोयिरा
का वाण घाढिजे घरा । वोवसीयाचे
पैं कळातर गाठीं बाधिजे । मग पुढिलाचें काज कीजे
पूजा घेऊनि रस दीजे । पीडितासि

४६ विषायें घुणाक्षर पडे । टाळिये काउळा सापडे
तैसें तामसा पर्व जोडे । पुण्यदेशीं

४७ तैसें शुद्धसत्त्वाआड । आहे रजतमाचें कवाड
तें भेदणें यातें कीड । म्हणावें का

४८ तैसें सात्त्विककर्मा किरीटी । येता मोक्षाचिये भेटी
न पडे आडकाठी । तें वेगळें आहे

४९ तरि अनादि परब्रह्म । जें जगदादि विश्रामधाम
तयाचें एक नाम । त्रिधा पैं असे
तें कीर अनाम अजाति । परि अविद्यावर्गाचिये राती-
मार्जी ओळखावया श्रुती । खूण केली
उपजलिया बाळकासी । नाव नाहीं तयापासीं
खेविलेंनि नावेंसीं । ओ देत उठी
कष्टले ससारशिणें । जे देवों येती गान्हाणें
तया ओ दे नावें देणें । तो सकेत हा

५० एव ॐ तत्सदाकार । ब्रह्मनाम हें त्रिप्रकार
हें फूल तुरयी सुदर । उपनिषद् तें

११

५१ तैसें तोंडीं ब्रह्मनाम । हातीं तें सात्त्विक कर्म
विनियोगेंवीण काम । विफळ होय

५२ तैसें वेळे कृत्य पावे । तेथिंचा मंत्रही आठवे
परि व्यर्थ तें आघवें । विनियोगेंवीण

५३ आंधारीं अमंग दिवा । व्याडवीं समर्थ बोळावा
तैसा मणवे जाणावा । कर्मारंभीं

५४ ऐसेनि तदात्मकें ब्रह्में । तेथ उगाणूनि कर्में
आंग झाडिती नमनें । येणें बोलें

५५ म्हणौनि परत्वें ब्रह्म असे । तें आत्मत्वें परियवसे
सच्छब्द या रिणादोषें । ठेविला देवें

५६ तेव्हां ॐकार तत्कारीं । सावायिला हा चांगी परी
सच्छब्द कर्मा करी । जीर्णोद्धार

५७ तें असत्पण फेडी । आणि सद्भावाचिये रूढी
निजसत्त्वांचिये प्रौढी । सच्छब्द हा

५८ चाळतयाचि मार्गे सांडे । पारखियाचि अक्षरें पडे
राहाटीमाजीं न घडे । काइ काइ

५९ तेथ गा हा सच्छब्दु । येरां दोहींपरीस प्रबुद्ध
प्रयोजिला करी साधु । कर्मातें यया

६० म्हणौनि व्यक्षर हें नाम । नव्हे जाण केवळ ब्रह्म
याहीलागीं कर्म । जें जें कीजे

६१ तियें निफजतु कां न्यूनें । होऊनि ठातु

६२ ना तरि जैसें चडकणां । गगन हाणितलें अर्जुना
तैसा समारंभ सुणा । पेलाचि तो

## अध्याय अठरावा

हा अध्याय सर्वश्रेष्ठ, एखाद्या देवळाच्या कळसासारखा, आहे कळसाचें दर्शन झालें कीं आतील देवाचें दर्शन झाल्याचेंच श्रेय मिळतें. व्यासांनीं उपनिषदाची भूमि खणली तेव्हा त्यातून धर्म अर्थ व काम या तीन गुणांचा मालमसाला निघाला त्याचा उपयोग करून व्यासांना महाभारतरूपी कोट व प्राकार गीतामंदिराभोंवतीं केला. आणि त्या खाणींत आत्मज्ञानरूपी जो अखंड दगड निघाला त्याचा श्रीकृष्णसंवादरूप माठीव चिरा मोठ्या चातुर्याने तयार केला सोळा अध्याय मिळून, शिखराच्या डेऱ्यासह, गीतामंदिर उभारलें गेलें, सतराव्या अध्यायानें त्यावरील कळसाची बैठक रचली आणि तीवर हा अठरावा अध्याय कळस करून स्थापला कोणी या गीतामंदिराला आवर्तनरूपी प्रदक्षिणा बाहेरच्या बाहेर करून निघून जातात, कोणी या मंदिराच्या सावली खाच उभें राहून समाधान मानितात, तर कोणी पैसानुसारी घेऊन गामान्यात शिरतात पण मौज ही कीं, खऱ्या श्रीमंताच्या घरीं खालीं नोकरापासून वर यजमानापर्यंत सर्वांना एकच अन्न वाढलें जात, त्या प्रकारें या गीतामंदिराचा कोणत्याहि प्रकारानें उपयोग करणाऱ्यांना मोक्ष हा एकच प्रसाद मिळतो

गीता हें एक वैष्णव-मंदिर आहे अध्याय श्लोक इत्यादि रूपानें गीतेंत खंड पडले, तरी तिच्या अभिप्रायात एकत्वच आहे चंद्राला पौर्णिमेपर्यंत रोज एकेक कला अधिक मिळत जाते पण तो चंद्र एकच असतो अनेक रत्न असला तरी हार एकच अनेक मोत्यें असलीं तरी सर एकच आणि हारातहि पदर अनेक व प्रत्येक पदरात फुलें अनेक असलीं तरी सुवास एकच तसाच गीतेचें आहे.

वरील सर्व विवेचन ऐकून अर्जुनाला वाटलें कीं, एकूण सत्कर्म सुचणें व तें योग्य प्रकारें आचरिलें जाऊन सफळ होणें ही तर मोठीच भानगड दिसते, तेव्हा त्यापेक्षा कर्माचा त्याग म्हणजे सन्यास हाच अधिक बरा नव्हे काय ? शिवाय ब्रह्मनामावर श्रद्धा ठेवून कर्म करणें हे कठिण दिसत. कर्मठ वर्ग हा प्राय दीन, अज्ञानी त्याच्या हातून सात्त्विक श्रद्धेचा स्वीकार होणें व टिकणें कठिण एवढच कर्ममार्गांत कुयोग पुष्कळ असें दर्शविण्यात कर्ममार्गाला कमीपणा देण्याचाच श्रीकृष्णाचा अभिप्राय बहुधा असावा, असा विचार मनात आणून " असल्या अवघड कर्मापेक्षा सन्यास व त्याग हेच अधिक बरे नव्हेत काय ?"

असा प्रश्न अर्जुनानें केला व त्यावर श्रीकृष्णाचा अभिप्राय विचारला. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाला—मुळीं कर्मच करावयाचें नाहीं अशा प्रकारच्या त्यागाला सन्यास म्हणाव उलट, कर्म तर करावें पण फल टाकाव अशा प्रकारच्या त्यागालाच खरा त्याग म्हणाव काहीं वनसति वा वृक्ष रानात आपोआप उगवतात, पण ते वाईट असतात उलट चागल्या पिकाकरिता धान्य पेरावें लागतें व मेहनत मशागत करावी लागते. तसेंच नदी आपल्या ओघानें स्वाभाविकपणें वाहते हें खरें, तथापि तींत पाणीचा दोष मिळळण्याचा समव असतो याच्या उलट निर्मळ पाणी हवें असेल तर विहीर खणावी लागते. मात त्याला श्रम पडतात त्याप्रमाणे वेद–शास्त्रादिकानीं सागितलेलीं नित्यनैमित्तिक कर्में काम्य म्हणुन सहज प्रवृत्तीन घडू शकतात पण तीं निर्दोष होत नाहींत व फलेच्छा हा दाप तर त्यात असाचाच असतो याच्या उलट निष्काम कर्म हू अवघड असलें तरी तें श्रेयस्कर होय अशा कर्मातील जो फलत्याग तोच खरा त्याग व त्यालाच सन्यास असें चागले लोक म्हणतात

निष्काम कर्म हू मोक्ष–मार्ग सरळ दाखवित व त्यातील सर्व अडचणी दूर करत, पण काम्य कर्माचे तसें नाहीं त तशा बुद्धीन आधीं केल्यावर मग जरी एकादे वेळीं वाटलें कीं 'नको, जाऊ दे, आपल्याला तें फळ नको,' तरी तें फळच कर्म करणाऱ्याला सोडीत नाहीं. एकाद्या कर्जदाराप्रमाणें तें दारात धरणें घेऊन बसतें आणि म्हणतें, ' माझी फेड कर, माझा भोग घे, त्यावाचून मी तुला सोडणार नाहीं ' नित्य व नैमित्तिक या कर्मात फारसा भेद नाहीं. कारण नित्य कर्माला काहीं नियम लावले म्हणजे तेंच नैमित्तिक होतें. परतु काम्य हें जें स्वरूप तें दोघाना सारखेंच राहतें. त्यामुळें तीं दोनहि फळरूप होणारच. त्याच्या पल्यापासून मुक्त नाहीं. इष्ट वाटणारें आपलेंच मूल खरें परतु तें मूळ नक्षत्रावर जन्मलें तर त्याचा त्याग करावा. वसत हा झाडाना पुढें फळें व पालवी आणतो, परतु तो काहीं त्याचा स्वीकार स्वत करिता करीत नाहीं. अशा वृत्तीनें त्याग व सन्यास आचरिले तर ते आत्मज्ञानाच्या ठिकाणीं पाट बाधतात, पट्टाभिषेक करितात. मिळून त्याग करण्याला जें योग्य नाहीं त्याचा त्याग करू नये व जे त्याग करण्यालाच योग्य त्याचा लोभ धरू नये. त्यागाचें वर्म चुकलें तर त्याग हा एक ओझेंच होतो, म्हणून त्या योगानेंच कर्म–बंध प्राप्त होतो.

जे लोक कर्माला वाईट म्हणतात त्याना खरोखर फलत्यागच करणें जड जातें. ता त्याच्या हातून होत नाहीं म्हणूनच ते तसें म्हणतात. उदा०

पण हें श्रेष्ठ प्रतीचें फळ कर्मफळरूपी कनिष्ठ फळाचा त्याग केल्याशिवाय मिळत नाहीं. सात्त्विक त्यागानें कर्मेच ब्रह्मरूप होतें, जसे ढग हे आकाशांत जागचे जागींच जिरतात. कर्माचा त्याग करून देहाचें भागतहि नाहीं. माती हाताला घाण लागते, अग्नीची धग लागते, दिव्याला हात लावला तर भाजतो, म्हणून त्या वस्तु कांहीं टाकून चावयाच्या नाहींत, तर युक्तीनें त्याचा उपयोगच करून घ्यावयाचा. कपाळ वाकडें असले तरी त्यावर सरळ गंध लावता येईलच कीं! कर्मत्याग हा मूर्छेसारखा किंवा मृत्यूसारखा म्हणावा. त्याला विसावा किंवा विश्रांति म्हणता येत नाहीं.

कर्म फळ हें इष्ट, अनिष्ट व मिश्र म्हणजे इष्टानिष्ट असतें. जें नुसतेंच पापात्मक कर्म त्याचें फळ अनिष्ट. पापात कांहीं पुण्य मिसळलें असलें तरी त्याचें फळ मिश्र जें शुद्ध पुण्य कर्म त्याचेंच फळ इष्ट. अनिष्ट फळ व मिश्रफळ देणाऱ्या कर्मांतून इतर कर्में निपजतात आणि कर्मांतून कर्म अशी परंपरा सुरू होते. मग त्यांतून सुटका कशाची होणार ? फुलासारखें, म्हणजे सुकण्याकरिता फूल व्हावें जाईचें फूल आपल्या सुवासाचा त्याग करण्याकरिताच झाकल्या कळी तून उमलतें ना ? शेतकरी हा बियाणेंच खाईल तर शेती काय करील ? त्याला शेतकी करावयाची असेल तर, खाण्यायोग्य असें बियाणें हें धान्य डोळ्या पुढें दिसत असताहि त्याने त्याज्यच मानिलें पाहिजे. त्या लोकांना हा ज्ञानप्रधान सन्यास साधला त्यांच्याच मागच्या कर्म–फल–भोग व जन्म–मरण याचा नाश वाचतो. आत्मा आणि कर्म यामध्यें वेगळेपणा असतो. दगड पाण्यात असला तरी वेगळाच, व पाण्यावर असला तरी वेगळाच. दिव्याला चिकटलेली असली तरी काजळी वेगळी व दिवा वेगळा चंद्रावर असला तरी कलंक वेगळा. डोळ्या वर असली तरी दृष्टि वेगळी, वाटेवर चालला तरी प्रवासी वाटेहून वेगळा. आणि पात्रात वाहत असला तरी पाणी वेगळें त्याप्रमाणे आत्म्याच्या ठिकाणीं भासणारें कर्म आत्म्याहून वेगळें असतें.

आत्म्याकडून घडतातसा दिसणाऱ्या क्रिया खरोखर आत्म्याहून वेगळ्या अशा पाच कारणांनीं घडतात. तीं कारणें म्हणजे शरीर, जीव, इंद्रियें, इंद्रिय व्यापार, आणि पाचवें दैव हीं होत. या कारणाहून आत्मा हा वेगळा असून, तो त्या पाच कारणापासून होणाऱ्या कर्माचें निमित्तकारण किंवा उपादान कारण होत नाहीं. या कर्माचें वजन मोत्याच्या वजनासारखें बरोबर करता येतें. देह हें कर्माचें अधिष्ठान–कारण त्या आधारावर जीव जगतो दे

चोवीस माणसांच्या कुटुंबाचें राहण्याचें एक घर होय. दुसरें कारण 'कर्ता,' त्याला चैतन्याचें प्रतिबिंब असें म्हणतात स्वस्वरूपाची आठवण विसरून चैतन्य हें स्वतःला देह म्हणूं लागतें, आणि प्रकृति जी कर्में करते तीं मी करतो असा भ्रम पडून तें तसें म्हणूं लागते. बुद्धीचें ज्ञान हें तिसरें कारण. ती इंद्रियांच्या द्वारा आकार घेऊन बाहेर पडते. जशी दृष्टि ही पापण्यांच्या कारणानें फाकलेली-चिरलेली वाटते, किंवा चवरी ही केसांमुळें चिरलेली वाटते, तशी बुद्धि व तिच्यापासून होणारें ज्ञान हीं वेगवेगळीं वाटतात. एकच पुरुष, पण तो नट या नात्यानें नवरसांचे आविर्भाव प्रकट करितो तेव्हां तेव्हां मुळांतच हे अनेक वेगवेगळे पुरुष असावे असा भ्रम पडतोच कीं नाहीं? एकाच प्राणशक्तीला स्थान-भेदामुळें प्राण, अपान, उदान, व्यान व समान अशीं नावें मिळतात वायु तोच पण कार्यें वेगळीं. बुद्धीला इंद्रियांच्या योगानें निरनिराळ्या प्रकारची शोभा येते व परिणाम घडतो. शरदृतूंतील चंद्र असून त्याला पौर्णिमेचा योग असावा, वसंत ऋतूंत बागेमध्यें प्रिय मनुष्याचा योग घडावा, कमळाला विकास व्हावा आणि त्या विकासांत सुगंधी पराग उठावदार व्हावे, किंवा वाचेला कवित्वाची जोड, त्या कवित्वाला सुरसतेची जोड आणि त्या सुरसतेला परमात्म वर्णनाची जोड मिळावी-तसें हें घडतें. सर्व वृत्तींत बुद्धि चांगली आणि बुद्धीला इंद्रियांच्या बळानें शोभा येते पण ही शोभा येण्याला प्रत्येक इंद्रियाची जी एकेक अधिष्ठात्री देवता असते तीच कारण होते. सर्व इंद्रियांच्या देवतांचा मिळून एक वृंद किंवा गट होतो त्यालाच दैव म्हणतात व हें दैव पांचवें कारण होय दैव म्हणजे इंद्रियप्रवर्तक देवतांची कृपा किंवा अनुकूलता होय

या कारणांची खाण आणखी वाढते ती पांच हेतूंनीं. हे हेतु कायिक, वाचिक, मानसिक या सर्व प्रकारच्या कर्मांना लागतात, मग तें कर्म विहित असो या विपरीत म्हणजे निषिद्ध असो कर्मांचा संकल्प होण्याला मन हा हेतु असतो. मग त्या संकल्पानें वाचेचा दिवा लागतो, तो सर्व कर्मांचा मार्ग दाखवितो आणि मग जीव तें तें कर्म करितो शरीरादि इंद्रियें हीं त्याचीं त्यानांच कारणें होऊन कार्यें करतात. लोखंडी वस्तु घडविणारा हातोडा लोखंडाचाच असतो रत्नानें घासूनच रत्नाला आकार आणतां येतो पहिलें ऊसाचें कांडेंच दुसऱ्याला वाढवितें त्याप्रमाणें शरीर वाचा व मन हीं कर्मांचीं कारणें असून हेतुहि होतात. आणि पूर्वीं अधिष्ठान (देह), कर्ता (जीव), करण (इंद्रियें), चेष्टा (इंद्रियव्यापार), व दैव (इंद्रियाधिष्ठित देवतांची कृपा)

...ता शरीर वाणी व मन या हेतूंची जोड मिळाल्यानें कर्मनिष्पत्ति होते. मान वस्तु व कारण याचाच केवळ मेळ पडून जें कर्म होतें तें अधळें असतें, त्याला ज्ञानाची दृष्टि मिळाली तरच त डोळस म्हणजे विहित होतें. मन हा तोंडानें म्हणावयाचा असतो, परंतु मनाची कडसणी ( मर्म किंवा हृदय ) कळली नाहीं तोंपर्यंत मनाचें फळ मिळत नाहीं. अशा रीतीनें आत्मा हा स्वतः कारण किंवा क्रिया न होता कर्माचें प्रवर्तन किंवा प्रकाशन करतो. यात आत्म्यानें देहरूपानें मीच आहें व कर्ता आहें अशी समजूत करून घेण्याचा जो संभव असतो तो मान टाळला पाहिजे.

अज्ञानी मनुष्याकडून आत्म्याला देहाच्या ठिकाणीं पाहण्याची चूक होते. आणि ढग पळत असता चंद्र पळतो अशी जी समजूत कोल्हा करून घेतो, तशा खोट्या समजुतीनें देह करितो ते आत्माच करितो असें जीव मानितो. ही समजूत जोंपर्यंत राहते तोंपर्यंत पिंजऱ्यातील नळी पकडून बसलेल्या राघू प्रमाणें जीवाला बंधनच. अशा गैरसमजुतीच्या मोहांत पडलेल्या जीवाला संत किंवा गुरु देव हाक मारून जागे करू शकतात. आणि असा जागा होऊन जो जीव आत्मस्थितीचा राजा होतो तो मग स्वतःला देह मानीनासा होतो. जो ज्ञात्यासह ( जाणणाऱ्यासह ) ज्ञेय ( जाणण्याची वस्तु ) गिळून बसला त्याच्या ठिकाणीं अहंता उरत नाहीं. देहाभिमान गेल्यावरहि प्रारब्धानें मिळालेला देह कर्म करीतच राहतो, पण त्यानें काहीं बिघडत नाहीं. वारा थांबला तरी त्यानें पूर्वी हलविलेलें झाड काही वेळ हलत राहून मगच स्तब्ध होतें. पेटींतला कापूर निघून गेला तरी काहीं वेळ सुवास राहतोच. सूर्य मावळला तरी मागें घटकाभर संध्याप्रकाश उरतोच. बाणांत जोर असेतो त्याप्रमाणें तो निशाणाची रुण मेहादि पुढ जात राहतोच. पण आत्मस्वरूपाच्या बोधानें जो जागा झाला तो इंद्रियांचे व्यापार जाणतच नाहीं. वेड्या मनुष्याला आपण वस्त्र नेसलेले आहों कीं नग्न आहों हें कळत नाहीं. योद्ध्याच्या जखमा इतर लोक मोजतात किंवा तपासतात. सती जाणाऱ्या स्त्रीला अंगावरील अलंकार व अग्नि या दोहोंचें ध्यानांत मान असतें, म्हणजे सुटाच नसतें. चित्रांत पाणी व आगीचा उल्लेख दिसेल, पण त्या चित्रकारानें तें चित्र काढलेलें असतें तो ओला नसतो किंवा जळत नाहीं. कर्म कर्ता व क्रिया हीं त्याला आत्मस्वरूपच झाली त्याला त्यांच्यामुळें बंध बाधत नाहीं. प्रवृत्तीची बिगार वाहणारे लोक इतर असतात. तो आनंदांत असल्यानें त्यास त्रास पडत नाहीं.

अज्ञानरूपी वस्त्रावर चित्र उमटतें त्याग ज्ञाता ज्ञान व ज्ञेय ही त्रिपुटी कारण असते. त्रिपुटीत ज्ञानानेंच हे तीन विभाग होतात. ज्ञेयरूप पदार्थाचे भेद भासतात ते शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या गुणामुळें आणि पांच निरनिराळ्या इंद्रियामुळें. ज्ञेयाला पाहून ज्ञाता (जीव) तिकडे धाव घेतो अशा रीतीनें कर्म-प्रवृत्ति होते आणि सुखदुःखादि भोग घडतात किंवा स्वीकार वा त्याग घडतात. विषयाच्या लोभानें जीव इंद्रियाना चाळवितो व कर्ता बनतो. ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय ही त्रिपुटी जाऊन तिच्या ठिकाणीं कर्ता कारण व कर्म ही त्रिपुटी येते. सुम्यानें बाग तयार करावी, सराफानें स्वतःच कसोटीचा दगड व्हावें किंवा देवानेंच जसें आपलें देऊळ बांधावें तसेंच हें घडतें. एक त्रिपुटी ही कर्मप्रेरणा करते व दुसरी त्रिपुटी कर्मांचा संचय करते. या त्रिपुटींचा गुणभेद सांख्य शास्त्रानें करून दाखविला आहे तो असा —

ज्ञान हें सात्त्विक राजस व तामस असतं सात्त्विक ज्ञानाला भूतमात्र अभिन्न दिसतें, त्यात वेगळेपणा दिसत नाहीं दागिना हातीं घेऊन सोनें नाहींसे झालें असा शोक कोण सुज्ञ मनुष्य करील! सात्त्विक ज्ञानाला ज्ञेयाच्या ठिकाणा ज्ञाताच दिसतो. तें ज्ञान राजस म्हणावें की जें द्वैताचा आश्रय धरून चालतें, म्हणजे द्वैत खरें मानतें. त्यामुळे ऐक्यबोधाची कल्पना नष्ट होते. राजस ज्ञान हें द्वैताच्या आश्रयानें अनेकत्व पावतें. तसेंच तामस ज्ञान तें म्हणावें की ज कोणतीहि निंद्य वस्तु एकच घेऊन तिलाच सर्वत्व मानत. तें नुसतें द्वैत मानीत नाहीं व अद्वैत तर नाहींच नाहीं. तें एकाच ठिकाणीं पूर्णत्वानें जडून राहतें. मासी, कावळा इत्यादि प्राणी घाण पदार्थ घेऊन, त्याहून इतर काहीं चांगलें नाहीं अशा भावनेनें त्या वेळेपुरता तोच खात बसतात. डोळ्यासमोर दिसेल तोच त्याना भोगविषय होतो. जें तहान भागवील तें पाणी व भूक भागवील तें अन्न, मग काहींहि असो सर्व कर्म जीवनाकरिताच आहे असें तामस ज्ञान मानतें. तामस ज्ञानी हा देवहि विकून खाईल. कारण तो म्हणतो, "दैवत जागृत असेल तर स्वतः त्याचीच चोरी का होईल?" धुराप्रमाणें तो वारा नेईल तिकडे भटकत जातो. जें ज्ञान स्वैर व निरर्थक असतें तेंच त्याला खरें वाटतें. मुलाचें मन, चोराचें धन व डोळीचे स्तन हीं निरुपयोगी असतात. त्याना उप-योगी म्हणण्याप्रमाणेंच तामस ज्ञानालाहि ज्ञान हें नाव तरी उगीचच द्यावयाचें! बहिऱ्या कानाना कान म्हणणें, अधळ्या डोळ्याना डोळे म्हणणें यासारखेंच हें आहे

कर्महि तीन प्रकारचें असतें. त्या कर्माला सात्त्विक म्हणावें की जें स्वधर्मानुकूल, विहित, स्वाभाविक आणि सतोषानें केलेलें असतें. अशा कर्मानें अधिकाराला भूषण येतें. कर्तव्य हें नित्य असून शिवाय नैमित्तिक ठरेल तर त्याला विशेषच शोभा येते. तें कर्म राजस म्हणावें की जें फळाची इच्छा मनात धरून अहकारबुद्धीनें किंवा प्रयासानें कष्टाळून केलें जातें. असा मनुष्य काम्य कर्में करतो, पण नित्य–नैमित्तिक कर्माविषयीं आळसतो. हातीं परीस लागला असें वाटलें तर तो लोखडच विकत घेत सुटतो! कर्माची चढाई सागून तो तिचें श्रेय घालवितो. आवडत कर्म करण्याचे श्रम मात्र तो मानीत नाहीं. धान्यकणाकरिता उदीर डोंगर पोखरीन म्हणेल, मूठभर धान्याकरिता कोल्हाहि किती तरी उड्या मारील, टीचभर पोटाची भूक मागविण्याकरिता गारुडी काखेंत साप बाळगील, तसाच हा तामसकर्मी समजावा. तो नाश करील, पीडा करील, अविचारानें कामाला हात घालील, आपलें बलाबल पाहणार नाहीं. अर्थातच त्याचें कर्म निष्फळ होणार. घाण्यात वाळू घातली तर तेल निघेल काय? ताकावरची निवळी घुसळून किंवा राखुडी फुकफुकून काय फळ? फळ इतकेंच कीं स्वत ला क्लेश व नाश. पतग जाऊन दिव्यावर पडला तर काय होणार हें दिसतेंच! माशी पोटात जाईल तर ती स्वतः मरेल आणि अन्न खाणाऱ्याला ओकवील, दुसरें काय?

कर्माचें आचरण करणारा असा कर्ता जीव हा देखील त्रिगुणात्मक असतो. सात्त्विक कर्ता तो म्हणावा कीं जो आसक्ति ठेवीत नाहीं, अहकार बाळगीत नाहीं, सफलता–असफलता याचें सुखदुःख मानीत नाहीं, व सर्वविकाररहित असतो. नागवेलीला फळ न आलें तरी तिचा जन्म सफलच, त्याप्रमाणें सात्त्विक कर्त्याचा कर्म स्वत फलरूपच असतात. फळाला फळ कोठून येईल? शास्त्रान सागितलेले नियमनिग्रह तो पाळतो, देहधर्माना विसरून जातो, सात्त्विक कर्मानें त्याचें तेज वाढत जातें व आनदहि वाढत जातो. कर्मात खड पडला तरी तो खड असें मानीत नाहीं. आता राजस कर्ता तो म्हणावा कीं, जो थोड्या कर्मानें व सोप्या रीतीनें पुष्कळ फळ मिळविण्याची इच्छा धरतो व आपलें सभाळून दुसऱ्याचेंहि मिळवू पाहतो. आबट घोरीचें काटेरी झाड कोणाला गोड फळ देत नाहीं, मात्र अगसर्ग झाला कीं कातडेंच फाडून काढतें! राजस कर्त्याच्या ठिकाणीं सुखदुःखाची भावना फार. स्वतःला फार मोठा व दुसऱ्याला फार लहान मानण्याची त्याची बुद्धि असते. तामस कर्ता

तो म्हणाना की जो काहींच नियम पाळीत नाहीं. त्याच्या बुद्धीला चागला संस्कार नसतो. तो घुमून बसतो. घातक, आळशी, असंतुष्ट इत्यादि दोषांनीं ग्रासलेला असतो. लहान मुलें, वेडी माणसें, यातच त्याची गणना. त्याचें जीवन म्हणजे द्यूतकर्माचें तिकटीवरचें घरच होय, किंवा चोराची गुहा. मत्सरा-मुळें तो दुष्ट विचार तेव्हाच ओकतो. दुसऱ्याचें झालेलं हित त्याच्या पोटांत मळमळ उत्पन्न करतें. सत्कर्माची वेळ आली असता त्याला झोप किंवा आळस येतो. आणि दुष्कर्माची वेळ आली असता मात्र त्याच्या उलट घडतें. तो अखंड चिंतेंत राहतो किंवा लेंड्याच्या आगटीप्रमाणे सतत धुमत असतो. कल्पांताच्या पलीकडील सुखाची चिंता तो करतो.

बुद्धि देखील तीन प्रकारची असते. त्यांत सात्त्विक बुद्धि चागली हे उघडच आहे. ती असा बळकट भरवसा धरते कीं, केवळ आत्मप्राप्तीकडे दृष्टि ठेवून कर्म केल्यानें मोक्ष जवळ येतो. प्रवृत्ति खालीं घालून व निवृत्ति तीवर बसवून कर्म केल्यानें मोक्ष मिळतो. सात्त्विक बुद्धीला अकरणीय कर्म पाहून भय वाटतें व ती निवृत्तीचा विनियोग करते. अकरणीय कृत्य हे तिला सर्प, अग्नि, वाघ, महापूर इत्यादींप्रमाणें भयप्रद वाटतें. राजस बुद्धि हा कर्माकर्मांत विवेक सभाळीत नाहीं. विवेकदृष्टि न ठेवल्यानें हातून घडेल तें लाभापेक्षा हानिदायकच अधिक होणार. मोत्याची परीक्षा नसता आपल्याच बुद्धिबळावर सौदा करून तीं विकत घेणाऱ्याच्या पदरीं वाईट मोत्येंच पडावयाचीं. तामस बुद्धि ही अनिष्ट हे ठरलेलेंच आहे. ती सर्व चागल्याविषयीं वाईट भावना करून घेते. चोराला राजमार्ग व राक्षसाला दिवसाचा प्रकाश अनिष्ट वाटतो. बुद्धीला खरा आधार धैर्याचा. तें धैर्य सात्त्विक असेल तर इंद्रियें आपले बाहेरचे विषय टाकून अंतर्मुख होतात. सिंहाची आरोळी कानावर पडली तर माजलेला हत्ती देखील वर उचललेलें पाऊल खालीं टेकीत नाहीं, त्याप्रमाणे धैर्य मनात येताच उन्मत्त इंद्रियेंहि स्थगित होतात, मन बुद्धीच्या मागें जाऊन दडून बसतें आणि सकल विकल्प पैंजून देतें. प्राणायाम योग हा अशा धैर्याला सहाय्य करतो. धैर्य हे रक्षकाचें काम करतें. आणि काहींहि लाच न घेता इंद्रियांना बंदिवान् करून पेंडखोराप्रमाणें आत्मरूपी राजाच्या स्वाधीन करतें. पण तेंच धैर्य राजस असलें म्हणजे, जीवाला एखाद्या धाडसी व्यापाऱ्याप्रमाणें कर्मरूप व्यापारात फार मोठें भांडवल घालण्याला व मोठमोठ्या लाभाची अपेक्षा धरण्याला सुचवितें. तामस धृति ही आळस, निद्रा, भय, स्नेह, शोक, खेद, असंतोष, विषयेच्छा इत्यादि

काना वाढविते व प्रबळ करते. तात्पर्य, बुद्धीला ज्या प्रकारचें धैर्य लाभेल त्या प्रकारचें कर्म घडतें व त्या प्रकारचें त्रिगुणात्मक फळ मिळतें.

या फळांपैकीं सात्त्विक सुख तें का जें आत्मदर्शनानें मिळतें. हें सुख मिळविण्याला अर्थात् यमदमाचा त्रास सोसून वैराग्य सर्वादाव लागतें व सुख दिसत असता त्यापासून पाठमोरें व्हावें लागतें पण तसें केलें म्हणजे मग मात्र ज्ञानानंद लाभतो. देवानाहि अमृत मिळविण्याकरिता समुद्रमथनाचे श्रम करावेच लागले असें हें वैराग्यजन्य सुख, जें आत्मानुभवाच्या विश्रांतीमुळे परिणामकारक होतें, तेंच सात्त्विक सुख म्हणावें. राजस सुख म्हटलें म्हणजे तें इंद्रियांचा विषयांशीं संयोग झाल्यानें मिळतें. अधिकारी गावांत आला म्हणजे, किंवा घरीं लग्न निघालें म्हणजे, लोक कर्ज काढूनहि खर्च करतात. पण शेवटीं तो प्रासंगिक आनंद लोपून कर्ज न फिटल्यानें नाश होतो. पाण्यांत पडलेलें चांदणें पाहून हंसाला तीं मोत्यें वाटतात, पण त्याच्या लोभानें खडकावर आपटून त्याची चोंच मात्र मोडते किंवा तो स्वतः मरतो. राजस सुख हें परिणामीं व परलोकालाहि अपायकारक असतें. आणि याच्याहि पुढची मजल तामस सुखाची. या सुखाला सुख हें नाव आपणें देखील अयोग्य ठरेल. तसेंच तामस हा गुण असें आपण म्हणणें त्यांतहि चूक होते. कारण गुण हा शब्द चांगल्या अर्थाचा असावयाचा असतो. पण अशा गफलती व गमती होतातच. कारण राक्षसांना पुण्यजन हा विपरीत शब्द लागतोच का नाहीं? तसेंच मंगळ हा ग्रह अमंगळ असतांहि त्याला मंगळ हें शुभदर्शक नाव ज्योतिषशास्त्रांत मिळालें आहेच की नाहीं? त्याप्रमाणें गुण या शब्दाचें झालें आहे. म्हणून तो शब्द विशेष पाहता अधिक रमता सामान्य अर्थानेंच घेण्याचा असतो.

ओढून विषयपराङ्मुख करतो दम हाहि शमालाच सहाय्य करणारा त्यानंतर तप त्याच्या योगानें मनुष्य नेहमीं ईश्वरचिंतन करीत राहतो त्यानंतर शौच म्हणजे शुद्धि ती अतर्बाह्य दोन्ही ठिकाणीं असावी लागते नतर क्षमा ती ज्याचे अंगीं असलेला मनुष्य पृथ्वीप्रमाण सर्वांचा मार सोसतो नतर आर्जव, म्हणजे नाव डल्या किंवा प्रतिकूल किंवा विरोधी प्राण्यासबधानेंहि आपल्याकडून सरळ वागणूक ठेवणें काडें वाकडे निघालें तरी ऊस हा त्यातहि मधुर रसच ठेवतो प्रवाहाला नागा वाकडी मिळाली तरी तेंतून गगा शस्य तितकी सरळच वाहते आर्जव हें असें काहीं गोड आहे का नाहीं सतस्वरातीत पचमस्वरच नतर ज्ञान ज्याच्या योगानें मुळात शास्त्रप्रमाणें आचरण आणि परिणामीं ईश्वरप्राप्ति हेंच ज्ञान यथार्थ अशी जी जाणीव, तेंच हे ज्ञान होय नतर विज्ञान हेंहि गुणरत्नच आहे ते ब्राह्मणाला लाभते तसेंच आस्तिक्य त्याचा अर्थ शास्त्रप्रणीत मार्गाविषयी आदरबुद्धि राजाज्ञेचा ठिका जसा सर्वमान्य, तशीच शास्त्राज्ञा ब्राह्मणाच्या गळ्यात हा नव–गुण–रत्नाचा हार चागला शोभतो व तो त्याला गळ्यातून कधीं काढीत नाही जसे चद्र म्हटला कीं चादणें हे त्या बरोबर आलेंच, त्याप्रमाणे ब्राह्मण म्हटला की या नवगुणाची आठवण होतेच

आता क्षत्रियाचे गुण पाहा त्याचा पहिला गुण शौर्य त्यामुळें क्षत्रिय हा स्वत च पराक्रमी असतो सिंह हा शिकारीला निघाला म्हणजे बरोबर सोबती घेतो काय? नाहीं तसाच क्षत्रिय तो एकटा असला तरी उलट अनेकाचा पराभव करतो तेज हा त्याचा दुसरा गुण व धैर्य हा तिसरा धैर्यामुळे क्षत्रिय कर्मात अगावर आकाश कोसळून पडले तरी त्याची बुद्धि नेहमीं स्वच्छ व तीक्ष्ण राहते नतर दक्षत्व अपलायन हा आणखी एक गुण त्यामुळें क्षत्रिय रणात मरेल, पण पाठमोरा फिरणार नाही तशाच भक्ति म्हणजे ईश्वरभाव तसेंच दान म्हणजे नियामक शक्ति, जिच्या योगानें क्षत्रिय हा सामर्थ्यानें इतराना नियंत्रित करतो अशा सात गुणानीं मंडित जो क्षत्रिय तो सत्त्वगुणरूपी सोन्याचा मेरु पर्वत किंवा सप्त स्वर्गाना आधार म्हणावा

वैश्याचे गुण हे प्रसिद्धच आहेत जमीन वीं बियाण, नागर फाळ पशु समृद्धि, व्यापाराचे ज्ञान, व्यवहाराचें कौशल्य ( स्वस्तात स्वस्त घेऊन महागात महाग विकणें ) इत्यादिकावरून वैश्य ओळखावा शूद्राला मात्र वरील तीन वर्णांची सेवा तीवून वेगळे कर्म नाहीं प्रत्येक मनुष्यानें आपला वर्ण, आपलें कर्म, समजावून घ्यावे. रत्न आपलेंच पण सराफाकडून पारखून घेतलेलें बरं,

मृदंग–वीणा याचा ध्वनि क्षणभरानें मागाहून थाबतो, त्याप्रमाण अभ्यासाच्या कारणानें झालेले श्रम नाहींसे होण्याला क्षणमात्र लागतो, पण त्यामुळें आत्म बोधरूपी प्रसन्नतेचा आनंद लाभतो एकेक घासानें भूक कमी होत जावी त्याप्रमाणें बोधामुळ अज्ञान कमी कमी होत जातें व शेवटीं अगदा नाहींसें होतें शेवटीं एका परमेश्वरावाचून त्याश काहीं उरत नाहीं ही चौथी भक्ति म्हणतात कारण आर्त, जिज्ञासू व अर्थार्थी याच्या भक्तीचे इतर तीन प्रकार आहेतच माझा सहज प्रकाश यालाच भक्ति म्हणतात पण वास्तविक ते तीन प्रकारहि वेगळ नाहींत कारण मीच आर्तांचा इच्छा–विषय, मीच त्याचा जिज्ञासा–विषय, व मीच त्याचा याचना–विषयहि असतों ज्ञानभक्तीनें माझ्याशीं ऐक्य पावणारा भक्त तो मीच होतो ज्ञानी लोक हिला स्वसंविति म्हणतात नैर हिला शक्ति म्हणतात आरसा काढून नेला तरी आपण पाहि लेलें मुख–सौंदर्य आपल्याला भोगता येतें ह्याच ऐक्यातील भोग त्यागाच्या शब्दाची स्तुति व वाईट शब्दाची निंदा करावयाची झाली तरी ती शब्दानींच करावी लागते अगात राजेपण असेल तरच राजाला त भोगता यत जीवानें माझ्याशा एकरूप होणें हेंच त्यानें मला भजणं होय अद्वैतात क्रिया नसा, तरी अद्वैतात भक्ति असू शकतेच मौन हें स्तवनच होतें द्रष्टा हा दृश्याला घेऊन जातो तेव्हा दृश्याबरोबर द्रष्टेपणाहि नाहींसा होतो कल्पांताच्या वेळीं सर्व पाणीच झाल्यान पाण्याचे प्रवाह थाबतात, तसें हें घडतें कर्म व कर्ता हे एकच होताल तो जें जें कराल त सर्व मत्पर होतें त्याची कल्पना हा माझा जप, त्याचें कर्म ही माझी पूजा व त्याची स्थिति ही माझी समाधि माझे सर्व गुण म्हणजे अपारत्व, अनादित्व, अनंतत्व, निरारमत्व, निराकारत्व हीं सर्व त्याला लाभतात. व माझ्या ह्या सर्व गुणाचें ज्ञान त्याला होतें. ज्ञानाचीहि ऊर्मि उरत नाहीं म्हणजे ज्ञानहि नाहींसें होतें एकात एक वजा केला तर शून्य (पण एकात एक मिळविला तरीहि शून्यच)! आनंदच आनंद भोगतो, प्रमाच प्रमेला आलिंगिते व आश्चर्यच आश्चर्यात बुडून जातें. मी म्हणजे कर्मयोगरूपी सार्वभौम राजाच्या मुकुटातील रत्न किंवा मोक्षरूपी कळस आहें जी गोष्ट प्राप्त होते, ती स्वत सिद्धच असते

सर्व कर्में ईश्वरार्पण केल्यानें सव काहीं जीवाला साधत त्यामुळ जन्ममृत्यू आल तरी त्यातून सहज तरून जाता यत, माझ्या बालपणाचें ह मर्म तुला नीट कळे तर अर्जुना, कौरवाना आप्त म्हणणें, युद्धाला पाप म्हणणें, या चुका

तुझ्या हातून यापुढें होणार नाहींत तुझी भ्राति जाईल, तुझा क्षात्र-स्वभाव बळ करील प्रवाहाच्या उलट पोहत जाण्यात काय अर्थ? बीजानें मला अंकुर फुटणार नाहींत हें म्हणणें फुकट आहे कारण, तो प्रकृतिधर्म आहे नाहीं नाहीं म्हणता तूच युद्ध करशील. कर्म हें अदृष्ट-फल-दायक व ईश्वराधीन असतें ईश्वरच अहंकार पाघरून प्रकट झाला म्हणजे तो मायेच्या पडद्याआड्न जीवमात्राच्या सर्व दोऱ्या हलवितो जीवमात्र हे शरीर-यंत्रावर बसविले जाऊन फिरविले जातात तेव्हा मी अमुक करणार नाहा असें कोणी म्हणून चालणारच नाहीं ईश्वराला शरण गेल्यानें श्रेष्ठ अशी शांति व आत्मस्थितीच्या राज्याचा धनीपणा लाभेल. हें गुप्त ज्ञान-मर्म सर्व मीं तुला सांगितलें, तें ऐकून आता वाटेल तें कर तुला फिरून सांगतों कीं, तुझ्या निमित्तानें मी आपल्याकरिताच बोलत असून तुझ्यामाझ्यात भेद नाहीं मला सर्व कर्मांचा विषय कर उपयोगा पडण्यासारखें जें जें तू करशील तें मला स्मरून यज्ञच समज यात शंका घेऊं नको हे सर्व तुझी शपथ घेऊन सांगतों तुझ्या वेधानें प्रेमानें मी अर्धा (म्ह० जीव) बनलों आहे व माझ्या प्रेमानें तू पूर्ण बनला आहेस दुःखाला प्रसवणारी आशा, पापाला प्रसवणारी निंदा, हीनतेला प्रसवणारें दुर्भाग्य, धर्माधर्माला प्रसवणारें अज्ञान या सर्वाचा त्याग करून मला येऊन भेट माझें एकपण जाणणें म्हणजेच मला शरण येणें ज्ञानानें माझी सहजभक्ति मिळीव तुझें पुण्य, पाप, धर्म व अधर्म हीं सर्व मीच होईन असें बोलून श्रीकृष्णानें अर्जुनाला आलिंगन दिलें व द्वैतपण मोडून त्याला आपल्या स्वरूपीं मिळवून घेतलं

तेव्हा अर्जुन म्हणाला—होय देवा, तुझें बोलणें मला पटलें माझा मोह गेला माझें आत्मस्वरूप मला मिळालें, व तुझी आज्ञा हेंच कर्तव्य मला आता उरलें

अशा प्रकारें संवादरूपी बोलल्यावर कृष्ण व अर्जुन यांचें लक्ष्यच लागलें म्हणाना! संजयानें सांगितलेल्या सर्व गोष्टींचा व दिलेल्या ज्ञानाचा धृतराष्ट्राच्या मनावर काहींच परिणाम झाला नाहीं परंतु संजय मात्र आपलेपणा विसरून अष्ट सात्त्विक भावांनीं भरून गेला रत्नाच्या तेजानें रत्नच झाकून जावें, तसें संजयाचें काहीं वेळ झालें धृतराष्ट्र म्हणाला, ‘ केवळ युद्धाचें वर्णन करून मला सांगण्याकरितां व्यासांनीं तुला माझ्याकडे पाठविलें असें असता हा कृष्णार्जुन-संवाद मग का सांगितलास? मला आता येवढेंच सांग कीं, शेवटीं युद्धात जय

कोणाचा होणार?'' तेव्हा संजय म्हणाला, 'तें काय सांगावयाला पाहिजे? ज्या बाजूला श्रीकृष्ण, त्या बाजूला विजय ठेवलेलाच! आयुष्य आहे तेथें जगणें आहे, चंद्र तेथें चांदणें, शिव तेथें शक्ति, संत तेथें सुविचार, राजा तेथें सैन्य, प्रेम तेथें संबंध, सौजन्य तेथें सोयरीक, अग्नि तेथें दाहकता, दया तेथें धर्म, धर्म तेथें सुखागम, सुख तेथें पुरुषोत्तम, वन तेथें पुष्पें, पुष्पें तेथें भ्रमर, गुरु तेथें ज्ञान, ज्ञान तेथें आत्म-दर्शन, आत्म-दर्शन तेथें समाधान, भाग्य तेथें विलास, सुख तेथें उल्हास, या सर्वांप्रमाणें कृष्ण तेथें विजय हें ठरलेलेंच समज. पण कृष्णापेक्षाहि अर्जुनाचाच उपयोग विशेष आहे. समुद्रातूनच मेघ निघतात, परंतु मेघातलें पाणी गोड म्हणून तेंच पिण्याला योग्य. परिसामुळें लोखंडाचें सोनें होतें, परंतु जगातील व्यवहार हा परिसानें होत नसून सोन्यानेंच होतो पण हें तरी कृष्णकृपेमुळें, त्याच्याच इच्छेनें. मुलगा हा जसा आपणाहून अधिक चांगला निघावा असें बापाला वाटतें त्याप्रमाणें अर्जुनाचे हातून युद्धाचें महत्कार्य घडावें असें श्रीकृष्णाला वाटलें.'

पाप नष्ट होऊन स्वधर्मरूपी सूर्याचा उदय व्हावा. गोदावरीच्या दक्षिण तीरीं जें नेवासे नावाचे अनादि क्षेत्र आहे, ज्याचा विस्तार पचकोशीचा आहे, जेथें महाल्या ही देवता आहे, व ज्यावर यादववंशीय रामराजाचें राज्य आहे. तेथें गीतेवर हा मराठी टीकारुप अलकार घडविण्यात आला.

---

## ( १८ व्या अध्यायांतील निवडक वचनें )

१ लोकीं तरी आथी ऐसें । जे दुरूनि कळस दिसे
आणि भेटींचि हातवसे । देवतेचि तिये
२ नोहे कळसापरतें कांहीं । प्रासादीं काम नाहीं
३ जाल्या कामा नाहीं चोरी । तें कळसें होय उजरी
४ समर्थाचिये पंक्तिभोजनें । तळिल्यावरिल्या एक पक्वान्नें
तेवीं श्रवणें अर्थे पठणें । मोक्षचि लाभे
५ परी प्रमेयाची उजरी । आनान रूप न धरी
नाना रत्नमणीं दोरी । एकचि जैसी
६ सात शतें श्लोक । अध्याया अठराचे लेख
परी देव बोलिले एक । जें दुजें नाहीं
७ वत्स पाळ्याही वरी । धेनू न वचावी दुरी
अनन्य प्रीतीची परी । ऐसी आहे
तेणें काजेंवीणही बोलावें । तें देखिलें तरी पाहावें
भोगिता चाड दुणावे । पढियंतयासाठीं
८ निपटूनि कर्म सांडिजे । तें सांडणें सन्यास म्हणिजे
फळमात्र का त्यजिजे । तो त्याग गा
९ का अंग जाहालें सहजें । परी लेणें उचमें कीजे
नदी आपैसी आपाधिजे । विहिरी जेवीं
तैसें नित्यनैमित्तिक । कर्म होय स्वाभाविक
परी न कामिता काम्भिक । न निफजे

१० केलें काम्य कर्म तैसें । फळ भोगावया धरणें बैसे
न फेडितां ऋण जैसें । वोसंडीना
११ मग तया त्यागातें जगीं । संन्यास ऐसया मार्गी
बोलिजे अंतरंगीं । सर्वद्रष्टा
१२ तैसें नित्य जें कां कर्म । तें निमित्ताचे लाहे नियम
एथ उंचावे तेणें नाम । नैमित्तिक होय
१३ परी भोजनीं जैसें होये । तृप्ती लाभे भूक जाये
तैसें नित्य नैमित्तिकीं आहे । सर्वांगीं फळ
१४ हा संन्यास जैं संभवे । तैं काम्य बाधूं न पावे
निषिद्ध तंव स्वभावें । निषिद्धें गेलें
१५ मग सस्य फळपाकांत । तैसें निमालिया कर्मजात
आत्मज्ञान गिंवसित । अपैसें ये
१६ म्हणौनि त्याज्य जें नोहे । तेथ त्यागातें न सुवावें
त्याज्यालागीं नोहावें । लोभपर
१७ चुकलिया त्यागाचें वेहें । केला सर्वत्यागही होय वोझें
१८ तैसी आत्मज्ञानविखीं । जंव निश्चिती नाहीं निकी
तंव नोहावें यागादिकीं । उदासीन
१९ जें चालणें वेगावत जाये । तो वेग बैसावयाचि होये
तैसा कर्मातिशय आहे । नैष्कर्म्यालागीं
२० एवं तीर्थें जाण निर्मळें । सत्कर्मेंची
२१ तैसीं एके हातवटिया । कर्में कीजती धनंजया
बंधकेंचि सोडवावया । मुख्यें होती
२२ आर्धीचि फळीं आस तुटिया । कर्में आरंभावीं धनंजया
परावें बाळ धाया । पाहिजे जैसें
२३ पिंपरुवांचिया आशा । न शिंपिजे पिंपळ जैसा
तैसिया फळनिराशा । कीजती कर्में

२४ म्हणौनि फळीं त्याग । साहोनि देहसंग
कर्मे करावीं हा चाग । निरोप माझा

२५ जे कर्माची पैलीकड । नावेक दिसे दुवाड
जे वाहतिये वेळे जड । शिदोरी जैसी

२६ तें मोक्षफळ अज्ञाना । त्यागिया नाहीं अर्जुना
म्हणौनि तो त्याग न माना । राजसु तो

२७ परी हें मी करित असें । ऐसा आठव त्यजीं मानसें
तैसेंचि पाणी दे नाशें । फळाचिये

२८ तैसा कर्तृत्वाचा मद । आणि कर्मफळाचा आस्वाद
या दोहींचें नाव बंध । कर्माचा कीं

२९ म्हणऊनि कर्म आणि कर्ता । या द्वैतभावाची वार्ता
नेणे तो पाडुसुता । सात्त्विक त्याग

३० आणि हा गा सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची
खंती करिती कर्माची । ते गांवढे गा

३१ तैसा शरीराचेनि आभासें । नांदत जव असे
तव कर्मत्यागाचें पिसें । काइसें तरी

३२ यया कर्मातें साडिती परी । एकीचि ते अवधारीं
जे करितां न जाइजे हारीं । फळाशेचिये

३३ म्हणौनि इयापरी जगीं । कर्मे त्यजी तो महात्यागी
वेर मूर्छेने नाव रोगीं । विश्रांति जैसी

३४ तैसें कर्ता कर्म करू । अकर्ता फळाशा न धरू
एय न शके आवरूं । दोहींतें कर्म

३५ देव मनुष्य स्थावर । यया नाव जगडंबर
आणि हे तंव तीन्ही प्रकार । कर्मफळाचे

३६ रेचकचि ये गवसें । होय स्तमावयादोषें
तेवीं सत्यासत्य समरसें । सत्यासत्यचि जिणिजे
म्हणौनि सममावें शुमाशुमें । मिळोनि अनुष्ठानाचें उमें
३७ तेणें मनुष्यत्व लामे । तें मिश्र फळ
३८ जैसा समर्थ आणि ऋणिया । मार्गी आला वाइणिया
न छोटे तैसा प्राणिया । पडे तो मोग
३९ येरवीं जातिपुण्याचें विकसणें । त्याचि नाम जैसें सुकर्णे
तैसें कर्ममिषें न करणें । केलें जिहीं
४० पडोनि गेलिया भिंती । चित्राची केवळ होय माती
का पाहालेया राती । अधार उरे ?
४१ पाघरोनि नईचें उदक । असे नईमाजीं खडक
परी जाणिजे का वेगळिक । कोडीची ते
हो का उदकाजवळी । परी सिनीचि ते बाबुळी
काय सगास्तव काजळी । दीप म्हणों ये ?
४२ वेदरायाचिया राजधानीं । साख्यवेदाताच्या मवनीं
निरूपणाच्या निशाणध्वनीं । गर्जती जियें
४३ मक्त जैसेनि जेथ पाहे । तेथ तें तेंचि होत आये
तो मी तुझें जाहालों आहे । खेळणें आजी
४४ एथ एकमेकाचिये खुणें । विसवाद तवचि जिणें
४५ एर आत्मतत्त्व उदासीन । तें ना हेतु ना उपादान
ना तें अगें करी सवाहन । कर्मसिद्धीचें
४६ तैसें पाच हेतू मिळणीं । पाचेंचि इहीं कारणीं
किजे कर्मलताची लावणी । आत्मा सिना
४७ हें चोविसाही तत्त्वाचें । बुदुबुयरवस्तीचें
तुटे बंघमोक्षाचें । गुथाडें एथ

४८ तैसें आपुलेनि विसरें । चैतन्यचि देहाकारें
आभासोनि आविष्कारें । देहपणें जें

४९ का एकचि पुरुष जैसा । अनुसरत नवा रसा
नवविध ऐसा । आवडों लागे

५० आणि ऋतु बरवा शारदू । शारदीं पुढती चांदू
चंद्रीं जैसा सवधू । पूर्णिमेचा

५१ का वसतीं बरवा आराम । आरामीं प्रियासंगम
संगमीं आगम । उपचाराचा

५२ वाचे बरवें कवित्व । कवित्वीं बरवें रसिकत्व
रसिकत्वीं परतत्त्व-। स्पर्श जैसा
तैसी सर्ववृत्तिवैभवीं । बुद्धीचि एकली बरवी

५३ तैसें मन हेतु पाडवा । होय कर्मसंकल्पभावा
तो संकल्प लावी दिवा । वाचेचा गा

५४ तैसें मनवाचादेहाचें । कर्म मनादि हेतुचि रचे
रत्नीं घडे रत्नाचें । दळवाडें जेवीं

५५ का उसाचें कांडें उसा । वाढी हेतु
नाना वाग्देवता वानावी । ते वाचाचि लागे कमवावी

५६ तें शास्त्रार्थें मानिलेया । मार्गी अनुसरे धनंजया
तरी न्याय तो न्याया । हेतु होय

५७ तैसें हेतुकारणमेळें । उठी कर्म जें साधळें
तें शास्त्राचे लाहे डोळे । तें न्याय्य म्हणिपे

५८ तैसें शास्त्रमार्गेंवीण । केलें नाहे जरी अकारण
तरी त्यागो का नागवण । दानलेखीं

५९ परी मंत्राची कडसणी । जंव नेणिजे कोदंडपाणी
तंव उच्चारफळ वाणी । न पवे जेवीं

६० तें शालाचिये न लगे । कासे जव
कर्म होतचि असे तेव्हाही । परी तें होणें नव्हे पाहीं
तो अन्याय गा अन्यायी । हेतु
६१ जेणें चैतन्या ईश्वरा ब्रह्मा । देहचि केलें परमसीमा
तया आत्मा कर्ता हे प्रमा । अलोट उपजे
६२ म्हणोनि निर्मळे आत्मस्वरूपीं । जो प्रकृतीचें केलें आरोपी
तो कल्पकोडींच्या मापीं । मवीचि कर्म
६३ तैसा विश्वस्वप्नेंसीं माया । नीद साडूनि धनंजया
सहजेंचि चेइला अद्वया । नद्रूपणें जो
६४ तैसा आत्मत्वें वेष्टिला होये । तो जया तया दृश्यातें पाहे
तें दृश्य द्रष्टेपणेंसी होत जाये । तयाचेंचि रूप
६५ तैसें वेद्य वेदकपणेंसीं । पडिलें का जयाच्या ग्रासीं
तया देह मी ऐसी । अहंता कैंची
६६ का सरलेया गीताचा समारंभू
न वचे वाहवलेयाचा क्षोभू
भूमी लोळोनि गेलिया अबू । बोल थारे
६७ आत्मयाचेनि उद्यमेंवीण । तैसें देहादिपंचकारण
होय आपणया आपण । क्रियाजात
६८ पिसें नेसलें का नागवें । हें लोकीं येऊनि जाणावें
ठाणोरियाचे मवावे । आणिकी घाय
६९ म्हणौनि कार्य कर्ता क्रिया । हें स्वरूपचि जाहलें जया
नाहीं शरीरादिकीं तया । कर्मबंध
७० तैसें ज्ञेय तरी एकसरें । परी ज्ञान इंद्रियद्वारें
घे म्हणोनि प्रकारें । पाचें जालें
७१ हें ना घनगर्जनासरिसा । मयूर वोवाडे आकाशा
ज्ञाता ज्ञेया देखोनि तैसा । धावचि घे

७२ तैसें ज्ञातेपणें जें असे । तें ये कर्ता ऐसिये दशे
जेवितें बैसलें जैसें । रंधन करूं
का भवरेंचि केला मळा । वरकल जाला अंकसळा
नाना देव रिगाला देउळा- । चिया कामा
तैसा ज्ञेयाचि हांवा । ज्ञाता इंद्रियांचा मेळावा
राहाटवीं तेथ पांडवा । कर्ता होय

७३ एथ ज्ञाता ज्ञान ज्ञेय । हें कर्माचें प्रवृत्तित्रय
तैसेंचि कर्ता करण कार्य । हा कर्मसंचय

७४ तरी अर्जुना गा तें पुढें । सात्त्विक ज्ञान चोखडें
जयाच्या उदयीं ज्ञेय बुडे । ज्ञातेनिसीं

७५ तैसी जया ज्ञानाचिया हाता । न लगेचि दृश्यकथा
तें ज्ञान जाण सर्वथा । सात्त्विक गा

७६ तरी पार्था परियेस । तें ज्ञान गा राजस
जें भेदाची कांस । धरूनि चाले

७७ तैसी जया ज्ञाना । जाणोनि भूतव्यक्ती भिन्ना
ऐक्यबोधाची भावना । निमोनि गेली

७८ तरी तें तामस ज्ञान । हिंडे विधींचेनि वस्त्रें हीन
श्रुति पाठमोरी नग्न । म्हणौनि तया

७९ मृत्यूचें आघवेंचि अन्न । आगी आघवेंचि इंधन
तैसें जगचि आपलें धन । तामसज्ञाना

८० ना ईश्वर पाहता आहे । तो भोगवी जरी हें होये
तरी देवचि खाये । विकूनियां

८१ गावींचे देवळेश्वर । नियामकचि होती साचार
तरी देशींचे डोंगर । उगे कां असती

८२ तैसें जें वायाणें । वोसाळ दिसे जाणणें
तयातें मी म्हणें । तामस ज्ञान

८३ तेंही ज्ञान इया भापा । बोलिजे तो भाव ऐसा
जात्यंधाचा का जैसा । डोळा वाड
का बधिराचे नीट कान । अपेया नाम पान
तैसें आडनांव ज्ञान । तामसा तया
८४ तें ज्ञान नोहे जाणावें । डोळस तम
८५ तें नित्य कर्म भलें । होय नैमित्तिकीं सावाइलें
सोनयासि जोडलें । सौरम्य जैसें
८६ हें असो परमाणूचेनि लाभें । पाताळ लंघिती वोळंबे
तैसें स्वर्गसुखलोभें । विचंबणें जें
तें काम्यकर्म सक्लेश । जाणावें येथ राजस
८७ मग नेणे बहु थोडें । न पाहे मागें पुढें
मार्गामार्ग येकवढें । करीत चाले
तैसें कृत्याकृत्य सरकटित । आपपर नुरवित
कर्म होय तें निश्चित । तामस जाण
८८ जो प्रकृती आतलेपणें । कृत्याकृत्यस्वाद नेणें
फुगे केरें घालेपणें । उकरडा जैसा
८९ म्हणौनि तिहीं गुणीं । बुद्धी केली त्रिगुणी
धृतीसिही वांटणी । तैसीचि असे
९० म्हणौनि अधिकारें मानिलें । जें विधिचेनि वोधें आलें
तें येकचि येथ भलें । नित्य कर्म
९१ म्हणौनि निवृत्तिचि मांडली । सूनि प्रवृत्तितळीं
इये कर्मी बुडकुळी । द्यावी कीं ना
९२ हे करणीयाचिया कडे । जें ज्ञान आधी चोखडें
आणि करणीय हें फुडें । ऐसें जाण
९३ ते गा बुद्धि चोखविषीं । जाण येथ राजसी
अक्षत टाकिली जैसी । मांदियेवरी

११७ म्हणौनि ज्ञातिवर्शे साचार । सहज असे जो अधिकार
तो आपुलालिया शास्त्रें गोचर । आपण किजे
११८ घोंधीं पडिलें पाणी । नेणे आनानी वाहणी
तैसा जाय आचरणीं । व्यवस्थौनि
११९ अर्जुना जो यापरी । तें विहित कर्म स्वयें करी
तो मोक्षाच्या ऐलतीरीं । पैठा होय
१२० येर नित्य कर्म तेंव । फळत्यागें वेंचिलें सर्व
म्हणौनि मोक्षाची शींव । ठाकूं लाहे
ऐसेनि शुभाशुभीं संसारीं । सांडिला तो अवधारीं
वैराग्य मोक्षद्वारीं । उभा ठाके
जें सकळभाग्याची सीमा । मोक्षलाभाची जे प्रमा
नाना कर्ममार्गश्रमा । शेवट जेथ
मोक्षफळें दिधलीं वोल । जें सुकृततरूचें फूल
तयें वैराग्यीं ठेवी पाउल । भंवरू जैसा
१२१ ऐसी मोक्षाची योग्यता । सिद्धी जाय तया पांडुसुता
अनुसरोनि विहिता । कर्मा यया
हें विहित कर्म पांडवा । आपुला अनन्य वोलावा
आणि हेचि परम सेवा । मज सर्वात्मकाची
१२२ सम्यक्ज्ञान नुदैजतां । वेंवेंचि तन्मयता
उपजे ऐसी योग्यता । बोधाची लाहे
म्हणौनि मोक्षलाभालार्गी । जो व्रतें वाहतसे आंगीं
तेणें स्वधर्म आस्था चांगी । अनुष्ठावा
१२३ अगा पाणियाहूनि बहुवें । तुपीं गुण कीर आहे
परी मीना काय होये । असणें तेथ
१२४ यालागीं कर्म आपलें । जें जातिस्वभावें असे आलें
तें करी तेणें जिंतिलें । कर्मबंधातें

१२५ अगा उजू वाटा चालावें । तऱ्ही पायचि शिणवावें
ना आडरानें धावावें । तऱ्ही तेंची

१२६ पैं नित्यहोम देयावया । का सैरा आगी सुवावया
फुकिता धूम धनंजया । साहणें तेंचि

१२७ म्हणौनि करावा स्वधर्म । जो करिता हिरोनि घे श्रम
उचित देईल परम । पुरुषार्थराज

१२८ म्हणौनि नियमिलिया मानसीं
स्पृहा नासोनि जाय आपैसी
किंबहुना तो ऐसी । भूमिका पावे

१२९ घरवणी वेंचे सरे । ऐसें भोगें प्राचीन पुरे
नवें तंव नुपकरे । काहींचि करूं

१३० तैसेंचि अबोधनाशासवें । नाशे क्रियाजात आघवें
ऐसा समूळ समवे । संन्यास हा

१३१ तैसे नेणणें जें गेलें । तेणें जाणणेंही नेलें
मग निष्क्रिय उरलें चिन्मात्रची

१३२ आणि स्वधर्माचें फळ । ईश्वरीं अर्पूनि सकळ
घेऊनि केलें अढळ । वैराग्यपद

१३३ ऐक्याचें एकपण सरे । जेथ आनदकणही विरे
काहींचि नुरोनि उरे । जें काहीं गा

१३४ यापरी इष्टानिष्टीं । रागद्वेष किरीटी
त्यजूनि गिरिकपाटीं । निकुर्जी वसे

१३५ ऐसेनि देह वाचा मानस । हें जिणोनि बाह्यप्रदेश
आकळिलें आकाश । ध्यानाचें तेणें

१३६ तेथ ध्येय ध्यान ध्याता । यया तिहीं एकरूपता
होय तंव पाडुसुता । किजे तें गा

१३७ म्हणौनि सवैराग्य । ज्ञानाभ्यास तो समाग्य
करूनि जाला योग्य । आत्मलाभा
ऐसी वैराग्याची आंगी । बाणूनिया वज्रांगी
राजयोगतुरंगीं । आरूढला

१३८ ऐसेनि ब्रह्मैक्यासारिखें । स्वराज्य येतां जवळिकें
झळंबित आहे हरीखें । तिन्ही लोक

१३९ तैसा आत्मबोधीं उद्यम । करितां होय जो श्रम
तोही जेथें शम । होऊनि जाय

१४० तैसा बोध्यजात गिळित । बोधबोधें ये मजआंत
मिसळला तेथ साद्यंत । अबोध गेला

१४१ नातरी लेणियाचे ठसे । आटोनि गेलिया मुसे
नामरूपभेदें जैसें । सांडिजे सोनें

१४२ तैसा मी एकवांचूनि कांहीं । तया तयाहीसकट नाहीं
हे चौथी भक्ती पाहीं । माझी तो लाहे

१४३ तैसा मीचि अज्ञानद्वारें । दिसे परी हस्तातें
मग द्रष्टत्वीं तें सरे । मियांचि मी लाभ
म्हणौनि दृश्यपथा । अतीत माझा पार्था
भक्तियोग चवथा । म्हणितला गा

१४४ ह्या ज्ञानभक्ती सहज । भक्त एकवटला मज

१४५ हा गा गजन्यत्व नव्हता आधीं । रावो रायपण काय भोगी

१४६ तैसा रूप होऊनि माझें । मातें क्रियावीण तो भजे
घनाकार का सहजें । सोनयातें जेवीं

१४७ बोलतया बोलताचि भेटे । तेथें बोलेंर हें न घटे
ते मौन तंव गोमटें । स्तवन माझें

१४८ आणि शरीर स्वभाववशें । कांहीं येक करूं जरी बैसे
तरी मीचि तो तेणें मिषें । भेटे तया

१४९ क्रियाजात मी जालेपणें । घडे कांहींचि न करणें
तयाचि नांव पूजणें । खुणेचें माझें

१५० एवं तो बोले तें स्तवन । तो देखे तें दर्शन
अद्वया मज गमन । तो चाले तेंची
तो करी तेतुली पूजा । तो कल्पी तो जप माझा
तो निजे तेचि कपिध्वजा । समाधी माझी

१५१ स्वामी मी सदोदित । सहज मी सतत
सर्व मी सर्वगत । सर्वातीत मी

१५२ तैसा मी तो हें जें असे । तें स्वानंदानुभवसमरसें
काळवूनियां प्रवेशे । मजचिमाजीं

१५३ शम तेथ सामावला । विश्राम विश्रांती आला
अनुभव वेडावला । अनुभूतिपणें

१५४ कीं क्रमयोगप्रासादाचा । कळस जो हा मोक्षाचा
तयावरील अवकाशाचा । उवावो जाला तो

१५५ एक शिष्य एक गुरू । हा रूढला साच व्यवहारू
तो मत्प्राप्तिप्रकारू । जाणावया

१५६ म्हणौनि माधवींचि शाखें । अविद्याविनाशाचीं पात्रें
वांचोनि न होती स्वतंत्रें । आत्मबोधीं

१५७ तया अध्यात्मशास्त्रांसी । जैं साचपणाची ये पुसी
तैं येइजे जया ठायासी । ते हे गीता

१५८ एथ अविद्यानाश हें स्थूळ । तेणें मोक्षापादन फळ
या दोहीं केवळ । साधन ज्ञान

१५९ ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे । तेथ भक्ति माझी उल्हासे
तिया मजसीं समरसें । सुखिया होय

१६० तैसें शुभाशुभ ऐसें । हें तवचिवरी आभासे
जव येक न प्रकाशें । सर्वत्र मी

१६१ ऐसेनि प्रकृतिनाश । जालया कर्मसंन्यास
निफजेल अनायास । सकारण

१६२ मग अभिन्ना इया सेवा । चित्त मियाचि भरेल जेव्हा
माझा प्रसाद जाण तेव्हा । संपूर्ण जाहाला

१६३ स्वमायेचें आडवस्त्र । लावूनि एकला खेळवी सूत्र
बाहेरी नटी छायाचित्र । चौर्‍यासीं लक्ष
तया ब्रह्मादिकीटांता । अवेशाही भूतजातां
देहाकार योग्यता । पाहोनी दावी

१६४ सूत सूतें गुतलें । तृण तृणेंचि बांधिलें
का आत्मबिंबा घेतलें । बाळकें जळीं
तयापरी देहाकारें । आपणपेंचि दुसरें
देखोनि जीव आविष्करे । आत्मबुद्धी

१६५ तैसीं बीजप्रकृतिवशें । अनेकें सूत्रें येके ईशें
चेष्टविजती तो असे । तुझ्या हृदयीं

१६६ हें गीतानाम विख्यात । सर्ववाङ्मयाचें मथित
आत्मा जेणें हस्तगत । रत्न होय

१६७ जयाचेनि अगप्रकाशें । पाताळींचा परमाणु दिसे
तया सूर्याही का जैसें । अंजन सुदलें

१६८ जो व्यवहार जेथ न घडे । तयाचें फळचि तेथ जोडे
काय देवें न सापडे । सानुकूळें ?

येरवीं द्वैताची वारी । सारूनि ऐक्याच्या परिवरीं
भोगिजे तें अववारीं । रहस्य हें

१६९ पैं काजा आपुलिया । रावो आपली आपणया

१७० तैसें स्वर्गनरकसूचक । अज्ञान व्यालें धर्मादिक
तें साडूनि घालीं अशेख । ज्ञानें येणें

१७१ तैसें धर्माधर्माचें टवाळ । दावी अज्ञान जें का मूळ
तें त्यजूनि त्यजीं सकळ । धर्मजात

१७२ लोह उमें खाय माती । तें परिसाचिये सगती
सोनें जालया पुढती । न शिविजे मळें

१७३ हृदया हृदय येक जालें । ये हृदयींचें ते हृदयीं घातलें
द्वैतें न मोडिता केलें । आपणाऐसें अर्जुना

१७४ वेद संपन्न होय ठाईं । परी कृपण ऐसा आन नाहीं
जे कानीं लागला तिहीं । वर्णाच्याची ।
येरा भवव्यया ठेलिया । स्त्रीशूद्रादिका प्राणिया
अनवसर मांडूनिया । राहिला आहे
तरी मज पाहता तें मागील उणें । फेडावया गीतापणें
वेद वेठला भलतेणें । सेव्य होआवया

१७५ म्हणौनि वेदाची सुसेव्यता । ते हे मूर्त जाण श्रीगीता
श्रीकृष्णें पाडुसुता । उपदेशिली

१७६ नहुप स्वर्गाधिपति जाला । परी राहाटीं भावावला
तो भुजगत्व पावला । नेणसीं कायी ?

१७७ मुक्ताफळ भलतैसें । हो परी मुल्य नसे
तव गुण प्रवेशे । तेथ कायी ?

१७८ अंग गोरें आणि तरुणें । वरी लेयिलें आहे लेणें
परी येकलेनि प्राणें । साडिलें जेवीं

१७९ सोनयाचें सुंदर । निर्वाळिलें होय घर
परी सर्पांगना द्वार । रुंधलें आहे

१८० नवपल्लवीं रोमांचित । मंदानिळें कापवित
आमोदजळें बोसंडत । फुलाचे डोळे
कोकिळा कलरवाचेनि मिषें । सद्गद बोलवीत जैसें
वसंत का प्रवेशे । मद्भक्तआरामीं

१८१ गीतापाठकासि असे । फळ अर्थज्ञाचिसरिसें
गीता माउलिये कीं नसे । जाणेंतान्हें

१८२ तो पै मज यावयालागीं । पहिलें येणें करी स्वर्गी
मग आवडे तंव भोगी । पाठीं मजचि मिळे

१८३ पूर्णब्रह्म जाला पार्थ । तरी पुढील साधावया कार्यार्थ
मर्यादा श्रीकृष्णनाथ । उल्लंघों नेदी

१८४ गुंतलों होतों अर्जुनगुणें । तो मुक्त झालों तुझेपणें
आता पुसणें सांगणें । दोन्ही नाहीं

१८५ जें मज तुम्हा आड । होतें भेदाचें कवाड
तें फेडोन केलें गोड । सेवासुख

१८६ वरी द्वंद्वाचें निर्वाण । मांडलें असे दारुण
दोहीं हरीं आपण । हारविजे जैसें

१८७ आतां भेद जरी मोडे । तरी प्रश्नोत्तर का घडे ?
ना भेदचि तरी जोडे । संवादसुख का !

१८८ अद्वयानंदस्पर्शे । दिठी रसमय जाली असे
ते अश्रु नव्हती जैसें । द्रवलची

१८९ हिमवंतींचीं सरोवरें । चंद्रोदयीं होतीं काश्मीरें
मग सूर्यागमीं माघारें । द्रवत्व ये

१९० न देखोनि जें दिसे । नाईकोनि जें असे
जिणें आठवे तें कैसें । चुकू आता ॥

१९१ राजा तेथें कटक । सौजन्य तेथें सोयरीक
वन्हि तेथें दाहक । सामर्थ्य की
दया तेथें धर्म । धर्म तेथें सुखागम
सुखीं पुरुषोत्तम । असे जैसा
वसंत तेथ वनें । वन तेथ सुमनें
सुमनीं पालिंगन । सारंगांचीं

१९२ गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन
दर्शनीं समाधान । आथी जैसें
भाग्य तेथ विलास । सुख तेथें उल्लास
हें असो तेथ प्रकाश । सूर्य जेथें

१९३ कीं श्लोकाक्षरद्राक्षलता । मांडव जाली आहे गीता
संसारपथश्रांता । विसंवावया

१९४ दीपा आगिल मागिल । सूर्य धाकुटा वडील
अमृतसिंधू खोल । उथळ कायसा ॥

१९५ बाळकातें थोरस । माय जें जेवऊं बैसे
तें तया ठाकती तैसे । घांस करी

१९६ आणि क्षीरसिंधूचिया तटा । पाणिया येती गजघटा
तेथ काय मुरघुटा । वारिजत असे ?
पायफुटें पाखिरूं । उडे तरी नभींचि स्थिरू
गगन आक्रमी सत्वरू । तो गरुडही तेथ

१९७ अरुण आगाजवळिके । म्हणोनि सूर्यातें देखे
मा भूतळींची न देखे । मुंगी काई ॥

१९८ यालागीं आम्हा प्राकृता । देशिकारें बंधें गीता
म्हणणें हें अनुचिता । कारण नोहे

१९९ तैसा व्यासाचा मागोवा घेत । भाष्यकारातें वाट पुसत
अयोग्यही मी न पवत । कें जाईन

२०० तैसें अध्यात्मशास्त्रीं इये । अंतरंगचि अधिकारिये
परी लोक वाक्चातुर्यें । होईल सुखिया

# ज्ञानेश्वरींतील निवडक शब्दांचा कोश

आकसळा–धानूला कसोटी
लावून परीक्षा करणारा.
अकिला–स्वाधीन झालेला.
अखरें–खोटें
अगतुक–शरीराचें वजन व आकार.
अगलग–आश्रय.
अगवसा–धोंडा, ढगळा.
अगहीन–वेश्या.
अगीत्राण–कवच, चिलखत
अगेष्टी–शरीर.
अगोचर–इंद्रियांना न कळणारा.
अग्निक–अग्निहोत्री.
अग्रवन–अंकुर.
अचर्चे–चर्चेचा विषय न होणारा.
अचिंत–चिंतारहित.
अचुंबित–अचूक, निर्मळ
अटक–अगम्य प्रतिबंध.
अटुवे–संकुचित.
अडदर–धाक, भीति.
अडपणें–अडचणींत सापडणें
अडवंथी–अरण्य
अडंच–घोर.
अणगट–अंकुर
अणुआर–चाराचुरा.
अतर्ज्योति–प्रत्यगात्मा.

अतिकरण–ओलांडणें.
अतिदाहस–अतिदाहक.
अतिबद्ध–कृपण.
अतिरस–उन्हाळा.
अतिशो–पाझील कळवळा
अतिसो–पावहाळ.
अतीतले–होऊन गेलेले.
अतुरी–पत्नी, स्त्री.
अतुबंळ–घिनमोड.
अतौरी–स्त्री.
अथाव–अथांग, खोल.
अदळपण–असमर्थता.
अधपणें–होरपळणें.
अधाडा–तुटलेला कडा.
अधिकारिया–अधिकारी.
अधिष्ठणें–स्वीकार करणें.
अनकळित–संपूर्ण, प्रयासरहित.
अनपायिनी–अखंड
अनाक्रोश–सहज
अनारिसें–वेगळ.
अनिरूप–वर्णन करिता न येणारा.
अनिवार–एकसारखा.
अनुघडी–सतत, एकसारखें
अनघड्ड–गुप्त, संकोचित, बहिरा.
अनुनायिनी–अनुकूल असो.

अनुपरोध-यथार्थ, निर्विकार.
अनुलेप-उटी.
अनुवृत्ति-क्रम, मालिका.
अनुसंग-निकट संबंध.
अनुसार-मार्ग.
अपभ्रंश-नाश करणारा.
अपरवडी-अन्याय.
अपरिग्रही-परिवाररहित.
अपरिहर-अनिवार्य.
अपवाड-असामर्थ्य, दुबळेपणा.
अपाड-अशक्य, फार.
अपाडें-सत्वर, वेगानें, असाधारण.
अपारांतर-अमर्याद अंतरावरचें.
अपैशुन्य-दोष टाकून गुणमात्र घेण्याची दृष्टि.
अपैसें-सहजच.
अप्रमेय-प्रमाणानें सिद्ध न होणारें.
अप्रात-अमर्याद.
अबोट-अनामिका.
अबोध-अज्ञान.
अभ्रंगी-अयोग्य रीतीनें.
अमोळ-दुर्बळ.
अमेध्य-अपवित्र.
अमेय-मोजता न येणारें.
अरडीदरडी-नदीकांठची दरड.
अरव-बगीचा.
अरुतालें-कर्मी प्रतीता, अलीकडचा.
अरुवार-सुंदर, मृदु.
अर्पना-रूप प्रगट करणें.
अर्थपथें-अर्थात.
अर्थिक-उपयोगी.
अर्धधणी-अतृप्त, अर्धपोटी.
अलक्षणपण-लक्षात न येण्याची स्थिति.
अलोट-दृढ.
अलोलिक-अलौकिक.
अल्पक-दरिद्री.
अवखळा-न्यूनता.
अवगणी-सोंग.
अवगळणें-त्याज्य म्हणून टाकणें.
अवगाळ-गाळ.
अवघड-संकटग्रस्त.
अवचट-एकदम, चुकून.
अवचिता-एकदम आलेला.
अवचिती-आकस्मिकता.
अवछेद-भेद, पृथक्पणा.
अवतणें-आमलण करणें.
अवधारणें-लक्ष देणें.
अवबोध-जागृति,
अवयविया-देही.
अवलीळा-सहज.
अवष्टंभ-अहंकार.
अवसरी-अभाव, उणीव.
अवसात-अकस्मात.
अविरज-न विरजलेलें.
अविरल-निरंतर अखंड.,
अविसाळ-घरटें.
अव्यंगवाणें-दोषरहित.
अभ्यवहार-नित्य कर्म.
अव्हाटा-आडमार्ग.

अव्हासव्हा-स्वैर, इवेतसे
असकें-पूर्ण, सर्व
असगडे-असामान्य, अशक्य
असत-अस्थिर
असतेपण अस्तित्व
असभाड-बेसुमार, असभाव्य
असमसहास-अगणित
असमाई-न मावणारें
असग-सोप, सुगम
असलेलें-उसळलेलें
असवर न आवरणारा
असागड-निरुपम
असारणें-पसरणें
असिका-संपूर्ण
असलेपण-अस्तित्व
असोस-पुष्कळ, असतुष्टता
अस्करणें-तिरस्कारणें
अस्तवणें-मावळणें
अहमान-अहंकार
अहाळबहाळ-फार, अत्यंत
अहाळणें-पोळणें
अहेव-सुवासिनी
अलुमाळ-थोरवी
आइसी आई, लक्ष्मी
आकर-खाण
आकळण-व्यापण
आकळिया-प्रसार.
आकर-वैखरी
आकुळ-समुदाय
आखर-गुरें बसण्याची जागा

आखेलेंवे-आकडे माइन
आगदट-चळकट
आगमर-अगत्या जोर
आगरलें-टोंक
आगवठा-शरीरठेवण, मूर्ति
आगवण-पराक्रम
आगवणें-स्वाधीन होणें
आगवत-सामर्थ्य
आगवसा-ढगळा
आगवळा-मिळविलेला
आगघड-एकी, जूट
आगारा-री-अंकुर
आगिठा-ठी आगटी, विस्तव
आगियाळ-अग्निकुंड
आठी-आलिंगन
आडखिळा-प्रतिबंध
आडव-अडचण
आतुवट-अनरग
आदिवत-मिरासदार
आदिल-मूळचा
आनान-वेगवेगळें
आपसया-आपोआप
आउखा-शिलोडा
आवुला-नवरा
आवुली-नवरी
आयणी-चातुर्य
आरण-युद्धभूमि
आरव-अरण्य
आराक-समाधान
आरौतें-अलीकडे

गोडिरें–गोड
गोतांबील–एका ताटांत सर्वांनीं जेवणें.
गोरी–पारधी, पारध्याचें गाणें.
गोवारी–गुराखी.
गोसावी–मालक, स्वामी.
गौल्य–गोडी.
ग्राहकी–गिन्हाइकी.
ग्राहीक–गिन्हाईक.
घटा–समुदाय.
घणावणें–दृढ होणें.
घरटी–पहारा, गस्त.
घरडोळी–घराचा झाडा.
घराचार–प्रपंच.
घापें–घालवी.
घारणें–व्यापणें.
घुमरी–भर.
घेपणें–लिप्त होणें, वेढणें.
घेपें–घ्यावें.
चडकण–चापट, चपराक.
चंद्रामृत–सतरावी कला.
चवरें–शिलर.
चळिया–धारा
चांचर–बोचडी.
चांचू–चोंच.
चार्डें–वी पेरण्याकरितां पाभरीभर जें लाकडाचें पात्र असतें तें.
चावडी–गडबड.
चाळढाळ–हालचाल.
चिंतवणी–काळजी.
चित्रीव–चित्रांतील.
चीप–चांध, गळ्यांत कांहीं अडकतें तें.
चेइरें–जागृति.
चोखटीव–शुद्धपणा, स्वच्छपणा.
चोखडें–शुद्ध, उत्तम.
चोखी–शुद्धपणा, निर्मळपणा.
चोंढी–खोलपाणी, डोह.
चौवार–चव्हाटा.
जघन–पोटरी.
जन्मव्रती–जन्मभर आचरण करण्याचें व्रत घेतलें आहे असा.
जवट–जुळें.
जळपारधी–धीवर.
जळंबट–खांकरा, शळ, कफ.
जागोवा–जागरण.
जाणेंतान्हें–जाणतें नेणतें.
जावळी–भावंड, सोबती, शेजारचा
जिणी–जन्माची सफलता.
जिव्हार–जिव्हाळा.
झुंघाड–समूह.
झुंवार–द्यूतकर्म, जुगार.
जैत–जय.
जोहर–अग्निकुंड, लाक्षागृह.
झांवळें–अस्पष्ट.
टकळी–ध्यास, हांव.
टका–घोंस, अग्रभाग.
टांचें–कमी, अपुरें, अल्प.
टिट–पायाचा चवडा.
ठाकी–योग्यता.
ठाण–आकृति.

ठाणदिवी–ठाणवी, एके ठिकाणीच नेहमीं असणारा स्थानदीप.
ठायठिकें–स्थिर.
ठिकरी–चारिक तुकडा.
डगरु–प्रसिद्धि.
ढगळ–मोठें, बेढब.
डवरणें–मारणें, छिन्न करणें.
डाग–राख काठी.
डिरी–असुर.
डौर–उपहास.
ढिसाळ–समर्थ, मोठें.
तडावा–छत.
तणार–गवताची झोंपडी.
तरणि–तारून नेणारी.
तराटें–ताफा.
तलग–ल्हान लिंग.
तागा–ठाव ठकरण्याचा वेळ, आश्रय.
ताटी–कृपण.
तार–ज्योर, लवलवीत.
तिकटी–तीन कड्याची.
तिवनें–तीन पानी.
तुक–वचन.
तुपी–कमीपणा.
तुलगु–प्रतिध्वनि.
तुळी–गादी.
तूक–वजन.
तृणकुट–पेंढा.
त्रिशुद्धि–त्रिवार खरें, निश्चयपूर्वक, खरोखर.
थर–जाति.
थरा–प्रकार, योनी.
थाटी–समुदाय,
थेंकुटें–लहान.
दंटणें–मारणें, दडपणें.
दडगी–ततज्वाळा.
दंदिया–योद्धा.
दरकुट–दरी.
दशी–सुताची वात.
दळवाडें–समुदाय.
दाग–अरण्य,
दागाण–अरण्य.
दारवटेकर–द्वारपाळ.
दासिरू–घटिक.
दिठिवा–कृपादृष्टि.
दिया–दिवस.
दी–दिवस.
दुखड–दोन तुकडे झालेला.
दुचळवाडी- दारिद्र्य.
दुस–वस्त्र.
द्युति–सुवास.
देवढें–दीडपट.
देवागण–शपथ.
देवींकार–मराठी मापेच्या आकाराचे.
धट–ताजवा, तराजु.
धरवणी–साठवलेलें.
धर्मदिवी–धर्मार्थ लावलेला दिवा.
धवळार–चुनेगची घर.
धसाळ–दाडगा, अविचारी.
धाकड–धैर्यवान, मी मी म्हणणारा.

घागडी–व्यभिचारिणी, स्वैरस्त्री.
घाडसा–समजूतदार.
घानी–शहर.
घारें–कमी, कनिष्ठ.
घावा–संकटांत मदत.
धिंवसा–धैर्य.
धुमाड–धुमावूळ.
धुवारी–धूमाची आकुलता, वाफेची आकुलता.
धेंडा–ज्या दिवशीं वर वधूच्या घरा जातो त्या दिवशीं वधूवरास कुलदेवताचा आशीर्वाद मागण्यासाठीं वधू व वरास खांद्यावर घेऊन नाचणारा मनुष्य.
नरवी–गति, प्रवेश, टेंकण्यास आधार, आश्रय.
नटनाच–उत्कर्ष.
नवनिशात–नवीन धार लावलेलें.
नवसी–नवस करणारा.
नाकळणें–न आवरणें, न आटोपणें.
नागर–उत्तम, सुंदर, शहरांतील, चाणाक्ष.
नागा–देवी.
नागारी–गारुडी.
नागोवा–लूट.
नाट–ठिकाण, छंद.
नाथी–नाहीं.
नाह–हो–पति, नवरा.
निकण–दाणें येण्यापूर्वीचें कणीस.
निकसी–घासाघीस, निकीर.
निखळ–शुद्ध, संपूर्ण, केवळ.
निगावा–सुटण्याचा प्रकार.
निगुती–बरोबर, नेमकें, युक्ति.
निचाड–निरिच्छ.
निडळ–कपाळ.
निढार–पक्कदशा.
निदसुरें–अज्ञान, अज्ञानात्मक, निजलेला.
निपट–समूळ, पूर्ण.
निमटणें–नाहींसें होणें.
निमथा–शिखर.
नियोगी–अधिकारी.
निरत–तत्पर.
निरवडी–कुशलता.
निराळ–चढण्यास आधार मिळत नाहीं असें ठिकाण, आकाश.
निरुज–बरा, निरोगी.
निरुती–प्राप्ति, निर्णय, निश्चय.
निर्बुज–गोंधळलेलें, थक्क.
निर्वेच–अभिप्राय.
निशित–धार लावलेलें, तीक्ष्ण.
निष्टंक–अखंड, निश्चय.
निसिलें–पाजळलेलें.
नोकण–पराभव करणें.
पहघाणी–कळसाच्या बैठकीचा ओटा, थप्पड देणें, दावणें.
पडप–प्रतिष्ठा.
पडिभर–अतिशयपणा, अधिकता.
पढियता–आवडता.
पढियें–अत्यंत आवडतें.

पतिकर–अनुभव.
परवडी–प्रकार.
परावें–दुसऱ्याचें.
परिग्रही–कुटुंबवत्सल.
परिपाठ–अनुक्रम.
परिसर–सान्निध्य, जवळीक.
परौतें–पलीकडे.
पऱ्हा–पलीकडे, खाच, खळगा.
पवाड–अवकाश, विस्तार.
पसाय–प्रसाद.
पळणी–धावाधाव.
पाउटी–पायरी, दर्जा.
पाउड–पैसा
पाखरणें–उभारणें, तयार करणें
पाखाळ–शुद्धता.
पागोरा–टोंक, बारीक मूळ
पाचही पालव–पंचप्राणसुद्धां
पाटीं बैसणें–अधिकार. अथवा
स्थान स्वीकारणें
पाठार–आश्रय, वाहन
पाढाऊ–वाटाडा.
पाणिढाळ–ओहोटीचें पाणी.
पाणियाडें–तळें
पाती–पगन.
पापरी–लाथ
पारी–धान्यावर पडणारी कीड.
पालाणणें–खोगीर ठेवणें–घालणें.
पालिंगन–समुदाय.
पालेखाईर–पाले खाणारा.
पाहलें–उजाडलें.
पाहाती–उजाडती.
पाहुणेर–पाहुणचार.
पिचडी–थुंकीची पिचकारी.
पुल्कि–कण, बिंदु.
पुण्गड–मोठा ताठा.
पुसी–प्रश्न
पेटा–बाजार.
पैठें–स्थिर, स्थापित.
पैसार–प्रशस्त रस्ता.
पोवळी–आवार.
प्रतिज्ञा–पैज
प्राणितापढाळू–प्राण्यास त्रास
देण्यासारखें झोंकाचें बोलणें.
प्रेमटागा–ज्याचें प्रेम गुतलें आहे असा
फरकणें–उभारणें
फाक–विस्तार.
फाडोवाड–स्पष्टता, वेगळेपणा
फुणगा–ठिणगी
फुन–गर्व
फुली–अवस्था, दर्जा.
बडगा–व्यर्थ गवगवा.
बनकर–माळी.
बबाळ–मोठा आवाज
बरवट–उत्तम
बरळ–असंबद्ध
बहुडा–वर्षाव
बहुवस–फार.
बळिया–बळकट
बाइणी–वायदा
बागडें–सोंग, चेष्टा

बापिक–कुळांतील.
बांवळ–वृद्धि, आधिक्य.
बासुळी–गोंडाळ, शेवाळ.
बारी–छन.
बासट–काळकूट.
बिक–मळ.
बिढार–जागा, घर.
बिवड–खत मुरून उत्तम पीक देणारी झालेली जमीन.
बीक–अधिकार.
बीजें–आगमन.
बुजावणी–समजूत, एकवाक्यता.
बुथी–आवरण, खोळ.
बुरु–कृतघ्न मनुष्य.
बेगें–खिडकी, द्वार.
बेंच–पानांत कुटलेलें पान.
बेधु–दांडगा, आडदांड.
बैंचळ–निर्जीव, ढिला.
बोचरा–दांतरहित.
बोट–डाग.
बोनें–पक्कान्न, जेवण.
बोबाणें–बडबड करणें.
बोहणी–आरंभ.
बोहरी–चणचा.
बोळावा–मुक्कामापर्यंत पोंचवणारा सोबती.
भगी–रीत, स्थिति.
भडसें–उदय.
भरण–आयुष्य.
भरादा–पोसावरी.
भरोवरी–सामुग्री.
भवरु–भुगा.
भाक–शपथ.
भागा फिटणें–धांव्याला येणें.
भागीन–भागीदार.
भाटिव–स्तुति.
भाणें–ताट, पात्र.
भांती–प्रकार.
भादी–चांगली.
भारणी–भुरळ पाडणारा मंत्र.
भिंगार–कंदील, भिंगाचें घर.
भीतर–आंत.
भुकाळ–हपापलेला.
भुतणें–घेरणें, व्यापणें.
भूतला–स्वाधीन झाला, भुलला.
भूतोंडी–भुताला टाकलेला बळी.
भेंऊरें–भय.
भेसक–मिश्रित.
भोसका–मेलेल्या जनावराचा आंतील भाग काढून त्यांत गवत वगैरे घालून तयार केलेला आकार.
भोंमळ–कर्णा.
भोंवरी–घुगडी.
मढ–कलिका, कळी, कोठडी.
मणिज–अंड्यापासून झालेलें.
मथित–लोणी.
मदवी–कोरें वस्त्र.
मरगज–पाच (एक प्रकारचें रत्न)
मवणी–मोज, माप.
मवणें–मोजणें, लिहून ठेवणें.

मैसरें–अंधार, काळोख
महुर–मधुर, गाड
मा–ना ( प्रश्नार्थक )
मागळी–मुजात बांधली जाणारी मोळाची दोरी
माजवण–कैफ आणणारा अथवा मादक पदार्थ
मानिठें–वस्त्र
माजिवटा–गुगी, वस्त्र
माणिगुली–माणिक
मायुला–रवा ( घुसळण्याची )
मादळ–ढाल
मादी–समुदाय
मादियाळी–समुदाय
मादुरी–तबेला ठेवणारा
मार्ले–राख, काकवी
मार्ले मागण–गळ्यात नागर बांधून कंपेडीची भिक्षा मागणें
माव–माया
माहेवणी–गरोदर स्त्री
माळादड–फुलाचे हार
मालिया–आडव्या पाया
मिठारा–गाडी
मिडगण–स्तुति
मिणधी–आराळी, कपटी
मुग–मौन
मुडा–बीजाचें साठवण
मुंकुट–चिलट
मुस येण–रूपाला येणें
मूळान–परवानगीचा दाखला
मूळवणें–समूळ उच्चाटन होणें
मूळद्वारी–आमंत्रण
मेचु–आवड
मेर–वेळ
मेहुडे–ढग
मैळ–अशुद्ध अमंगळ
मोकरणें–घालवणें, मोकलें सोडणें
मोकळवादी–मोकळीक,निराश स्थिति
मोगर–पायदळ
मोटक–नेमक, अस्स
मोड–आकार
मोदळा–चिखलाचा गोळा
मोहर–मार्ग, रस्ता
मौळ–शिखर
मौळा–काटा
म्हणिये–आज्ञा, म्हणतात
यावा–ओघ, प्राप्ति
यउतें–येवढसें येवढ
येकवटें–एकत्र
येकवळा–सागड, एकत्रता
येर–हा जवळचा
येरीमोहर–दोंडा खालीं व घूड वर असें.
रगाथिल–रगाविलेलें
रजतवर्णा–चांदीचा मुलामा
रघन–शिजवणें
रवा–लगड, खडा
रससोय–पक्वान्न
रहवर–उत्तम रथ

रळी–विनोद.
राऊळ–देव.
राजबिदी–राजमार्ग.
राजवाद्य–राजाचा वाद्य.
राजागर–राजाचा बगीचा.
राजावळ–राजमुद्रा.
राबणी–पहारा, चाकरी.
राबणें–रग देणें.
रासिवा–रास.
राहावणें–छपवणें, रासून ठेवणें.
रिगिनिगी–ये-जा.
रिचविणें–ओतणें, रिकामें करणें.
रिणाईत–सावकार.
रुच्च–रुचकर.
रुपटें–मूर्ति.
रूपस–सुंदर, रूपवान.
रेंव–गाळ.
रूपीयपी–रूपडाव.
रुवघा–दाह.
लवडसवडी–लगबग, उत्कंठा.
लळेया–हट्ट घेणारा.
लाकण–बंधन.
लागट–उत्सुक.
लागतें–संबंध.
लागवेग–त्वरा.
लागसर–जवळीक.
लाठेपणा–पराक्रम
लाडेजणें–लडिवाळपणा करणें.
लाणी–आश्रम, स्थान.
लालस–तत्पर, उत्सुक.
लावणें–हाकलून देणें.
लासी–माजरी.
लाहणा–मिळणारा.
लिगटणें–चिकटणें.
लिहिली–सनदा.
लुती–कोड, कुष्ट, लूत.
लेंडी–ओहोळ.
लोथ–मोट, गाठोडें.
वग–कल्क, मळ.
वज्रागी–चिलखत.
वज्राग्नि–विजेचा अग्नि.
वडप–वृष्टि.
वरकल–कसवटी.
वरगण–वाटणी.
वरचिल–वर सांगितलेलें.
वरपडा–पात्र, योग्य.
वरयितु–नवरा.
वरिपडणें–प्राप्त होणें.
वरैत–वरणारा.
वरो–पोटगी.
वरौता–वर.
वसौटा–आश्रयस्थान.
वस्तीकर–वाटसरू.
वहाणधर–जोडे उचलणारा.
वहिलें–लवकर.
वळ–मुद्रा, शिक्का.
वळी–घुमट.
वाउधाण–वावटळ, वादळ.
वाऊर–अनुचित, वाईट.
वाखती–छातीचा सळ्या, चिंता.

वागोरा–लगाम
वाजट–व्यर्थ.
वाझोळ–वाझ, फूल.
वाटवधा–वाटमारा.
वाटावो–उणीव.
वाटीव–पुरुषार्थ, पराक्रम.
वाडपण–विस्तार, मोठेपणा.
वाणें–प्रकार.
वाणेपण–कमतरता
वाद्वळू–तट्यास उत्तेजन देणें.
वाधावा–वर्धावा.
वानवसें–माजघर.
वानी–कमीपणा, उणीव.
वायफाड–निष्फळ बाण.
वारती–शिडी.
वारिकें–वाहन
वारेलग–वाऱ्याच्या वेगात सापडलेलें.
वाल्लभ–प्रेम.
वाल्हीदुल्ही–नवानवसाची, लाडकी
वावटणें–विश्राति घेणें.
वास–वाट, मार्ग.
वासिप–भय
वाहणी–पद्धत.
वाहतवणा–रानातून चालणारा प्रवासी.
वाहर–पीडा
वाहवट–मार्ग.
वाळगें–चुकवणें.
विताळ–मोठ्या टाळूची.
विदळ–हिणकस धातु
विंदाण–निग्रह, वेध.
विंदाणी–कारागीर.
विनट–खेळगडी.
विपाइले–थोडे.
विपायिला–एखादा.
विपायें–कदाचित्.
विपाव–कचित् घडून येणारा योग, मेळ.
विरु–वाकडेपणा, विरुद्ध.
विलग–उपद्रव.
विवळ–स्पष्ट.
विसगुसणें–कासावीस होणें, गोंधळणें.
विसचणें–बिघडणें.
विसवणें–विश्रांतिस्थान.
विसुरा–आश्चर्य
विसुरें–समुदाय.
विहिरा–विहीर
विहीन–रहित, शिवाय.
विळ–एक दिवस
वेलासें–विरुद्ध
वेंगडी–तिडा, पायात पाय अडकणें.
वेठणें–मूर्त होणें, आकाराला येणें.
वेलाडी–विस्तार.
वेव्हारा–सावकार.
वेळाउळ–मदिर.
वैरण–वस्त्र विणताना घातलेला आडवा दोरा.
वोडरणें–ठेवणें, पुढें करणें.
वोलटें–वाईट
वोगर–पक्वान्नाची वाढ, वाढलेलें अन्न.
वोज–रीत, व्यवस्था, मार्ग.

वोटंगणें-अवलंबून राहाणें, आश्रय करणें.
वोडण-ढाल, आडपडदा.
वोडमरी-गारुडी विद्या.
वोडव-योग्यता, आदर, सत्कार.
वोढी-त्रास, ट्याई.
वोतपली-कोवळें ऊन.
वोथंबा-वोळंबा, आश्रय देण्याचा खांब.
वोथिजणें-पातळ करणें.
वोपणें-वाढणें, देणें, विकणें.
वोमाण-पूर, वेग.
वोमथणें-लाजणें.
वोरप-ओरखडा.
वोरबारा-व्यवहार, खटपट.
वोरस-पान्हा, प्रेम.
वोल-तारण, जमीन, ओलावा.
वोवरी-खोली
वोसणता-बरळणारा
वोसर-कमताई, न्यूनता.
वोसें-न्यूनता
वोहट-उतार, कमीपणा.
वोहर-नवरानवरी, वधूवर.
वोळग-सेवा.
शतखूट-शंकडों तुकडे.
शराव-परळ.
शिराणी-महत्त्व.
शिराणी-आवड.
शेज भरणें-सागड घालणें.
शेजिया-जवळच्या.

श्यातुक-शमर भार.
श्रीमाठ-अहंकार अभिमान.
सकल्ठी-एकत्र, सरसकट.
सचक-पैसा साठवणारा, चिक्कू.
सचलें-चललेलें.
सजनपण-मित्रत्वाचें नातं.
सजोडा- ( घोडे ) जोडलेला.
सणाणा-तीक्ष्ण.
सत्यधूत-सत्यानें पवित्र झालेलें.
सत्राण-घोर, भयंकर, जोरानें.
सदट-दाट, बळकट.
सधर-बलवान्, धैर्यवान्.
सनागर-अतिशय चांगलें.
सनोळख-ओळखीचे.
सपाई-( सपाई ) सर्वथैव.
समर्थ-स्वस्त.
समात-मावणारा.
समिननिमिन-समविषमें.
सरकटित-रगडित.
सरळी-मोकळीक.
सरोभरी-भर, जोर.
सवगण-काढणी.
सवचोर-सभ्य दिसणारा चोर.
सवतुकी-सारख्या वजनाचे.
सौंदणी-परटाचें कपडे धुण्याचे भाडें.
सवळें-पहाटे, प्रातःकाळीं.
सवा-बाजू, इच्छा.
सवेसा-स्वेच्छा.
सरांटी-बरोबरी, योग्यता.
सळ-भग, छळणारा, द्वेष, उसळी.

साइतडें–बाहुली. ( लाकडाची )
साउमा–समोर, प्रत्यक्ष.
साउळ–पादरेपणा.
सार्के–डाकलग, हिणकस.
सागडें–सारखें.
सागळा–शारी धरणारा शागीर्द.
साचल–आवाज.
साजवणी–धार काढण्याचें पात्र
साजा–प्रसन्न, पूर्ण भरलेला.
साटी–बरोबरी, मोबदला.
साटोपा–कोठार.
साटेशाटी–मोबदला.
साडोवा–उतारा.
सात–बाजार.
सातरें–( सातरी ) सात दिवस.
साता–बरोबर, लगेच.
सानिव–लहान.
सार्प–साप्रत.
सार्मेरें–सडा, समार्जन
साबळ–पहार.
सामान्या–वेश्या.
सारग–भुगा
सारोख–( सरोख ) जोरानें.
सावायो–मदत.
सावेव–मूर्तमंत.
सिनानें–भिन्न, वेगळें
सियारी–डाकीण.
सिराणी–आवड
सीनसाळ–जीर्ण सालीचा
सुआर–स्वयंपाक करणारा.
सुगरवा–थाटमाट.
सुझणें–कळणें, समजणें.
सुटिका–वर्षाव, वृष्टि, मोकळीक.
सुटी–वृष्टि
सुडावणी–मुकता.
सुणा–व्यर्थ
सुणें–कुत्रें.
सुनाटें–व्यर्थ.
सुर्मे–पडला, घालतो.
सुयाणें–सुकाळ
सुरगी–सुतार.
सुद्दावणें–तयार करणें, सेवन करविणें.
सुहावा–मधुर, सुशोभित.
सूचणी–इशारा
सूती–अभिमान
से–अनुमान, हेतु, आठवण.
सेजसाळी–दाण्याग्रह
सेवडी–कातडें.
सैंध–जिकडेतिकडे, सर्वकडे
सोडवणी–ओळवा
सोपारें–सोपें, वश, स्वाधीन
सोयचुकी–मार्ग सोडून
सोवाणी–पायऱ्या.
हाटिया–हटयोगी.
हडप–पानदान, विडा देणें.
हडौती–गळ्याखालची, हाडामधील खळगी
हतिवा–काडवात.
हरळ–दगड
हल्लर–गाणें.

हवाव–रंग, शोभा.

हाडखाइर–हाडवैर.

हाततुक–हातानें वजन करणें, अनुमान, अटकळ.

हातचोर्नें–हातात घेतलेला नैवेद्य.

हातवटी–युक्ति, हातोटी.

हातोफळी ( हातफळी )–पैज, हातावर हात मारणें

हारवी–पराभव पावणारा.

हारि–अपजय, तोटा.

हाला–मारलें असता.

हियें–छाती, हृदय

हिवळी–थंडी.

हुडा–बुरूज.

हुरडा–होरपळा

हेंदरा–घाणेरडा.

हेला–क्षण, वेळ.

होड–पैज.

# विवेचन

— o —

## ( १ ) ज्ञानेश्वरांची महात्मता

महाकवि श्रीज्ञानेश्वरमहाराज याच्याविषयी ' ज्ञानेश्वरदर्शन ' हा प्रचड लेख सग्रह प्रसिद्ध झाल्यामुळे, त्याच्या सबधान लिहिण्यासारख जें काहीं आहे तें सर्व त्यात लिहून झालेलच आहे पुढिलानीं मागच्यांचें ऋण असेंच फेडलें पाहिजे किंबहुना तें ऋण एकच वेळ फेडून भागणारें नसून अनेक वेळ मधून मधून फेडलें तरीहि तें योग्यच होईल आर्थिक ऋणें फार तर सव्याज एक वेळ फिटल्यानें ऋणमुक्तता होते पण उज्ज्वल ज्ञानरूपी ऋणाची गोष्ट तशी नाहीं तें कितीहि पटीनें फेडलें तरी शिल्लकच उरतें. सुमार साडेसहाशें वर्षांचा काळ लोटला तरी ज्या ग्रथाचें विभूतिमत्व पहिल्या दिवसासारखें आजहि प्रतीत होतें त्याचें वर्णन कोण किती करणार ! कारण रेडियमच्या कणाप्रमाण ह विभूतिमत्व अखड, अनत स्फुरणशाली आहे, आणि द्रौपदीच्या दिव्य स्थाली प्रमाणें कधीं न सपणारा अमृतप्रसाद ओपणारेंहि आहे त्यामुळे त्याजकडे पुन पुन धाव घेऊन कृतार्थ व्हावें असें कोणालाहि सहज वाटत

जगात वस्तुमापनाचीं चार प्रमाणें मानतात लाबी, रुदी, उची व काल स्थिति पहिलीं तीन जुनीं असल्यामुळे लोकाच्या तोडपाठ आहेत पण चवथें हें आधुनिक तत्त्ववेत्त्यानीं ठरविलें आहे ज्ञानेश्वरमहाराजाच महत्त्व या चारहि प्रमाणानीं मोजलें असता तें इतके भारी ठरत का, ज्ञानेश्वरीला खऱ्या अर्थानें मराठींतील ' ग्रथराज ' म्हटल्यास त्यात अतिशयोक्ति होणार नाहीं तत्त्वज्ञान दृष्टीनें उत्कृष्ट अद्वैतवेदाती, धर्मनिष्ठेन महान् भगवत्भक्त, वाङ्मयदृष्टीनें अत्यंत श्रेष्ठ कवि, आणि समकालीन सस्कृतीच्या दृष्टीनें अत्यत जाडे विद्वान्–अशा चार प्रमाणानीं श्रीज्ञानेश्वरमहाराजाचें महत्त्व वर्णिता येत महानुभावी ग्रथ कारापैकीं एखादा कवि बरा आहे तथापि, त्या कवितेंत रसाळ पण मोळें चरित्रवर्णनच असतें, तत्त्वज्ञान काहींच नसतें श्रीएकनाथाच्या पद्यग्रथात थाट आहे तो हरिदास–पुराणिकी आहे तुकारामात भक्तिरस ओथबलेला आढळतो, आणि मधूनमधून त्याच्या तोंडातून प्रसादयुक्त स्फूर्तीच्या जणू काहीं ठिणग्याच पडतात पण तुकारामाच्या अभगात व्यापक, विस्तृत असें तत्त्वज्ञान नाहीं !

तुकारामांत पढिकरणाची मुळींच ओळख नाहीं ती श्रीरामदासांत कांहीं किंचित् दिसते. पण समर्थांचा विद्वत्तेचा डौल एकंदरीनें फिकाच पडतो ! त्यांनीं चौरंगी तत्त्वज्ञान समजून मांडण्याचा प्रयत्न केला आहे, परंतु कांहीं एका लहान मर्यादेपलीकडे त्यांची तत्त्वदृष्टि प्रवेश करूं शकली नाहीं. आणि खऱ्या काव्य-गुणांत तर ते फारच कमी पडतात. पण श्रीज्ञानेश्वर हे एकच असे वाटतात कीं, त्यांच्यामध्यें वरील अनेक एकांगी संतकवींचीं न्यूनें भरून निघालेलीं असून, त्यांचा काव्यगुण इतर कोणाहिपेक्षां अधिक श्रेष्ठ ठरतो. आणि इतर संतकवींना जी साधकत्वाची भूमिका लाभलेली आहे ती तर ज्ञानेश्वरांना आहेच आहे.

तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें ज्ञानेश्वरीमध्यें शांकरमताचें अद्वैतप्रतिपादन सिद्धांत-रूपानें आहे. तथापि साधनरूपानें उपासनेचें महत्त्व श्रीज्ञानदेव हे वर्णन करूं लागले म्हणजे शेवटीं असाहि भास होतो कीं, यांचें अद्वैत इवेंत तरंगत असतां यांचे पाय द्वैताच्या भूमिकेंत रुतलेले असून, " तूं—मीपणाचें " ऐश्वर्य त्यांनीं जितकें सजविलें आहे तितकें एका भक्तराज तुकारामाखेरीज दुसऱ्या कोणींहि सजविलेलें नाहीं. ज्ञान व भक्ति यांचें हें मिश्रण ज्ञानेश्वरांच्या गीतानुसारित्वा-मुळें ओघानेंच प्राप्त झालेलें आहे. परंतु त्यांचें स्वतंत्र केवळ तत्त्वज्ञानविषयक मत, म्हणजे अद्वैत मत, त्यांचा जो स्वतंत्र ग्रंथ "अमृतानुभव" किंवा " अनुभवामृत " या नांवाचा आहे त्यांत दिसून येतें. ज्ञानेश्वरी ही टीका आहे, व टीकेच्या पद्धतीनें म्हणजे आईबापांबरोबर सहल करण्यास गेलेल्या लहान मुलीप्रमाणें, ती क्षणभर दूर जाऊन, आगेमागें राहून, स्वतंत्रपणें खेळेल बागडेल; परंतु टिपणाटिपणांना परत येऊन त्यांचा हात धरील व अशा परतंत्र सौख्यानें आक्रमण करील.

तत्त्वज्ञान हें वेगळें आणि व्यक्तिविषयक धर्माचरण हें वेगळें. ही गोष्ट या देशां-तच काय, पण इतर कोणत्याहि देशांत साधुसंतांनीं व तत्त्ववेत्त्यांनीं सिद्ध केलेली आहे. अद्वैत हें ज्ञान आहे पण द्वैत हा अनुभव आहे. अंतिम स्वरूपांत दोहोंचा मेळ पडला तरी विशिष्ट स्थितींत जीवात्मा हा स्वतंत्र वृत्तीचाच अनुभव घेतो यांत शंका नाहीं. मीपण हें तूंपणाच्या अज्ञानाचें फल नव्हे, तर मीपणा व तूंपणा या दोन वस्तु वेगळ्या मानल्यानेंच त्यांचें संबंधदर्शन हें खरें ज्ञान ठरतें. नुसता मीपणा हें अज्ञान असलें तरी नुसता तूंपणा हेंहि खरें ज्ञान नव्हे. म्हणूनच श्री. शंकराचार्यांसारखे कट्टे अद्वैती यांनीं उपकरणें मांडून ईश्वरोपासना केली व देवदेवतांचीं स्तोत्रें रचलीं. तीच गोष्ट ज्ञानेश्वरांचीहि होय.

ज्ञानेश्वराचें चरित्र अल्पवयातच सपलें. त्यातला अखेरचा बराच काळ ग्रथ निर्मितीकडे गेला. पूर्व वयातील थोड्या काळातच त्याना विद्यार्जन करता आलें असावें. पण तेवढ्या काळात त्यानीं बरेचसें अध्ययन केलें असें दिसतें साप्रदायिक दृष्टीनें त्यांचा गुरु कोणीहि असला तरी जो जो निश्चित व वेगळें ज्ञान देतो तो तो गुरुच. या दृष्टीने पाहता ज्ञानेश्वराचे अनेक गुरु होते असेंच म्हणावें लागतें. म्हणून त्याची विद्वत्ता विविध आहे.

विद्वत्ता हा शब्द सापेक्ष आहे. उदाहरणार्थ, आजच्या महाराष्ट्रीय विद्वानाच्या विद्वत्तेचे विषय व क्षेत्रमर्यादा हीं दोनहि सहासातशें वर्षांपूर्वींच्या विषयाच्या व क्षेत्रविस्ताराच्या तुलनेनें फारच अधिक ठरतील यात शका नाहीं. पण कोण त्याहि मनुष्याची विद्वत्ता ठरविताना दोनतीन गोष्टी पाहाव्या लागतात. आधीं त्या काळीं जाणण्यासारखें, शिकण्यासारखें असें काय काय होतें ? तें जाणण्याचीं व शिकण्याचीं साधनें काय होतीं ? त्या साधनाचा विशिष्ट मनुष्यानें जास्तींत जास्त किती उपयोग केला ? म्हणजे त्यानें त्या साधनानीं जास्तींत जास्त किती विद्या सपादिली ? यानतर विचार हा कीं, तें ज्ञान त्यानें स्वत च्या विवेक शक्तीनें कितपत पचविलें, आणि पुढील पिढ्याना उपयोगी पडेल अशी त्या ज्ञानाची माडणी त्यानें कितपत केली ? त्यात स्वत ची नवी भर कितपत घातली ? इतक्या दृष्टीनें विचार केला म्हणजे कोणाच्याहि विद्वत्तेविषयीं तो पुरा झाला.

ही दृष्टि ज्ञानेश्वराना लावली असता असें दिसतें कीं, तत्कालीन विद्वानामध्यें त्याचें स्थान फारच वर असावें. ज्ञानेश्वरी वाचताना तिच्या कर्त्याच्या बहुश्रुत पणाचीं गमकें एकसारखीं आढळत जातात. एखाद्या आकरग्रथावर टीका लिहिणें ही उद्यी विद्वत्ता होय असें मानण्याचा प्रघात आधुनिक युगात आहे. परतु जुन्या युगात तो कमीपणा मानीत नसत. अजूनहि विद्वान् व्याख्याते, धर्मोपदेशक, प्रवचनकार, कीर्तनकार हे बहुधा आपलें सर्व भाषण स्वतत्र स्फूर्तीनें करतात तरी त्याला मूलाधार म्हणून काहा तरी एखादें वाक्य सूत्र म्हणून घेण्यात त्याना कमीपणा वाटत नाही. उलट त्यात त्याचा विनयच दिसून येतो. पुढिलानीं वृक्ष बनवावा पण वृक्षमूल मागिलाचें घ्यावें हा सस्कृतीच्या प्रगतीचा ठरावक दडक आहे. त्यामुळे विद्वत्तेला खरोखर उष्टेपणा येत नाहीं. शिवाय कोणीं टीका किंवा भाष्य लिहिलें तरी तें कशावर लिहिलें यावरूनहि मनुष्याच्या विद्वत्तेची परीक्षा होते

या परीक्षेवरूनच श्रीशंकराचार्यांपासून चालू शतकातील लो. टिळकांपर्यंत गीताभाष्य लिहिणें हें उच्चतम विद्वत्तेचें लक्षण मानलें गेलें आहे. या दोन टीकांच्या मध्यकालावर श्रीज्ञानेश्वर हे येतात, यावरून विद्वत्ता कशी पारखावी या विषयींच्या कल्पनेचें बारा शतकांतील गमक सिद्ध होतें.

तत्त्वज्ञानी, भक्त व विद्वान् अशा रीतीनं श्रीज्ञानेश्वरांचें महत्त्व सांगितल्यावर कवि या दृष्टीनें त्यांचा विचार करावयाचा. या बाजूचें त्यांचें महत्त्व तर वरील तीनहि मुद्यांपेक्षा अधिक निर्विवाद आहे. मानभावी ग्रंथांची व ज्ञानेश्वरीची तुलना केली तर ज्ञानेश्वरी श्रेष्ठ ठरेलच, परंतु आजच्या ताज्या विसाव्या शतकातहि कवित्वाच्या दृष्टीनें ज्ञानेश्वरीच अजिंक्यपत्र मिळवील यांत शंका नाहीं. आणि तेंहि फिरून द. म. प. पांगारकर यांच्या काव्याच्या भोळ्या व्याख्ये प्रमाणें नव्हे. म्हणजे 'ज्यांत भक्तिरस आहे तेंच काव्य' या व्याख्येप्रमाणें नव्हे, तर आधुनिकांतल्या आधुनिक साहित्याचार्यांच्या व्याख्येप्रमाणें. उपमा व दृष्टांत यांत श्रीज्ञानेश्वरांचा हात धरणारा कवि मराठींत झालाच नाहीं असें म्हणता येईल.

पण ज्ञानेश्वरासंबंधानें मला एक गोष्ट विशेष कौतुकाची वाटते ती ही कीं, इंग्रजींत ज्याला "टर्सनेस" म्हणजे अतिशय थोड्या शब्दांत अतिशय पुष्कळ सांगण्याची कला, ती ज्ञानेश्वराइतकी प्राचीन किंवा अर्वाचीन भाषाप्रभूंत आढळत नाहीं. हवी तितकी ऐसपैस जागा घेऊन, पाल्हाळ करून, उपमा सांग सजवून, विषय समजून सांगणें हें काम सोपं आहे. अर्थात् उपमा स्वतः चांगली असूनहि, पण प्राचीन वैयाकरण हे सूत्रांतील एक अक्षर कमी करता आलें तरी पुत्रलाभ मानीत त्याच प्रकारानें, ज्ञानेश्वर आपल्या वाक्प्रबंधांत मित व्ययानें वांचवलेल्या शब्दागणिक पुनर्लाभ मानीत असावेत असें वाटतें. त्यांतल्या त्यांत माझ्या मतें हा या कवीचा गुण ज्ञानेश्वरीपेक्षा "अमृतानुभवांत" अधिक दिसतो. भूमीला स्वतःचें अंग जेवढ्या जागेंत चिकटलेलें आहे तेवढ्यांतच आपल्याभोंवतीं पूर्ण प्रदक्षिणा करणें ही चतुराई मानतात. लष्करी शिपायी टांचेच्या आधारावर ही प्रदक्षिणा पुरी करतात. पण मोटारीला भूमिगत जागेंत आपल्या भोंवतीं प्रदक्षिणा करता येत नाहीं. श्रीज्ञानेश्वर यांची थोड्या शब्दांत अर्थविस्तार करण्याची शैली पहिल्या प्रकारची आहे. विस्तार होईल म्हणून मी उदाहरणें देत नाहीं. पण आधुनिक कवींनीं अमृतानुभवांतील ओव्या सारख्या अगदीं थोडक्या शब्दांत त्यांतल्या कल्पनांसारख्या सुंदर कल्पना

िहून दाखवाव्या अशी आज कोणी वर्षांपासून पैज मारली तरी ती पुरी जाणार नाही अशा अनेक दृष्टींनी श्रीज्ञानेश्वराच्या प्रभावविषयी गुणग्राही मुद्दाम लिहिता येईल

काही ठिकाणी असे मानले गेले आहे की, श्रीयाज्ञवल्क्य हे ऋषि आणि श्रीज्ञानेश्वर हे सतकविवर्य, हे दोन महापुरुष शुक्लयजुर्वेदीय ब्राह्मण समाजात जन्मले या समजुतीमुळे त्या वैदिकशाखीय समाजाला स्वतविषयी धन्यता वाटावी हे सर्वथैव योग्यच आहे तथापि जन्माने या दोन विभूति एका विशिष्ट ब्राह्मणवर्गाच्या असल्या तरी, त्यातील एका विभूतीने स्वत च्या कार्याने चवथ्या वर्णाची, म्हणजे सेवा हाच ज्याचा धर्म (!) त्या वर्णाची, एवढी मोठी सेवा केली आहे की, ब्राह्मणवर्गापेक्षाहि शूद्रवर्गालाच ज्ञानेश्वरमहाराज हे एकमेव आपलेच धन वाटावे

ज्ञानेश्वराविषयींची आदरबुद्धि लोकात अनेक रीतींनी प्रकट होताना दिसते. वारकरी लोक ज्ञानेश्वरीला 'आई' म्हणतात, ती डोक्यावर धरून आदरितात, तिजवर गधफुले वाहून पूजा करतात साम्प्रदायिकाची भक्ति आणखी एका वेगळ्या रीतीने प्रकट होते ती अशी की, ज्ञानेश्वरीविषयी ते जाज्वल्य शब्द प्रामाण्य ठेवतात इतकेच नव्हे, तर आपल्या परंपरेत चालत आलेला एखादा अपपाठ किंवा शुद्धपाठाचा विपरीत शब्दार्थ, शेकडो वर्षे चालत आला आहे तोच ते प्रमाण मानतात दुसरा पाठ किंवा अर्थ युक्तिसिद्ध असला तरीहि ते स्वीकारीत नाहीत पढिकांचा वर्ग तिसरा ते पहिल्या वर्गाइतके भाविक किंवा दुसऱ्या इतके हट्टवादी नसतात परतु ज्ञानेश्वरीची गोडी त्याना सतकाव्य या नात्यानेच इतकी लागलेली असते की, त्या ग्रथातील अध्यायच अध्यायहि ते तोंडपाठ म्हणतात आणि ते म्हणताना त्यातील अध्यात्म व काव्य याच्या रसाळपणाचे सेवन करण्याच्या आनदात गर्क असतात

*वरील तीनहि वर्गात पडणारा मी स्वत नाही माझे सत्य वर्णन असे की,* वाङ्मय व तत्त्वज्ञान याच्या लोभाने किंवा इतर विशिष्ट हेतूने ज्ञानेश्वरी मीहि वाचली आहे आणि ज्ञानेश्वरीचे सर्वांगीण श्रेष्ठत्व मला पूर्णपण पटलेल आहे

ज्ञानेश्वराचे नाव निघाले की प्रथमच काही वाद डोळ्यापुढे येतात उदाहरणार्थ, ज्ञानेश्वर एक की दोन ? अभगकर्ते व ज्ञानेश्वरीकर्ते हे एकच आहेत काय ? ज्ञानेश्वर हे पढरीच्या विठोबाचे भक्त होते की नाही ? ज्ञानेश्वर हे अद्वैती की द्वैती ? इत्यादि मी या वादाना महत्त्व देत नाही माझ्या मते—

१– ज्ञानेश्वर पूर्ण अद्वैतवादी होते. द्वैतवादाचा उल्लेख ज्ञानेश्वरींत असला तरी त्याचा स्वीकार नाहीं. अद्वैत उपदेशिणाऱ्या श्रीकृष्णानींच स्वतः गीतेच्या शेवटीं अर्जुनाला द्वैतावर आणून सोडलें. तीच गोष्ट ज्ञानेश्वरानांहि आपल्या भावार्थ-दीपिकेंत सांगावी लागली. स्वतंत्र अशा अमृतानुभवात द्वैताचा मागमूसहि नाहीं. २–ज्ञानेश्वर अद्वैतवादी असतांहि भक्त होते. ज्ञानी भक्त असें त्याना म्हणता येईल. ३–तथापि ज्ञानेश्वरींत त्यांनीं उपास्य या नात्यानें कोणत्याहि देवदेवतेविषयीं–शंकराविषयींहि–पक्षपात दर्शविलेला नाहीं. ते नाथपंथी असल्या-मुळें त्यांची उपास्य देवता गुरु हीच असावी. ४–ज्ञानेश्वर हे पंढरपूरच्या विठोबाला आपली ' उपास्य देवता ' मानीत होतेसें वाटत नाहीं. मात्र ज्ञाने-श्वरींत पंढरीचा उल्लेख प्रत्यक्ष नांवानें नसला तरी कांहीं ओव्यांवरून पाहतां तें वर्णन पंढरीला लागतें हा युक्तिवाद मार्मिक वाटतो. अठराव्या अध्यायात–" एक प्रदक्षिणा जपाचिया । बाहेरूनी करिती या । एक हे श्रवणभिंपें छाया । सेविती यवाची ॥ एक ते अवधानाचा पुरा । विडा पाऊड भीतरा । घेउनी रिघती गाभारा । अर्थज्ञानाच्या ॥ ते निजबोधें उराउरीं । भेटती आत्मया श्रीहरी । परी मोक्ष प्रसादी सरी । सर्वांहि आर्धीं " ॥ गीतारूपी वैष्णवमंदिराचें हें वर्णन पंढरपूरच्या विठ्ठलमंदिराला साजेसेंच आहे. देवाशीं 'उराउरी' भेट ही पंढरपुरांतच घडते म्हणतात. पण याहिपेक्षां माझें स्वत:चें एक वेगळें कारण असें की, ज्ञानेश्वराचे वडील विठ्ठलपंत व आई रुक्मिणीबाई हीं नांवें काय दर्शवितात ? ५–तथापि ज्ञानेश्वरांच्या नांवावर प्रसिद्ध असलेले अभंग ज्ञानेश्वरी-कर्त्या ज्ञानदेवाचेच आहेत कीं नाहींत याविषयीं मात्र माझें मन निःशंक नाहीं. एक तर अभंगादिकांचीं बाडें संशोधन न करता जशींच्या तशीं आपल्या इकडे छापलीं जातात. त्यामुळें ज्ञानेश्वरानींहि कांहीं अभंग रचले असल्यास ते नक्की हुडकून काढणें कठीण. आजाचें नाव नातवालाहि ठेवण्याची प्रथा आहे. मग इतक्या वर्षांत ज्ञानेश्वर नामधारी कोणी दुसरा अभंगकार झालाच नसेल असें नाहीं. ज्ञानेश्वर हे विशिष्ट देवतोपासक नव्हते हें माझें मत वर सांगितलेंच आहे.

हे सर्व वाद सोडून देऊन आहेत असे ज्ञानेश्वर व आहे अशी ज्ञानेश्वरी घेतल्यास त्यांचें अपूर्व महत्त्व १ लौकिक, व्यावहारिक, ऐतिहासिक आणि २ आध्यात्मिक या दोनहि दृष्टींनीं कोणालाहि पटण्यासारखेंच आहे. म्हणून त्याचा क्रमानें विचार करू.

प्रथम ज्ञानेश्वरीचें ऐतिहासिक महत्त्व हें घ्या, ती लिहिली जाण्याच्या काळीं

महाराष्ट्रांत स्वतंत्र मराठी यादवराज्य नांदत होतें हें स्वतः ज्ञानेश्वरींच्या शेवटीं सांगितलेंच आहे. यानंतर फारच थोड्या वर्षांत रामदेवराव यादवाचें राज्य मुसलमानांनीं घेतलें व पुढें तोच प्रसंग विजयनगरच्या राज्यावर आला. पण नंतर लवकरच शिवशाही प्रस्थापित झाली. नंतर पेशवाई होऊन गेली. नंतर आज आंग्ल' शाही 'हि, हिंदुस्थानास राजकीय स्वातंत्र्य मिळणार यामुळें, नष्ट होण्याचा काळ आला. अशा रीतीनें यादवशाही, मुसलमानशाही, शिवशाही, पेशवेशाही व आंग्लशाही इतक्या 'शाह्या' नष्ट झाल्या तरी ज्ञानेश्वरशाही मात्र अखंड, अबाधित राहिली आहे, हा कशाचा प्रभाव ? म्हणून, राजकीय स्वातंत्र्य भोगणाऱ्या जुन्या पिढीची सांगड, तें फिरून भोगणाऱ्या नव्या पिढीशीं, घालून देणाऱ्या ज्ञानेश्वराला राजकीय ऐतिहासिक महत्त्व उघडच येतें

यानंतर ज्ञानेश्वराच्या व्यक्तिविषयक महत्त्वाचा विचार करूं. तें महत्त्व लक्षांत येण्याला त्याच्या बाळपणचा वृत्तांत लक्षांत घ्यावा. तो वृत्तांत सर्व छळाचा आहे ज्ञानेश्वरादि चार भावंडांच्या वडिलांवर कडव्या ब्राह्मण-धर्मन्यायाधिशांनीं बहिष्कार घालून प्रायश्चित्ताकरितां देहविसर्जन सांगितलें. त्याप्रमाणें विठ्ठलपंत व रुक्मिणीबाई यांनीं गंगा नदींत जीव दिला अर्थात् हीं चार मुलें अल्पवयांत अनाथ झालीं. असें असतां निवृत्तिनाथाच्या पुढारीपणाखालीं ज्ञानदेवांनीं अध्ययन करून गाढ विद्वत्ता संपादन केली व अगदीं अल्पवयांत ज्ञानेश्वरी व अमृतानुभव असे ग्रंथ लिहिले. ही गोष्ट काय दर्शविते ? एका टोकाला ती दुर्दशा ! व दुसऱ्या टोकाला हें मान्यता-वैभव ! व्यक्तिविभूतिमत्त्वाची याहून दुसरी खूण कोणती ? दुसरेंहि एक तत्त्व यावरून सिद्ध होतें तें असें– 'जगांत ज्याचा जितका छळ तितकं त्याला अधिक बळ !' 'Blood of the Martyr is the seed of the Church' ही इंग्रजी म्हणहि तेंच दर्शविते 'धर्मछळांत मेलेल्या प्रत्येक हुतात्म्याच्या रक्ताच्या प्रत्येक थेंबागणिक धर्मयशस्वितेचा एक एक नवा वृक्ष उगवतो' या म्हणीचें प्रत्यंतर सर्व जगभर आलेलेंच आहे.

मराठी भाषेंत लिहिलेल्या या गीताभाष्याचें महत्त्व आणखी वेगळेंच आहे तें असें कीं, ज्ञानेश्वरानें धार्मिक वाङ्मयलेखनाच्या रीतींत एक क्रांतिच केली 'पूर्वी ग्रंथ म्हटला म्हणजे तो, विशेषत शास्त्रग्रंथ, संस्कृत भाषेंतच लिहिला जाई म्हणजे तो पंडितांनींच लिहावयाचा व पंडितांकरिताच लिहावयाचा. यानें समाजाच्या एकाच व लहानशाच भागाची सेवा होई पण आज महाराष्ट्र

'भिमानी देशभक्ताला, इंग्रजींतून लिहिण्याचोलण्याचें सोडून, तें समाजाच्या कल्याणाकरितां मराठींतून करावें असें वाटतें. तसेंच पूर्वी संस्कृत सोडून मराठींतून लिहावें असें ज्ञानेश्वरांना वाटूं लागलें होतें. ' वेद हे जितके एका दृष्टीनें उदार तितकेच दुसऱ्या दृष्टीनें कृपण ' असें ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे. वेद हे स्वतः सर्वज्ञानपूर्ण म्हणून उदार; परंतु समाजांतील वरच्या तीन वर्णांच्याच उपयोगी पडणारे आणि चौथ्या वर्णाला दूर ठेवणारे म्हणून कृपण अशी नाजूक निंदा त्यांनीं केली आहे व ती योग्यच आहे. वेदांचें रहस्य चवथ्या उपेक्षित शूद्रवर्णाला प्राप्त करून देण्याचा पायंडा प्रथम गीतेनें घातला हें खरें. तथापि फिरून तो ग्रंथहि संस्कृतांतच! यामुळें कोणी तरी धीटपणें पुढें येऊन मराठींतून धर्मग्रंथ, शास्त्रग्रंथ लिहिण्याचा पायंडा पाडून एक प्रकारची क्रांति करावयाला हवी होती ती ज्ञानेश्वरांनीं केली. औषध वैद्याघरच्या पोतडींतून बाहेर पडून अधिकारानें हाताशीं उपलब्ध आहे, पण तें कुलपबंद पेटींत असलें तर काय उपयोग? तथापि क्रांतीला लोकमत अनुकूल करून घेण्याला जसें धैर्य, धाष्टि तसेंच तत्त्वज्ञान व युक्ति यांचेंहि पाठबळ लागतें. म्हणून इतिहासांतील कोणत्याहि काळीं, कोणत्याहि देशांत क्रांतिकारक हा जाणूनबुजून परोपरीनें आपल्या क्रांतीचें समर्थन करतांना आढळतो. ज्ञानेश्वरींत याच दृष्टीनें ज्ञानदानाकरितां मराठी भाषेच्या बोधमाध्यमाचा उपयोग केल्याचें समर्थन केलें आहे. जणूं काय त्यांचें मन त्यांना या क्रांतीबद्दल जाणवीत असावें! ही क्रांति त्यांनीं सहेतुक-मुद्दाम केली होती. परंतु क्रांतिविषय जी मराठी भाषा तीहि तशीच श्रेष्ठगुण आहे असें समर्थनहि त्यांनीं उघड छातीठोकपणें केलें आहे. याविषयीं ज्ञानेश्वरीच्या निरनिराळ्या अध्यायांतून आलेले कांहीं उल्लेख या ठिकाणीं देतों. ते असे :--

### मराठीच्या श्रेष्ठत्वाचें समर्थन

माझा मऱ्हाटाचि बोल कौतुकें। परि अमृतातेंहि पैजा जिंके।
ऐसीं अक्षरें रसिकें। मेळवीन॥
जिये कोंवळिकेचेनि पाडें। दिसती नादींचे रंग थोडे।
वेधें परिमळाचें बीक मोडे। जयाचेनि॥ (अ. ६, ओ. १४-१५)
हें असो शब्दब्रह्म जिये बाजे। मावळलिया निवांतु निजे।
तो गीतार्थु मऱ्हाटिया बोलिजे। हा पाडु काई॥ (अ. ९, ओ. २२)

देशियेचेनि नागरपणें । शातु शृंगारातें जिणें ।
तरी ओंविया होती लेणें । साहित्यासी ॥
मूळ ग्रथांचिया सस्कृता । वरि मऱ्हाटी नीट पढता ।
अभिप्राय मानलिया उचिता । कवण भूमि हें न चोजवे ॥
जैसें अगाचेनि सुदरपणें । लेणियासी अगचि होय लेणें ।
तेथ अलकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ॥
तैसी देशी आणि सस्कृत वाणी । एका भावार्थाच्या सुखासनीं ।
शोभती आयणी । चोखट आइका ॥
उठावलिया भावा रूप । करिता रसवृत्तीचे लागे वडप ।
चातुर्य म्हणे पडप । जोडलें आम्हा ॥
तैसें देशियेचें लावण्य । हिरोनि रसा आणिलें तारुण्य ।
मग रचिलें अगण्य । गीता तत्त्व ॥ (अ. १०, ओ ४२-४७)
अहो वधुवराचिये मिळणीं । जैशीं वराडियाही लुगडीं लेणीं ।
तैसें देशियेच्या सुखासनीं । मिरविले रस ॥
तीरें सस्कृताचीं गहनें । तोडोनि मऱ्हाठिया शब्द सोपानें ।
रचिलीं धर्मविधानें । श्रीनिवृत्तिदेवें ॥
म्हणोनि मऱ्हाटी एथ सद्भावें नहावें । प्रयाग माधव विश्वरूप पाहावें ।
येतुलेनी ससारासी द्यावें । तिळोदक ॥ (अ ११, ओ. ९-१०)
एथ अर्जुनचि काय म्हणौं पातला । आजि आवडतयाही सुकाळु जाहला ।
जे गीतार्थु आला । मऱ्हाटिये ॥ (अ. ११, ओ. १४)
साहित्यसोनियाचिया खाणी । उघडवी देशियेचिया अक्षौणी ।
विवेकवल्लीची लावणी । हों देईं सैंच ॥
ये मऱ्हाटियाचिया नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं ।
घेणेंदेणें सुखचि वरी । हों देईं या जगा ॥ (अ १२, ओ. १२ व १६)
तो कृष्णार्जुनसवादु । नागरी बोलीं विशदु ।
सागोनि दाऊ प्रबधु । वोंवियेचा ॥
दाऊ वेल्हाळ देशी नवी । जे साहित्यातें वोजावी ।
अमृतातें चुकी ठेवी । गोडसपणें ॥ (अ. १३, ओ ११५४-११५६)
आणि तोचि हा मी आता । श्रीव्यासाचीं पदें पहाता ।
आणिला श्रवणपथा । मऱ्हाठिया ॥ (अ. १८, ओ. १७०८)

संस्कृत भाषा सोडून मराठीचा स्वीकार करावयाचा तर ती मराठी नियम बद्ध, समृद्ध, चित्ताकर्षक व बोधप्रद झाली पाहिजे, आणि आपण ती तशी करू असें आश्वासन आत्मविश्वासपूर्वक ज्ञानेश्वरांनी वाचकांना दिलें. तसाच प्रकारचें आश्वासन नव्या पिढीच्या साहित्यिकांनीं, इग्रजी संस्कृति सोडून नव्या भाषासंस्कृतीचा स्वीकार करावयाचा तर, राष्ट्रांतील जनतेला देण्याची उमेद बाळगिली पाहिजे.

यानंतर साहित्यगुणाच्या दृष्टीनें विचार करता कोणालाहि हें कबूल करावें लागेल कीं, ज्ञानदेवाचें कवि या नात्याचें स्थान केव्हांहि अढळच राहील. प्रथम थोडा सविनय सल्गी करून मी हें म्हणू इच्छितों कीं, गीताभाष्यच खरें, पण तें कवितारूपानें लिहिताना आपण 'कवि' आहों हा सात्त्विक मानवी अभिमान, संत झाले तरी, ज्ञानेश्वराच्या मनात जागृत होता. सर्वच संतकवींना हे शब्द लागू पडतील. वास्तविक त्याला निवळ धर्मोपदेशच करावयाचा त्याला पद्यापायीच काय गरज ! तें कार्य गद्यानेंहि करता येईल ना की ! पण संतकवि हा धार्मिक दृष्ट्या संत असला तरी साहित्यदृष्ट्या अहकारी कविच असतो. एरवीं अमुक इतक्या चरणाचें वृत्त किंवा छंद, यमक इत्यादि बधनें तो आत्मोद्गाराला का स्वीकारील ? भर्तृहरीला जो एकेक विषय सांगावयाचा होता त्याला शतकच–मोजके शंभर श्लोकच–का आवडले ? नव्याणव नाहीं कीं एकशें एक नाहीं ! शंकराचार्यांसारखे संन्यास घेऊन इतर सर्व बधनें तोडणारे, त्यांना 'षट्पद्यात्मक' स्तोत्रेच का इष्ट वाटावीं ? शिवाय त्यांतही काहीं सयमकहि का रचावीं ? आणि 'अष्टकें' म्हटलीं म्हणजे सात आठच श्लोक का असावे ? तसेंच आमचे नव्या पिढीचे कवि सुनीताच्या प्रकार त्यांना कोण आवडता ! इग्रजींत चौदा ओळींच्या कवितेचा एक प्रकार आहे म्हणून त्याचें अनुकरण यांनीं केलें ! बरोबर चौदाच ओळी असायच्या ! म्हणजे पधरा नाहीं कीं तेरा नाहींत ! अर्थात् हे सर्व स्वीकृत अशा कविभूमिकेचे खेळकर चाळे किंवा छंद हात गाचा बोध इतकाच घ्यावयाचा कीं, अद्वैतवादी ज्ञानसपन्न सिद्ध किंवा स्थितप्रज्ञ झाले तरी व्यवहारात तीं सात्त्विक का होईनात पण मनुष्येच असतात ! या खेळकरपणाच्या छंदाच्या दृष्टीनें मला असेंहि वाटतें कीं, ज्ञानेश्वराचा अध्याय शेवटचा अठरावा म्हणून अठरा या आकड्याची गमत साधण्याकरिता ज्ञानेश्वरांनीं बरोबर अठराशेच्या ओवीवर खरी ग्रंथ समाप्ति केली. ही ओवी अशी आहे—'आणि ग्रथाचें जाविये । विदेशीं

ल्मेकीं इयें । दृष्टादृष्ट विजयें । होआवें जी ॥ 'जी' या अक्षरानें खरी ग्रंथसमाप्ति वाटते. यापुढें आणखी दहा ओव्या आहेत, पण त्यात वेगळा विषय आहे.

ज्ञानेश्वराचें कवि या नात्याचें श्रेष्ठत्व अनेक गोष्टींनी दिसून येतें –१ ज्ञानेश्वरी ही गीतेवरील टीका असली तरी केवळ प्रतिशब्दार्थ सांगणारी नाहीं. भाष्यात त्याची स्वतंत्र अशी विवेचनशक्ति पुष्कळच दिसून येते. कवीला लागणारी ही त्याची प्रज्ञा होय. २ फार थोड्या शब्दात पुष्कळ अर्थ सांगण्याची कला त्याना पूर्णपणे हस्तगत झालेली दिसते. शब्दाच्या बाबतीत मितव्ययित्व – पाल्हाळ टाळून बोलणें – हा एक मोठा साहित्यगुण आहे व काव्यात तर तो फारच उपयुक्त असतो. अल्पाक्षर पद्य (उदाहरणार्थ तुकारामाचे अभंग) हें मोठें सामर्थ्यवान् व प्रभावी असतें–जसा दोरी लावलेला ताठ तीरकमठा–धनुष्य. ३–ज्ञानेश्वराना वाचेची–वाणीची योग्यता पटलेली होती आणि रसिकत्व म्हणजे काय याचेंहि उत्तम ज्ञान त्याना होतें. रसिकानें काव्यसेवन कसें करावें याविषयीं ते म्हणतात – 'जैसे शारदीयेचे चद्रकळे – माजीं अमृतकण कोंवळे । ते वेचित मनें मवाळें । चकोरतलगें ॥ तियेपरी श्रोता । अनुभवावी हे कथा ।' (हे कथा म्हणजे उपलक्षणानें 'कोणतेंहि' काव्य असेंच म्हणा ना !) – अति हळुवारपण चित्ता । आणुनिया ॥ हे शब्देंविण संवादिजे । इंद्रिया नेणता भोगिजे । बोलाआदि झोंबिजे । प्रमेयासी ॥ जैसे भ्रमर परागु नेती । परी कमळदळें नेणती । तैसी परी आहे सेविती । ग्रंथीं इयें ॥ (अ. १ – ५६ ते ५९) तसेंच पधराव्या अध्यायाच्या प्रारंभीं त्यानीं वाचेचें गुणवर्णन कसें केलें आहे तें पाहा– 'ब्रह्मीचें विसवणें वरी । उन्मेष लाहे उजरी । जे वाचे ते द्दये वरी । सुधासिंधु ॥ पूर्ण चद्राचिया कोडी । वक्तृत्वा घापे कुरोंडी । तैसी आणी गोडी । अक्षरातें ॥ सूर्ये अधिष्ठिली प्राची । जगा राणीव दे प्रकाशाची । तैसी वाचा श्रोतया ज्ञानाची । दिवाळी करी ॥ नादब्रह्म खुजें । कैवल्यहि तैसें न सजे । ऐसा बोलु देखिजे । जेणें दैवें ॥ (अ. १५–१० ते २६) इत्यादि.

ज्ञानेश्वराची बरोबरी करणारा प्रतिभासपन्न कवि गेल्या सहाशें वर्षांत झाला नाहीं व आजहि नाहीं. प्रतिभा ही रस आळविण्यापेक्षा अलकाराच्या योजनेंतच अधिक दिसून येऊ शकते. रसनिष्पत्ति ही सहृदयत्वावर अवलंबून असते आणि ती सर्वस्वीं निरलंकृत अशा शब्दातून होऊंहि शकते. त कार्य स्थायीभाव (भावना) आळविण्याचें आहे. उलटपक्षीं अलकरणादि कार्य हें कल्पना–

शक्तीच्या सामर्थ्यावर अवलंबून असते. प्रतिभेची व्याख्याच अशी आहे : ' नवनवोन्मेषशालिनी प्रज्ञा प्रतिभा '. प्रतिक्षणीं नवा नवा उन्मेष करणारी तरी पण प्रज्ञाच – म्हणजे बुद्धिच. तथापि हें उन्मेषकार्य प्रज्ञा कल्पनाशक्तीच्या सहाय्यानेंच करते. ज्ञानेश्वरी हें गीताभाष्य असल्यामुळें त्यात सर्वत्र अनुस्यूत असा एकच रस व तो शांत होय. तो पूर्णपणें आत्मविश्वास त्याना स्वतः ग्रंथविषयाचेंच वाटेल तितकें सहाय्य होतें. तथापि ज्ञानेश्वरी ग्रंथ हा गीतेच्या अंगावर घेतलेला, व तिचें अंगरक्षण करणारा असला तरी, अंगाचा सर्व बांधे सूदपणा यथार्थ प्रकट करून त्याचरोबर शोभा निर्माण करणारा असाहि अंगरखा आहे. कुशल शिंप्याचा गुण हाच असतो. तो अंगरखा असाच करतो कीं, मूळ अंगाचें आकृतिवैशिष्ट्य तर बदलत नाहीं. किरकोळ तो पुगीर व फुगीर तो किरकोळ असें दिसू देत नाहीं. पण हें समाळून किंवा तें समाळण्याला सहाय्यभूत म्हणूनहि साधेल तेथें कलाकुसरीचेंहि काम करितो. हें करण्यास प्रतिभा लागते. प्रज्ञेचा गुण स्थायीपणा व प्रतिभेचा गुण चंचलता, चवचालपणा. जसा ब्रह्मरूप मूळ पुरुष स्थिर-स्थितप्रज्ञ असतो आणि चंचलतेचें-चवचाल्पणाचें कार्य ' प्रकृती ' वर सोपविलें जातें, त्याच न्यायानें स्थिरस्वरूपी बोधाचें इष्ट कार्य चंचलस्वरूपी प्रतिभेवाचून, उज्वल, खेळकर कल्पनाशक्तीवाचून, होऊं शकत नाहीं. ज्ञानेश्वरींतून हें प्रतिभाकार्य काढून टाकल्यावर बाकी काय उरतें हें कोणासहि पाहता येईल. शुद्ध बोध इष्ट खरा, पण निर्बुद्ध माणसाला तो पटविला गेला पाहिजे ना ! तें कार्य ज्ञानेश्वराच्या प्रतिभेंतून निघणाऱ्या रूपक–उपमा–दृष्टांतादिकांनीं केलें आहे.

रूपकादिकाना उपमानप्रमाण म्हणतात. त्याचा उपयोग बुद्धीला जो विशेष होतो तो अपरिचिताचा परिचय करून देण्याचा; आणि परिचिताच्या साम्यानें अपरिचिताचें ज्ञान करून देणें यांचेंच नाव उपमानप्रामाण्य. जगात प्रत्यक्ष प्रमाणानें ज्ञान फार थोडें होतें. पुष्कळसें शब्दानें म्हणजे आप्तवाक्यानें होतें. तसेंच पुष्कळसें अनुमानानें होतें. परंतु कांहीं गोष्टी अशा असतात कीं, त्याचें ज्ञान उपमा–दृष्टांत–रूपक इत्यादींशिवाय होतच नाहीं. उदाहरणार्थ, विलायतेंतल्या लहान मुलानें ' हत्ती हा कसा असतो ' असें विचारलें तर तो ' आपल्या मोठ्या डुकरासारखा पण फक्त सोंड थोडी अधिक लांब करावी म्हणजे झालें ' असें सागता येतें. आपल्या इकडील लहान मुलानें ' पौर्णिमेचा चंद्र कसा असतो ' असें विचारलें तर ' लोण्याच्या गोळ्यासारखा ' असें म्हटल्यानें काम

मागतें. अपरिचितार्ची* ओळख करून द्यायला समर्पक ठरेल अशी कोणती वस्तु घ्यावी हे ठरविण्यातच प्रतिभेचें यश असतें, आणि हें यश ज्ञानेश्वरांनीं इतकें मिळविलेले दिसतें कीं, त्यात त्याचा हात कोणालाहि धरवणार नाहीं. अध्यात्मातले सर्वच विषय अपरिचित, केवळ बुद्धिगम्य, अमूर्त ! ते कधींहि प्रत्यक्षात येणारे नव्हत. म्हणूनच ते समजावून देण्याला आयास. ब्रह्म, माया, ईश्वर, प्रकृति, ज्ञान, अज्ञान, निगुण, सिद्धावस्था इत्यादि सामान्य मनुष्याला काय समजणार ! पण हें समजावून द्यायला तत्काळचे कविसंकेत – पण त्याहूनहि तत्काळचें सर्व विज्ञान – व्यवहारज्ञान – हें आपल्या कार्याला, म्हणजे उपमानें व दृष्टांतविषय पुरविण्याला ज्ञानेश्वरांनीं जुपलें आहे. समुद्र, प्रतिबिंब, स्वप्न, सुवर्ण, कमळ, आरसा, मृगजळ, सूर्य, चंद्र, आकाश,

---

* अपरिचिताचा काहीं थोडें तरी ज्ञान परिचिताकडून करून देण्याला दृष्टांत-रूपकादिकांचा उपयोग कसा होऊ शकतो याचा थोडासा अनुभव मलाहि आहे. मी या साधनाचा उपयोग शक्य तितका करून घेत असतों. त्याचें एक उदाहरण देतों. पुष्कळ वर्षांपूर्वी १९२६ सालीं, एका खेडेगावीं, शिरवळास, प्रकृति सुधारण्याकरिता जाऊन राहिलों असता माझ्याभोंवतीं सर्व सोयत निरक्षर गडीमाणसाची होती. पण मी स्वत तत्त्वज्ञानाचें एक प्रवेशपुस्तक वाचीत होतों ! तेव्हा कल्पना सुचली कीं, या गडीमाणसाना जग, विश्व, परलोक याच्या कल्पना कशा असतील किंवा समजून द्यायच्या तर त्या कशा समजावून देता येतील ? तेव्हा जवळच रस्त्यावरून गर्जत जाणाऱ्या एका मोटारीनें ती कल्पना सुचविली. म्हणून ' विश्वा 'ला ' मोटारी 'ची उपमा देऊन सर्वांग-रूपकात्मक अशी कविता मीं रचली व तीहि मुद्दाम कुणबाऊ मार्घेत, तिला नाव दिलें ' दिव्य मोटार ' – ती कविता अशी —

| | |
|---|---|
| मोटार चाल्लि कुणिकड | याच्या यारा सुदूल न कोड |
| चौयुगांचि क्येलीं चाक | त्यात पाल्डी खालवर मोक |
| बरसाचि धुसवलीं नाक | तीन काळाच जोडल दाडक |
| मोटार खडी अतराळीं | टप चढऽविला आभाळी |
| भितमाल मढवली निळी | कडकडन पीत काजळी |
| नक्षित्र दिव ठायठाई | जणु ईजेचि क्येलि रोषनाई |
| काळुखाला यारा न्हाई | पाताळि पळून त्यो जाई |

पतिपत्नी – तात्पर्य जो जो म्हणजे अशिक्षिताला माहीत असेल तो तो पदार्थ त्यानीं उपमेला घेतला आहे. पण तो घेताना त्यानीं साम्य व समर्पकता कशी सिद्ध केली आहे हें पाहून त्याचें खरें कौशल्य पटतें. त्यानीं उपमादृष्टांत देण्याला सुरुवात केली कीं एकामागून एक अशा सरी येतात व शुद्धीवर जोरानें भडिमार करतात कीं, बोलायची सोय नाहीं. त्या देऊन जागा किती अडवावी ! नमुन्यादाखल मी दोनतीन उदाहरणें देतों अध्याय २ व १२ यातील स्थितप्रज्ञतेचीं लक्षणें, अनन्यभक्ताचीं लक्षणें, याविषयींच्या उपमा पाहाव्या. ' वोखटें ना गोमटें। या कार्ईसेयाहि न भेटे। राति देवो न

---

च्यादसूर्य आगिच गोळ
दिपवती जगाच डोळ
पासिंजर दाटुन बसती
समद्याच्या तिकिट हातीं
सामानहि भरल मारी
फळाफुलाच्या करड्या वरी
यनात शिलगली आग
हज्जार कोस आगमाग
मोटार हाकाया बसला
त्येचा चेहरा दरेस कसला
ल्ई हुशार ह्यो ड्रायव्हर
दुसऱ्यान करी कारभार
बिन हात लावता नरा
उलटसुलट घेत्याती फेरा
मोटार चालली तडक
हवि तशी मऊ अन कडक
चाजू ना उजवी डावी
मग खुणचा हात कोण दावी
मरधाव चाल मोटार
माग पसर कोसकोसभर
बिन साप्याचि ही मोटार

दो बाजु दोन ल्टकाव?
'फरट लाईट' मुलखा आगळ
त्येचि कुणी कराची गिणती
दिगी जल्माचि माडुन खाती
ट्रक डब उच डोंगरी
साता समिंद्राच्या घागरी
कोण पेटवि त्येचा न थाग
पसरली आश्चि धगधग
गडि कधी कुणा ना दिसला
हथेरणार समदा पसला
एक हातच चाकावर
डोळा ठेवीं बी समद्यावर
चाक फिरत्याती गरगरा
न्हाइ खिनाचा त्येना थारा
जाई तकड सडकच सडक
जणु सगमरवरी खडक
तिला धरायला होवावी
मन मानल तकड न्यावी
शेंडनक्षिचाचा धूर
वाजत शिग ऑंकार
उतराया चढाया न दार

घरे । सूर्य नैसा ॥ जो खाणनया घावो घाली । का लावणी जेणें केली । दोघा एकचि सावली । दे वृक्ष जैसा ॥ साहि ऋतु समानु । जैसे का हे गगनु । तैसें एकचि मानु । शीतोष्णी जया ॥ दक्षिणोत्तर मारुता । मेरू जैसा ॥ माधर्यें चंद्रिका । सरिसीच राया रंका । तैसा जो सकलिका । भूतासमू ॥ जो निंदेतें नेघे । स्तुतीतें न श्लाघे । आकाशा न लागे । लेपु जैसा ॥ यथालभें तोखे । अलाभेंहि न पारखे । पाउसेंवीण न सुके । समुद्र नैसा ॥ इत्यादि

एकदर ज्ञानेश्वरींत कमीत कमी दोन हजार तरी उत्कृष्ट उपमा सापडतील असें वाटतें काहीं काहीं उपमा त्याच त्या येतात व पुनरुक्तीनें कंटाळवाण्या वाटतात हें खर. पण काहीं ठिकाणीं, एकामागून एक नव्या अशा उपमा हा उगीच विस्तार असें वाटलें तरी प्रत्येक उपमेंतला समर्पकपणा वेगळाच चढता असतो ज्यानीं ज्ञानेश्वरीचा सूक्ष्म अभ्यास केलेला आहे ते प्रत्येक वेग वेगळ्या उपमेचें स्वारस्य वेगवेगळें दाखवू शकतात नवव्या अध्यायात खालील उपमा आहेत – ' माझेया विस्तारपणें नावे । हें जगचि नव्हे आघवें । जैस दूध मुराले स्वभावें । तरी तेंचि दही ॥ का बीज झालें तरु । भागाराचि अल कारु । तैसा मज एकाचा विस्तारु । तें हें जग ॥ यातील पहिल्या दृष्टातात दुधाचें दही होणें हा दृष्टात, ब्रह्माचा विस्तार सृष्टींत परिणामवादानें होण्या पुरता ठीक आहे परतु सृष्टि परत ब्रह्मात विलीन होते त्याला तो लागू पडत नाहीं यापेक्षा बीजवृक्षाचा दृष्टात काहीं बरा कारण वृक्षातून पुन: बीज निर्माण होतें. परतु सुवर्ण व अलकार हा दृष्टात त्याहूनहि समर्पक ज्ञानेश्वरीची प्रवचन व कीर्तनें चालतात तेव्हा अशा चर्चेची मौज पाहून घ्यावी !

---

गाडीच बनवल घर
एकला गडी ड्रायव्हर
न्हाइ पल्डी कधि आजवर
माडवल थी त्येच घरच
सार हिशेब हातोहातच
बिन ब्रेक अशी मोटार
अखि अखड चाले दूर
हये मोटारीच नाव
इद्यान इश्व म्हणत्याती

जल्माचि त्यात येरझार
त्येला लाग ना कुणी क्लीनर
करण्याला इक्ति रीपेर
मोजिना कुणाला कन्च
मग कुणा इचारी कस्च
बिन 'लेसन' ची ड्रायव्हर
न्हाई कधीं चणू सपणार
हव तस कुणी व्हेवाव
इचिमन शबुद बि न येती

यानतर ज्ञानेश्वराच्या धार्मिक वृत्तीकडे वळू. ज्ञानेश्वर अद्वैती होते याविषयीं नागपूरचे प्रा. पेंडसे यानीं 'ज्ञानेश्वराचें तत्त्वज्ञान' या आपल्या ग्रथात सविस्तरपणें विवेचन केलें आहे. पण माझ्या मतें इतक्या विस्ताराचें कारणच नव्हतें. कारण ज्ञानेश्वर द्वैती होते असा चागलासा पूर्वपक्ष फारसा कोणीं केलेला आढळत नाहीं. अद्वैताप्रमाणें विशिष्टाद्वैती, शुद्धाद्वैती, पूर्णाद्वैती केवलाद्वैती व उघड उघड द्वैती असे अनेक पथ आहेत हें वेगळें. परतु त्यानींहि कोणीं ज्ञानेश्वर हे अद्वैती नव्हते, ते द्वैती होते, असें आग्रहानें प्रतिपादल्याचें आढळत नाहीं. पण तत्त्वानें अद्वैती असणारा हा भक्त असू शकतो. द्वैत नाहीं तर मग उपास्य व उपासक हा भेद कसा हा आक्षेप सहजच येतो. पण अद्वैत 'वाद' हा अतिम स्वरूपीं बुद्धिगम्य विषय आहे. त्यामुळें प्रत्यक्ष व्यवहारात व त्यापुरतें, निर्गुणाला सगुण मानून, कोणत्या तरी रूपानें उपास्य कल्पून, त्याची भक्ति करणें हें विसवादी ठरत नाहीं. श्रीशकराचार्य हे सर्व विश्व व ससार मायामय व मिथ्या असें प्रतिपादणारे, पण तेहि भक्त व उपासक होते. सगळें जग मिथ्या असेल तर त्यात आपणहि आलों, व आपली पूजा ही अतिमस्वरूपीं मिथ्या असली तरी काय हरकत, असें म्हणणारेच ते असावे. त्याचे देवतार्चन होतें. त्यानीं सगुणवर्णनपर स्तोत्रें केलीं आहेत. तसेंच ते सन्यासी व सन्यासवादी असता, त्यानीं हिंदुधर्मरक्षणार्थ सर्व भरतखडभर सचार करून चारहि दिशाना मठ स्थापून वीरवृत्तीनें धर्म–नगराची नाकेबदी केली. बौद्धाशीं वाद करून वैदिक धर्माची स्थापना केली. हें करणें जसें अद्वैतज्ञानाशीं विसगत नाहीं, तसाच अद्वैतवादी असता उपास्य–उपासक, गुरु–शिष्यभेद ज्ञानेश्वरानीं मानणें हेंहि विसगत नाहीं

१–ज्ञानोत्तर काही कर्म नाहीं. २–ज्ञानोत्तर इतर कर्म नाही पण भक्तिकर्म उरतें. ३–ज्ञानोत्तर लोकसग्रहार्थ वर्णाश्रमपर कर्म उरतेंच. असे तीन पक्ष दिसतात. प्रत्यक्ष व्यवहारात या तीनहि पक्षाच्या पुरस्कर्त्यांनीं कर्मच केलें. यामुळें टिळकाचें मतच ग्राह्य ठरतें. वाद असेल तो इतकाच कीं, स्वत गीतेचा अभिप्राय काय आहे ! पण गीतेच्या उपक्रमोपसहारावरून काय ठरतें ? सर्व गीताभर निष्प्रिमकारक अद्वैत सागून अर्जुनाला द्वैतपदावर आणला तो का ? प्रथम अद्वैतोपदेश करून विश्वरूपदर्शनापर्यंत मजल नेल्यावर, युद्धाच्या तुरवाटीला मराठा तरी, आता विश्वरूपदर्शन झाल्यावर अर्जुन 'ज्ञानी' होण्याचा शिर्के तो काय उरला ? मग असें असता फिरून, आपल्या व त्याच्या कार्याविरिताच श्रीकृष्णान त्याजमध्यें सगुणरूप दर्शनाची व द्वैताची आवड उत्पन्न केली असें

ठरत नाहीं काय ? मग जें कार्य कृष्णाला इष्ट होतें त्याच प्रकारचें कार्य सामान्य मनुष्यप्राण्यालाहि त्याच्यापुरतें इष्ट असतेंच ते कर्म करण्याला बुद्धिगम्य ज्ञानाची आडकाठी का यावी ?

शिवाय केवळ बुद्धिगम्य ज्ञानानें मनुष्याला पूर्णता येत नाहीं किंवा त्याची भूक भागत नाहीं. कारण बुद्धीप्रमाणें भावना हा एक मोठा महत्त्वाचा मानवी घटक आहे. म्हणून भावनेचा उत्कर्ष करण्याइतकें आकर्षकत्व ज्यामध्यें आहे असें काहीं तरी ध्येय मनुष्याला लागतेंच. मग कोणाला परिस्थित्यनुरूप तें ध्येय आपल्या सगुण देशमर्तीत लाभो, कोणाला तें सगुण देवमर्तीत लाभो. ' ज्ञानोत्तर काय ? ' याचें उत्तर ' काहा नाहीं ' असें म्हणणें वाईट दिसतें म्हणून ' ज्ञानोत्तर रोकडा मोक्ष दुसरें काहीं नाहीं ' असें उत्तर देण्याची रीत आहे. परंतु मोक्ष याचा तरी अर्थ काय ? मूलप्रकृति आपली सुटका पगतपर पुरुषापासून करून घेते तो मोक्ष ( बंधनापासून सुटका ) असेल तर प्रकृति धर्माप्रमाणें कर्म हें प्राप्तच ठरतें. देह शिल्लक असेल तोंपर्यंत त्रिगुणात्मक प्रकृतीचें कार्य चालणारच. मग कर्म केल्याने तत्त्व कसें बिघडलें ?

मोक्षासंबधीं शिवगीतेंत म्हटलें आहे कीं, ' मोक्षस्य न हि वासोस्ति न ग्रामांतरमेव वा ' म्हणजे मोक्षाचें एखादें राखीव घर किंवा निवासमंदिर नाहीं, किंवा मोक्ष या नावाचा एखादा गावहि नाहीं कीं, उठून तेथें गेल्यानें तो मिळेल. तर मोक्ष हा, तुकारामाच्या मरणाप्रमाणें, याच देहीं याच डोळा अनुभविण्याचा आहे व तो निष्क्रियतारूपानें नव्हे तर कर्मरूपानें. एक ग्राम्य उदाहरण घ्यावयाचें तर असें, मुंबई नावाच्या शहराचा मोह व लोभ अगदी दूरच्या खेडेगावच्या लोकाना असतो पण त्याना त्या शहराला जाणें घडू शकत नाहीं तेव्हा अशा एखाद्या सधान आपण म्हणतोंच कीं, त्यानें गावच्या गावा बसून ' जिवाची मुंबई केली ! ' याचा अर्थ मुंबईत मिळणाऱ्या काल्पनिक सुखासारखीं सुखें आपल्या गावींच बसून भोगलीं तीच गोष्ट मोक्षाचीहि समजावी. मोक्ष म्हणजे देहपतन नव्हे आणि देहधारित्व म्हटलें कीं सक्रियत्व आलेंच म्हणूनच शंकराचार्यांनीं धर्मस्थापनेचें, ज्ञानेश्वरानीं धर्मोपदेशाचें, व टिळकानीं देशसेवेचें कर्म केलें. ज्ञानेश्वरींत म्हटलच आहे कीं, ' मोक्ष दुरा वाधू कीर होय । परि तोहि आराधी तुझे पाय । म्हणोनी धाडिसी तेथ जाय । पाइकू जैसा ॥ मोक्ष हा ईश्वर पाठवाल तेथें चाकरासारखा जातो. अर्थात्

ज्याचें सत्कर्म ईश्वराला रुजू असेल त्याच्याकडे बसल्याजागा मोक्ष, ईश्वराच्या आज्ञेनें, चालत येतो असें का न म्हणावें ?

ज्ञानेश्वरांनीं असेंहि म्हटलें आहे कीं, भक्तिभावानें प्रेरित झालेल्याला तीर्थ यात्रादिहि करण्याचें कारण नाहीं ते म्हणतात – ' तीर्थे बाह्यमळु क्षाळे । कर्में अभ्यंतर उजळे । एवं तीर्थे जाण निर्मळें । सत्कर्मेंची. ( १८–१६० )

> मोक्ष देऊनि उदार । काशी होय कीर ।
> परि वेंचणें लागे शरीर । तिये गांवीं ॥ १२–१७३
> हिमवंतु दोष खाये । परि जीविताची हानि होये ।
> तैसें शुचित्व नोहे । सज्जनाचें ॥ १७४
> शुचित्वें शुचि गांग होये । आणि पापें तापहि जाये ।
> परि तेथें आहे । बुडणें एक ॥ १७५
> खोलिये चारु नेणिजे । तरी भक्ती न बुडिजे ।
> रोकडाचि लाहिजे । न मरतां मोक्ष ॥ १७६
> संतांचे नि अंगलगें । पापातें जिणणें गंगे ।
> तेणें संतसंग । शुचित्व कैसें ॥ १७७

सत्कर्मांची ही उतारपेठ मध्यवर्ती अशी आहे. ज्ञानी मनुष्य खालीं व्यवहाराकडे निघाला तर त्याला या मधल्या मुक्कामाला यावें लागतें. आणि अज्ञानी मनुष्य वर ज्ञानप्राप्तीकडे निघाला म्हणजे त्याला येथें मधला मुक्काम करावा लागतो. म्हणून या मुक्कामातली रहदारी कधींच संपत नाहीं. ज्ञान्याचीं लक्षणें काय, योग्याचीं लक्षणें काय, भक्ताचीं लक्षणें काय – हीं सांगावयाचीं झालीं तर तीं शेवटीं गीताध्याय २ व १२ यांत सांगितल्याप्रमाणें, साम्याची शुद्धि व दृष्टि लाभलेल्या मनुष्याच्या आचरणाच्या उदाहरणांनींच सांगावीं लागतात त्यांत भेद पडत नाहीं. स्थितप्रज्ञ हा, १ ज्ञानी, २ भक्त व ३ कर्मयोगी या सर्वांचा समान प्रतिनिधि आहे, आणि जगातल्या कोणत्याहि देशातल्या तत्त्ववेत्त्यांनीं नीतीचीं लक्षणें सांगितलेलीं पाहिलीं तरी तीं वरीलप्रमाणेंच निघतात. यावरून हेंच ठरतें का, तत्त्वज्ञानाच्या सिद्धांतापेक्षा सक्रिय आचरणालाच अधिक महत्त्व आहे.

## (२) ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाचीं साधनें

नव्या सुधारणेच्या या काळात महाराष्ट्रातील सुशिक्षित लोकावर ' भाविक पणा ' नष्ट झाल्याचा आरोप येतो परतु उलट हें मात्र खरं आहे कीं, याच काळात ज्ञानेश्वरीचा ' अभ्यास ' जुन्या काळापेक्षा अधिक होत आहे याचें कारण प्रथम छापखाने हे होत पूर्वी ज्ञानेश्वरीच्या हस्तलिखित पोथ्या होत्या, पण त्या कितीशा असणार ? छापखान्याच्या साहाय्यामुळें ज्ञानेश्वरीच्या पाच–पन्नास हजार तरी प्रति आतापर्यंत छापल्या गेल्या असतील व त्या वाचलेले लोक कदाचित् लाखानीं गणता येतील पूर्वी कोठें एखाद्या मठात, देवळात किंवा साम्प्रदायिक गुरूच्या घरीं ज्ञानेश्वरीचें प्रवचन होत असता, श्रोत्याना तो ग्रथ काय ऐकावयास मिळत असेल तितकाच ! नऊ–दहा हजार ओव्यांचें हस्तलिखित स्वतचें म्हणून कितीशा घरीं असणें शक्य ? याचा अर्थ भाविक श्रोत्याना ज्ञानेश्वरीचें तात्पर्य फक्त कानीं पडावयाचें पण ती प्रत्यक्ष हातांत घेऊन, यथावकाश वाचून, आपली आपण समजून घेण्याला साधन व अव काश नाहीं ! तेव्हाचे आचार्यहि असे कीं, ज्ञानेश्वरी बहुतेक तोंडात असलेली, पोथी हातात घेऊन वाचण्याचेंहि फारसें कारण नाहीं पण श्रोत्यानीं एखाद वेळ ज्ञानेश्वरी मधूनमधून ऐकून ती कितीशी त्याच्या लक्षात राहणार ? आपण ज्ञानेश्वरी जन्मात अधूनमधून एकदा श्रवण केली एवढच त्याना समाधान !

पण अलीकडे ही स्थिति पालटली आहे पूर्वीप्रमाणें मठा–देवळातून ज्ञाने श्वरीचीं प्रवचनें चालू आहेतच परतु छापील प्रत स्वत जवळ ठेवून सवडी प्रमाणें प्रत्यहीं थोडथोडी ती वाचणारेहि लोक अनेक आढळतात. शिवाय विद्यापीठाच्या उच्च परीक्षेंतील मराठी भाषाविषयात ज्ञानेश्वरीचा समावेश झाला असल्यानें, तरुण वयातहि ज्ञानेश्वरीचा परिचय घडून तिच्याविषयीं ज्याना गोडी उत्पन्न झाली अशा लोकाची सख्या वाढत आहे इ आ राज वाडे, प्रोफेसर दाडेकर, ह भ देशमुख, रा च वैद्य अशासारखे लोक आहेत कीं, इग्रजी शिक्षण घेतलेलें असता ज्यानीं ज्ञानेश्वरी आत्मसात् केली जुन्या काळच्या श्रद्धाळूपणात अशमात्र कमीपणा नव्या चिकित्सक बुद्धीनें कदाचित् आला असेल, नाहीं असे नाहीं पण इतर अनेक दृष्टींना ज्ञानेश्वरीचें वाचन वाढलं आहे असं निश्चित म्हणता येईल काहीं वाचकाना तिजमधील काव्य

अपेक्षेनें तिच्यावरील ही प्राकृत टीका वाचणारे आहेत जुन्या काळची अभि जात सुसंस्कृत पंडितगिरीची व काव्यग्रंथाची धाटणी अभ्यासण्याकरिता ज्ञाने श्वरीचें वाचन होतें तसेंच शब्दशास्त्र, भाषाशास्त्र याच्या दृष्टीनेंहि

ज्ञानेश्वरीच्या वाचनाच्या या वाढीबरोबर तिच्या अभ्यासाचीं साधनेंहि वाढलीं आहेत यांत प्रथमच छापील ग्रंथाचा उल्लेख पूर्वी केला तोच फिरुन एक वेळ केला पाहिजे या ग्रंथाची किंमत बरीच असते, तथापि त्याच्या प्रती हजारांनीं निघतात ! आजवर आवृत्त्याहि किती तरी निरनिराळ्या निघाल्या आहेत. पण ज्ञानेश्वरीची भाषा प्रौढ, जुनी आणि इतकी दुर्गम आहे कीं, आज अत्युच्च शिक्षण घेतलेल्या मराठी वाचकालाहि केवळ स्वतः वाचून ती समज णार नाहीं ती समजून सांगणारा कोणी तरी हवाच मग तो गुरु असो वा टिप्पणीकार असो पण घरोघर गुरु कोठून मिळणार ? म्हणून अभ्यासकाच्या मागणीमुळें तिचा सरळ–सोप्या मराठी भाषेत अर्थ लिहून काढून तो ओव्यांच्या जोडीनें छापण्यात येऊं लागला त्यापूर्वी केवळ कठिण शब्दांचा अर्थ सांग णाऱ्या टिप्पणी दिल्यानें काम भागेल असें वाटत होतें. शिवाय समग्र अर्था सह ग्रंथछपाईचा खर्च फार म्हणूनहि केवळ टिप्पणींवर भागविलें जात होतें परंतु नुसत्या कांहीं कठिण शब्दांचा अर्थ सांगणें एवढेंच साधन ज्ञानेश्वरीचा अर्थ चांगला कळण्याला पुरेसें होत नाहीं कारण शब्दांप्रमाणें व्याकरणहि जुनें, धाटणी जुनी व्याकरणाचा बोध झाल्याशिवाय समग्र अर्थबोध कसा होणार ? पण व्याकरण लावून दाखवून, अन्वय लावून, ओव्या छापण्यापेक्षा सरळ अर्थच एकत्र लिहिलेला बरा यामुळें आता नुसत्या ओव्या छापलेली ज्ञानेश्वरीची प्रत अभ्यासाकरिता कोणी हातीं घेत नाहीं कारण ' सार्थ ' ज्ञानेश्वरीच मिळते ज्यांचा ज्ञानेश्वरीचीं पाठांतरें पुष्कळ होऊन ती जवळ जवळ स्मरणसिद्ध झाली आहे असेच लोक केवळ ओव्या छापलेली, खिशांत मावण्यासारखी, आवृत्ति जवळ ठेवतात

ज्ञानेश्वरी हा ग्रंथ एवढा प्रचंड आहे कीं, कार्यपरत्व, प्रयोजनपरत्वें त्यातील संदर्भ काढून पाहावयाचे तर वरील प्रकारच्या कोणत्याहि पद्धतीनें छापलेलें ज्ञानेश्वरीचें पुस्तक पुरं पडत नाहीं ग्रंथाभ्यासाच्या नव्या पद्धतीप्रमाणें कोण त्याहि ग्रंथातील विषय, उपविषय, किंबहुना विशेष महत्त्वाचे शब्द हे फार थोड्या प्रयत्नानें उपलब्ध व्हावे, हुडकून काढता यावे, अशी अपेक्षा असते यामुळें प्रारंभीं विषयविभागवार अनुक्रमणिका व शेवटीं वर्णानुक्रमवार सूचिपत्र

ईहि देण्याची रीत पडली आहे. कोणताहि इंग्रजी ग्रंथ [illegible] त्यात वाचकाच्या या सोयी बहुधा सापडायच्याच. त्याचा मुख्य उपयोग हा की, ग्रंथात कोठें काय आहे हें क्षणार्धात लक्षात यावें व हुकुमी सापडावें. पैकी एक सरळ अली-कडे ज्ञानेश्वरीच्या साखरे–सम्प्रदायातील, ज्ञानेश्वरीचे अभ्यासू म्हणा, प्रवचनकार म्हणा, परमहंस कृष्णानंदस्वामी यांनीं भागविली आहे. ती ' ज्ञानेश्वरी-मार्गदर्शिकासूचि ' या नावाचें लहानसें ११० पानाचें पुस्तक प्रसिद्ध करून. पण आमच्या मतें याला ' सूचि ' म्हणण्यापेक्षा ' अनुक्रमणिका ' म्हटलेलें अधिक यथार्थ ठरेल. कारण त्यात वर्णानुक्रम नाहीं. यामुळें शब्दार्चे पहिलें अक्षर पाहून ग्रंथातील स्थळ नेमकें हुडकून काढणें हें घडत नाहीं. या साहाय्यभूत ग्रंथामध्यें अध्यायवार ओव्यांचे गट दिले असून, त्या गटात कोणता विषय आला आहे हें सांगितलें आहे. म्हणूनच ' सूचि ' हें नाव दिलेल्या या पुस्तकानें फक्त अनुक्रमणिकेचें काम भागतें. उदाहरणार्थ, पहिल्या अध्यायाच्या २७० ओव्यांचे ३१ गट त्यांनीं पाडले आहेत. जसें, २–२० गणेश-वर्णन, २२–२७ सद्गुरुनमन, २८–४९ भारतमाहात्म्य, ५६–६९ श्रोत्यांची प्रार्थना इत्यादि.

या सूचिनामक अनुक्रमणिकेनें ग्रंथात कोठें काय आहे हें स्थूलमानानें समजण्यास पद्धतशीर मदत काहीं होते. ज्ञानेश्वरीच्या एकंदर ओव्या, कृष्णानंदस्वामी यांच्या सम्प्रदायाप्रमाणें म्हणजे साखरे–प्रतीप्रमाणें, ९०३३ भरतात. ग्रंथकर्त्यानें त्यांचे १३७१ गट केले आहेत. या प्रत्येक गटाला आपण ' सूचि-बिंदु ' असें म्हणू. या १३७१ त १५५ सूचिबिंदु ज्ञानेश्वरीच्या एका ओवीस एक असे आहेत आणि एकंदरीनें सुमार ६–७ ओव्यांस एक सूचिबिंदु असें प्रमाण पडतें. अर्थात् या योजनेनेंहि ज्ञानेश्वरींतील विषय लक्षात येण्याला किती मोठें साहाय्य झालें तें पाहा. कारण नऊ हजार ओव्या वाचून जी विषयव्यवस्था लक्षात यावयाची ती ही तेरांशें लहान वाक्यें ओळीनें वाचून लक्षात येते. या प्रकारची काहीं थोडी व्यवस्था पूर्वीच्या फक्त एका आवृत्तींत आढळून आली, ती कै. आगाशे यांच्या ग्रंथात. या आवृत्तींत प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं ' विशेष स्थळें ' म्हणून दिलेलीं असतात आणि त्यात विषयाचे उल्लेख असतात. हेंहि ' सूचिबिंदु 'च होत व अठरा अध्यायात मिळून १८६ इतके सूचिबिंदु आगाशे यांच्या प्रतींत आहेत. अर्थात् त्या मानानं कृष्णानंदस्वामी यांनीं केवळ सूचिरूप केलेला ग्रंथ सहजच तितका अधिक उपयोगी ठरतो. कारण

कृष्णानंदस्वामी यांचें हें पुस्तक हातीं घेऊन जो ओळीनें वाचील त्याला ज्ञानेश्वरींतील विषयविवेचनाचा बोध स्थूलरूपानें पण थोडक्यांत समग्र होईल.

तथापि स्वामींच्या या ग्रंथाची उपयुक्तता आणखी वाढावी म्हणून आम्हांला अशी एक सूचना करावीशी वाटते कीं, या ग्रंथाची दुसरी आवृत्ति निघण्याची वेळ आल्यास या ग्रंथापुरती तरी विषयांची वर्णानुक्रमवार सूचि तयार करून ती या पुस्तकाबरोबरच छापावी; आणि फिरून तिलाहि साहाय्य म्हणून, आपल्या सूचिबिंदूंना त्यांनीं १ पासून १३७१ पर्यंत क्रमांक देऊन तेहि छापावे. याचें एक उदाहरण देऊं. या सूचि-ग्रंथांतील पृष्ठ ६३ वर असें आढळतें कीं, ज्ञानेश्वरीच्या १४ व्या अध्यायांत ७२-८० या ओव्यांत 'अज्ञाना'च्या स्वरूपाचें वर्णन आहे. आणि आम्ही स्वतः हातानें या सर्व सूचिबिंदूंवर क्रमांक मांडले आहेत त्याप्रमाणें या विशेष स्थळीं ७४४ हा आंकडा येतो. अर्थात् वर्णानुक्रम सूचीमध्यें 'अज्ञान' हा शब्द देऊन पुढें ७४४ हा आंकडा दिल्यास, ज्ञानेश्वरीच्या चौदाव्या अध्यायांत ७२ ते ८० या ओव्यांत गीतेंतील 'अज्ञान' या विषयाचें ज्ञानेश्वरकृत स्वरूपवर्णन सांपडतें असा बोध होईल. उलट असें पाहा कीं, ही सुधारलेली सूचि बाजूला ठेवून, डोळे मिटून आणि ज्ञानेश्वरी ग्रंथ हातांत घेऊनहि, 'अज्ञान' या विषयाची व्याख्या किंवा वर्णन ज्ञानेश्वरींत कोठें सांपडतें असा प्रश्न सुचल्यास त्याचें उत्तर मिळण्याला काय साधन? ज्ञानेश्वरी ही गीतेवरील अध्यायवार श्लोकवार टीका आहे हें खरें असलें तरी आधीं गीतेंत अज्ञान हा विषय कोठें आला आहे हें कसें कळणार! व तें कळल्यानंतर तो ज्ञानेश्वरीचा अध्याय काढून हुडकावा लागणार! पण सामान्य मनुष्याच्या हातीं गीतेच्या ज्या प्रती असतात त्यांत देखील सूचि दिलेली नसते हा मोठा दोष होय. नाहीं म्हणावयास आनंदाश्रमानें छापलेली गीतेची एक आवृत्ति मात्र अशी आहे कीं, तींत गीतेंतील प्रत्येक (मात्र समासांतर्गतहि) शब्दानुशब्द वर्णानुक्रमें सूचींत दिलेला आढळतो, व एखाद्या शब्दकोशाप्रमाणें तो क्षणार्धांत हुडकून काढतां येतो. ज्ञानेश्वरीची देखील अशीच एखादी आवृत्ति निघणें आवश्यक आहे. पण सर्वच्या सर्व शब्दांची सूचि नसली तरी महत्त्वाच्या शब्दांची तरी हवीच हवी! गीतेचे श्लोक अवघे सातशें. पण ज्ञानेश्वरीच्या ओव्या नऊ-सवानऊ हजार. आतां गीतेच्या एका श्लोकाचा अर्थ अवघ्या एका ओवींत सांगून ज्ञानेश्वरांनीं भागविलें अशीं कांहीं स्थळें सांपडतात. तथापि दुसरीं अशींहि कांहीं सांपडतात कीं, गीतेच्या एका

श्लोकावरील टीका तीन—चारशें ओव्या खर्च घातल्याशिवाय त्यांना सपवता आली नाहीं. यावरून केवळ गीतेंतील श्लोकाच्या अनुरोधानें ज्ञानेश्वरींतील विषय म्हणजे ज्ञानेश्वरांनीं स्वतंत्रपणें केलेले खुलासे व दिलेलीं वर्णनें हुडकून काढणें ही गोष्ट किती कठिण असेल याची कल्पना येऊं शकते.

ज्ञानेश्वरींतील अशीं स्वतंत्र रचनेचीं जीं स्थळें आहेत त्यांत हें आढळेल कीं, ज्ञानेश्वरांनीं आपलें काव्यकौशल्य, चिकित्साबुद्धि, प्रज्ञा, प्रतिभा सर्व कांहीं तेथें उदार हस्तानें खर्ची घातलीं आहेत. उदाहरणार्थ, गीतेच्या सहाव्या अध्यायांत योगाचें वर्णन किती थोड्या शब्दांत केलेलें असतां ज्ञानेश्वरांनीं ती योगप्रक्रिया व तिची फलश्रुति समजावून सांगण्याला शेंकडों ओव्या खर्ची घातल्या आहेत. हें ज्ञानेश्वरांचें स्वतंत्र ज्ञान म्हणावें लागतें. ती नुसती अर्थबोधक टीका नव्हे तसेंच गीतेच्या तेराव्या अध्यायांत प्रकृतीच्या अंगोपांगाचें वर्णन कांहीं थोड्या श्लोकांत आलें आहे. तें सोदाहरण वर्णन करून सांगण्याला ज्ञानेश्वरांनीं सुमारें एक हजार ओव्या खर्ची घातल्या आहेत ! पण टीकाकाराच्या दृष्टीनें कवीला हें भूषणास्पद ठरलें तरी सूचीच्या अभावीं संदर्भ शोधण्याला वाचकाला केवढी मोठी अडचण उत्पन्न झाली याचा विचार करावयाला हवा.

असो. अशा रीतीनें ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाचीं जीं साधनें आज उपलब्ध आहेत त्याविषयीं कृतज्ञता बाळगूनहि कांहीं नवीन 'सूचना करतां येण्यासारख्या आहेत. पूर्वीच्या साधनांचा विचार करतां, दोन ग्रंथकारांचा उल्लेख विशेष रीतीनें केला पाहिजे एक कै. ग. कृ आगाशे, मिरज संस्थानाचे एक वेळचे कारभारी, यांनीं मुळासह श्रीज्ञानेश्वरीटीका सहा भागांत प्रसिद्ध केली आहे तिचा विशेष हा कीं, त्यांनीं सर्वस्वीं चिकित्सापद्धतीचा अंगीकार केला आहे चिकित्सापद्धतीशिवाय दुसरा वेगळा प्रकार म्हणजे सांप्रदायिक. या सांप्रदायिक पद्धतींत मुख्यत: ओव्यांचा अर्थ पूर्वीं गुरुमुखानें ऐकला तसा गोळाबेरीज रूपानें सांगावयाचा. त्यांत प्रत्येक शब्दार्थ किंवा व्याकरण किंवा अन्वय यावर भर नाहीं. पण आगाशे यांनीं प्रत्येक ओवींतील बिकट शब्दांचे अर्थ तळटीपा देऊन सांगितले आहेत इतकेंच नव्हे, तर हे अर्थच अधिक योग्य कां हेंहि सांगितलें आहे. शब्दमूलाचा शोध केला आहे. प्रत्यंतरें दाखविलीं आहेत. कोठें अन्वय सांगितला आहे. प्रयोजन सांगितलें आहे. समानार्थक मागील पुढील संदर्भ काढून दिले आहेत. पाठांतरांची चिकित्सा केली आहे. शिवाय इंग्रजी, मराठी व संस्कृत वाङ्मयांतील म्हणी, वाक्प्रचार, अवतरणें हींहि कोठें

कोठें देऊन अर्थावर बाहेरचा प्रकाश पाडला आहे. यामुळे पुष्कळ ठिकाणीं सांप्रदायिक अर्थाहून आगाशे याचा अर्थ भिन्न पडला असला तरी तो ग्राह्य वाटतो. पण ' सर्वत्र आमचाच अर्थ बरोबर ' अशी आगाशे याचीहि प्रतिज्ञा नाहीं. उलट सांप्रदायिक लोक भाविक असले, तरी त्याना देखील अशी प्रतिज्ञा करवत नाहीं. याचें कारण असें कीं, चालेल तितकी बुद्धि चालविल्या-वरहि अज्ञातार्थ अशीं काहीं स्थळें ज्ञानेश्वरींत उरतातच. म्हणून सुदैवाची गोष्ट ही कीं, ज्याना आपण सामान्यतः सांप्रदायिक म्हणू त्याना देखील चिकित्सापद्धतीचें महत्त्व आता पटू लागलें आहे. उदाहरणार्थे, ह. भ. प. बकटस्वामी हे आपल्या ज्ञानेश्वरी आवृत्तीच्या प्रस्तावनेंत म्हणतात कीं, " संप्रदाय व चिकित्सा या दोन गोष्टी तमप्रकाशवत् विरुद्ध नसून, त्या एकत्रित होणें अशक्य नाहीं असें आमचें मत असल्यामुळें, आणि ग्रंथाच्या यथार्थ स्पष्टतेस त्या दोहोंची आवश्यकता असल्यामुळें या ग्रंथात अर्थ लावताना या दोनहि गोष्टी लक्षात घेऊन अर्थ केला आहे. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ अथपासून इतिपर्यंत आपणास समजला असें आपण छातीला हात लावून सांगतों असें म्हणणारा अगर समजणारा प्राणी दुर्मिळच असेल ! " आगाशे याच्या आवृत्तींतील दुसऱ्याहि एका अंगाचा उल्लेख केला पाहिजे. तें अंग म्हणजे उपसंहार हा होय. अशा तऱ्हेचा उपसंहार कोणत्याहि सांप्रदायिक आवृत्तींत केलेला नाहीं.

ज्ञानेश्वरी समजण्याचें मूलभूत साधन म्हणजे कठिण शब्दाचा कोश. हा फक्त बकटस्वामी याच्याच आवृत्तांत ' एकत्र ' मिळतो. त्यात कोशाच्या पद्धतीप्रमाणें वर्णानुक्रम असून सुमारें ५००० शब्द दिले आहेत. हें फार मोठें साहाय्य होय. इतर काहीं आवृत्त्यातून तळटीपेंत थोडेसे शब्दार्थ दिलेले असतात, त्याचा उपयोग आहेच, पण बकटस्वामींच्या या शब्दकोशाचा उपयोग सर्व कठिण शब्द एकत्र सापडणें हा असून, इतरहि एका रीतीनें होण्यासारखा आहे. म्हणजे त्या कोशाचा स्वतंत्र अभ्यास करता येण्यासारखा आहे व त्यावरून वर्णानुक्रमानें विषय काढता येण्यासारखे आहेत. तळटीपांत दिलेले शब्दार्थ तुटक असल्यास त्याचा पारसा तसा उपयोग होऊ शकत नाहीं. बकटस्वामींच्या या कोशात आम्हास फक्त एकच दोष वाटला तो असा कीं, सुपरिचित असेहि सामान्य संस्कृत शब्द काहीं काहीं या कोशात घातले आहेत. त्यानें व्यर्थ जागा अडविल्यासारखें वाटतें. ज्ञानेश्वरीच्या वाचकाला अगदीं पहिल्या वाचनाच्या वेळीं, दर ओवीगणिक एखादा तरी अपरिचित जुना शब्द किंवा

व्याकरणप्रयोग आढळतो. पुढील वाचनाच्या वेळीं हा घोटाळा कमी कमी होत जातो व ज्ञानेश्वरीच्या भाषेची मोडणी कळू लागते. तथापि अर्थ सांगितल्याशिवाय कळणार नाहींच असे मूलभूत शब्द काहीं उरतातच.

वरील दोन साधनांनीं ज्ञानेश्वरी वाचणें आता विशेष सुलभ झालें आहे. तरी वर दर्शविलेली विषयशब्दसूचीच्या अभावाची अडचण शिल्लक राहतेच. ती कशी निघून जाईल हा मोठा प्रश्न आहे. कारण गीतार्थ विशद करताना ज्ञानेश्वरानीं पदरचें इतकें नवें ज्ञान व नवे दाखले आपल्या ग्रंथात घातले आहेत कीं, त्याच्या अभ्यासाशिवाय ज्ञानेश्वरीचा अभ्यास व्यर्थ होय. खुद्द गीतेला सामान्यतः सूचि असत नाहीं ही अडचण वर दर्शविलीच आहे. आणि आनंदाश्रम प्रतीच्या साहाय्यानें गीतेंतील विषय हुडकून काढता आले तरी, आणि ज्ञानेश्वरी ही गीतेच्या श्लोकाचा अनुक्रम सांभाळणारी असली तरी, ज्ञानेश्वरींतील विशेष स्थळें हुडकून काढण्याला गीतेचा हवाला पुरा पडत नाहीं.

शिवाय अशी सूचि करण्याचें कोणीं उद्या मनात आणलें, तरी त्याच्या मार्गांत येणारी दुसरी अशी एक फार मोठी किंबहुना दुस्तर अडचण आहे, तिचा उल्लेख केला पाहिजे. ही अडचण म्हणजे अशी कीं, ज्ञानेश्वरींतील अध्यायवार ओव्यांची सख्या निश्चित नाहीं. ही गोष्ट लक्षात येण्याकरिता आम्ही जे कोष्टक पुढें दिलें आहे तें वाचकानीं पाहावें. या कोष्टकात आम्हीं राजवाडे, साखरेप्रभृति आठच आवृत्त्या घेतल्या आहेत. पण याशिवाय आणखी पाच–सहा आवृत्त्या शिल्लक उरतातच आणि त्यांतील ओव्यांच्या सख्येंतहि असाच फरक आहे. आम्हीं येथें न दिलेल्या आवृत्त्यात भारदे प्रत, वाईप्रत, तजावरप्रत, चिद्घनप्रत, मराठेप्रत, सोनारप्रत, निळोबाप्रत या घेतल्या नाहींत. ओव्यांच्या सख्येसंबधानें असें दिसतें कीं, सगळ्यांत कमी सख्या राजवाडे प्रतींत व सर्वांत जास्ती ओवीसख्या निळोबा प्रतींत आढळते. म्हणजे या दोन टोकात सुमारें ११०० ओव्यांचा फरक पडतो, आणि त्यांपैकीं प्रक्षिप्त कोणत्या व मूळ खऱ्या कोणत्या हा प्रश्न सहजच उत्पन्न होतो.

सर्वांत कमी सख्या असलेली राजवाडे प्रत घेतली तर मूळ लेखकाच्या हातून तिच्यामध्यें घेण्याच्या अनेक ओव्या सुटून गेल्या असतील, असा आक्षेप घेतां येतो. उलट दहा हजार ओव्यांची निळोबा प्रत घेतली तर तींत प्रक्षिप्त ओव्या वाटेल तितक्या भरल्या गेल्या आहेत हें अनुमान उघड होतें.

पण आम्हाला सूचीच्या सुधारणेपुरतें बोलतांना या मोठया फरकाबद्दल बोलावयाचें कारण नाहीं. आमची खरी अडचण ही आहे कीं, ज्या पाच–चार लोकप्रिय छापील आवृत्त्या वाचकांच्या हातीं आज आढळतात, त्यांच्यामधील निरनिराळ्या अध्यायातील ओव्यांच्या संख्येंतहि थोडाबहुत फरक पडतो. आता हा फरक किती थोडा असतो हें या कोष्टकावरून कळेल. पण सूचींत अध्याय व ओव्यांचा क्रमांक लिहावाच लागणार यामुळें, सबंध अध्यायात जरी एक–दोन ओव्याच कमजास्त झाल्या तरी पुढचे सगळे क्रमांक चुकत जातात. यामुळें एकच सूचि या सर्व प्रचलित आवृत्त्यानाहि उपयोगी पडणार नाहीं. याचा अर्थ प्रत्येक आवृत्तिकारानें वेगवेगळी सूचि आपल्या ग्रंथाला दिली पाहिजे ! तसें झालें तर उत्तमच. अशा सूचीला जागा लागते व छपाई काम वाढतें ही गोष्ट आहेना. तथापि एक चकरस्वामींचें उदाहरण घेतलें तर त्याना आम्ही हें सूचवू इच्छितों कीं, त्यानीं आपल्या आवृत्तींत नऊ हजार ओव्यांच्या प्रथम चरणातील निदान दोन–तीन शब्द देऊन जी ६० पानाची जागा अडविली आहे तीच या सूचीला त्यानीं खर्ची घातली असती, तर तेवढ्यांत काम भागलें असतें. त्यानीं दिलेली ओव्यांची वर्णानुक्रमणिका ही कोणाला उपयोगी पडणार ? तर नित्यपाठातरानें ज्याच्या तोंडीं जवळजवळ सगळा ज्ञानेश्वरी ग्रंथ येऊन बसला आहे त्याच्या उपयोगी ! पण वर्णानुक्रमानें ओवी हुडकून काढता येण्यापेक्षा विषयपरत्वें सूचीच्या साह्यानें ओवी हुडकून काढता आली तर ती अधिक बरी नव्हे काय ?

पुढील कोष्टकावरून हें दिसून येईल कीं, एकूण ओवीसंख्या ९०३२ असणाऱ्या आवृत्त्या ३ आहेत ( चकरस्वामी, मोघे, भिडे याच्या ). साखरे प्रतींत याहून एकच ओवी अधिक आहे. माडगांवकर प्रतींत आणखी २ ओव्या अधिक आहेत. कुटे प्रतींत आणखी २ ओव्या जास्त आहेत. अशा रीतीनें केवळ ५ ओव्यांच्या फरकानें सहा आवृत्त्या जवळजवळ येतात ! शिवाय याच आवृत्त्या विशेष प्रचारात आहेत. म्हणून आशा वाटते कीं, निदान या आवृत्तींच्या प्रकाशकानीं जरी एकमत करून ओवीसंख्या सारखी केली व ओव्यांचे क्रमांक एकच ठेवले, तर विषयसूचि करणें शक्य होईल. अशा रीतीनें एकमत झालें व विषयसूचींत या आवृत्याचेच संदर्भ दिले तर इतर आवृत्त्या मागें पडून, सहा आवृत्त्याची एकवाक्यता केलेली हीच आवृत्ति अधिक प्रसृत होईल.

## ज्ञानेश्वरी - ओवीसंख्या

| अध्याय | राजवाडे | साखरे | बकट स्वामी | कुटे | माडगावकर | मोघे | भिडे | विप्र-प्रत हस्तलिखित |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २७३ | २७५ | २७५ | २७५ | २७५ | २७५ | २७४ | २७५ |
| २ | ३७४ | ३७५ | ३७५ | ३७५ | ३७५ | ३७४ | ३७० | ३७४ |
| ३ | २७१ | २७६ | २७६ | २७६ | २७६ | २७६ | २७६ | २७६ |
| ४ | २२२ | २२४ | २२५ | २२५ | २२५ | २२४ | २२४ | २२५ |
| ५ | १७८ | १८० | १८० | १८० | १८० | १८० | १८० | १८० |
| ६ | ४९४ | ४९७ | ४९७ | ४९७ | ४९७ | ४९७ | ४९७ | ४९८ |
| ७ | २०५ | २१० | २१० | २१० | २१० | २१० | २१० | २११ |
| ८ | २६९ | २७१ | २७१ | २७१ | २७१ | २७१ | २७१ | २८५ |
| ९ | ५३० | ५३५ | ५३५ | ५३५ | ५३५ | ५३५ | ५३५ | ५३५ |
| १० | ३१० | ३३५ | ३३५ | ३३५ | ३३५ | ३३५ | ३३५ | ३३४ |
| ११ | ६९८ | ७०८ | ७०८ | ७०८ | ७०८ | ७०८ | ७०८ | ७०७ |
| १२ | २४४ | २४७ | २४७ | २४७ | २४७ | २४७ | २४७ | २४७ |
| १३ | ११६४ | ११७० | ११६९ | ११७१ | ११७१ | ११७० | ११७० | ११६९ |
| १४ | ४११ | ४१५ | ४१५ | ४१६ | ४१५ | ४१५ | ४१५ | ४१५ |
| १५ | ५६५ | ५९९ | ५९८ | ५९९ | ५९८ | ५९९ | ५९९ | ५९९ |
| १६ | ४७० | ४७३ | ४७३ | ४७३ | ४७३ | ४७३ | ४७३ | ४७२ |
| १७ | ४३० | ४३३ | ४३३ | ४३३ | ४३३ | ४३३ | ४३३ | ४३१ |
| १८ | १७९२ | १८१० | १८१० | १८११ | १८२१ | १८१० | १८१० | १८२६ |
| | ८९०० | ९०३३ | ९०३२ | ९०३७ | ९०३५ | ९०३२ | ९०३२ | ९०६० |

ओव्या प्रक्षिप्त कोणत्या याविषयीं कांहीं समुचित गमक मिळण्यासारखें असतें. त्या दृष्टीनें आगाशे यांनीं आपल्या प्रस्तावनेत चर्चा केली आहे. त्यात अठराव्या अध्यायातील तीन ओव्या प्रक्षिप्त ठरविल्या आहेत १२९४ व्या ओवीनंतर साखरे आणि कुटे-प्रतींत खालील ओव्या आहेत —

उत्तर वैराग्याचा राजा । पळता तू का निघालासि ध्वजा । हा शास्त्रस्वभाव तुझा । बुजवील तुज ( १२९५ )

महावीर अकरा, अक्षौहिणी । तुवा एकें नागविले रणागणीं । तो स्वभाव कोदंडपाणी । झुजवील तूतें ॥ ( १२९६ ).

१५४६ व्या ओवीनंतर वरील प्रतींत खालील ओवी आढळते —

' पूर्ण ब्रह्म झाला पार्थू । तरी पुढील साधावया कार्यार्थू । मर्यादा श्रीकृष्ण नाथू । उल्लंघों नेदी ॥ ( १५४७ ).

या ओव्या प्रक्षिप्त ठरविताना आगाशे यांनीं एक कबुली दिली आहे ती अशी कीं, ' उपरिनिर्दिष्ट दोन्ही स्थळीं त्या त्या ओव्या ग्रंथाची हानि न करता उलट परिपोष करितात. ' पण यानंतर लगेच ते विचारतात कीं, ' पण तसें असलें म्हणून त्यावरून ग्रंथकारानें त्या लिहिल्या होत्या असें कसें म्हणता येईल ? ' पण त्या ओव्या प्रक्षिप्त म्हणण्याला आगाशे यांनीं चांगलेंसें गमक दाखविलें नाहीं. आपलें म्हणून ते इतकेंच कारण पुढें आणतात कीं, (त्या ओव्या ज्ञानेश्वरींत असल्या तर ) प्राचीनतर प्रतींत त्या का दिसत नाहींत ? पण आगाशे हें विसरतात कीं, राजवाडे–प्रत ही तरी प्राचीनतर किंवा प्राचीनतम कोठें ठरते ? जुने सांप्रदायिक लोक राजवाडे–प्रत निर्णायक मानीत नाहींत, आणि अलीकडे डेक्कन कॉलेज संशोधक–संस्थेतील रा. हर्षे यांनीं 'विप्र–प्रत ' नावाची एक पोथी हीच प्राचीनतम म्हणून स्वीकारली आहे. तात्पर्य, पाठभेदाप्रमाणें हस्तलिखिताचा काळ वादग्रस्त ठरतो आणि हा वाद केवळ तर्कानें तुटण्यासारखा नाहीं.

परंतु चूक होण्याचा संभव असला तरी वर्ज्यावर्ज्य ठरवून एकच ' संहिता ' सर्वानुमतें ठरविल्यास सूचि इत्यादि सुधारणाची सोय होऊन सार्वजनिक हित साधेल. स्वयंपाकात क्वचित् एखादा बारीक खडा अज्ञात राहील या भीतीनें ' समाराधना ' बुडवू नये. तसेंच बा. अ. भिडे यांनीं १४ व्या अध्यायातील खालील ओवी प्रक्षिप्त ठरविली आहे—

जैसें का स्वप्न मोहा । तो एकाकी देखे बहुवा ॥
तोचि पाहु आतमया । स्मरणेंवीण असे ॥ ८५ ॥

भिडे म्हणतात, ' या ओवींतील यमकें ज्ञानदेवींच्या पद्धतीस अनुसरून नाहींत. शिवाय राजवाडे–प्रतींत ही ओवी नाहीं.' यापैकीं यमकें चूक आहेत हा आक्षेप आम्हाला पटतो. पण राजवाडे–प्रतींत ही ओवी सापडत नाहीं हा आक्षेप पटत नाहीं. कारण लेखकाच्या दृष्टिदोषामुळें ओव्या सुटून जाणें शक्य असतें. तात्पर्य, ज्ञानेश्वरीच्या सर्व आचार्यांनीं, सांप्रदायिकांनीं, प्रकाशकांनीं सहमत

होऊन विद्वान् लोकाची एक समिति नेमावी, आणि ज्ञानेश्वरींतील ओव्याची अध्यायवार सख्या व क्रम कायम करून घ्यावा आणि त्या निर्णयाप्रमाणें इतर आवृत्तिकारानीं चुकून राहिलेल्या ओव्या घालून आणि प्रक्षिप्त वाटणाऱ्या ओव्या कमी करून वाटल्यास अशी सुधारणा सार्वजनिक सोयीकरिता पत्करली आहे हें दर्शविणारी काहीं खूणहि करावी असें केल्याशिवाय शब्दसूचि विषयसूचि होणें दुरापास्त होय. पण अशी सूचि झाल्यानें ज्ञानेश्वरीच्या अभ्यास फार साहाय्य होईल

याशिवाय शेवटची म्हणून एक सूचना आम्हास करावीशी वाटते ती ही कीं, ज्ञानेश्वरी हा ग्रथ प्रचड असल्यामुळें तो कोणाचा सर्वच्या सर्व वाचून होत नाहीं ज्ञानेश्वरींत देखील मुख्य विषय सोडून अवातर असे विषय बरेच येतात काहीं नमनें, काहीं स्तवनें, काहीं गुरुशिष्यसवाद, काहीं अर्जुन-कृष्ण सवाद, काहीं अलकार व दाखले-याची पुनरुक्ति इत्यादिकाची भर पडल्यानें ज्ञानेश्वरी हा ग्रथ इतका मोठा वाटतो. शिवाय तो येवढा वाढल्यामुळें छापील प्रतीची किंमतहि भारी पडते. म्हणून आमची सूचना अशी कीं, कोणा तरी प्रकाशकानें ज्ञानेश्वरीची एखादी सक्षिप्त आवृत्ति काढावी. ती अशी कीं, तींत मुख्य महत्त्वाचा भाग सुटू नये, पण वर दर्शविलेल्या अवातर अगापैकीं काहीं काहीं कमी करावीं. असें केल्यानें ज्ञानेश्वरीचा परिचय व प्रसार वाढण्याला फार साहाय्य होईल. ही सूचना करण्यात ज्ञानेश्वरीच्या कोणत्याहि अगाला नाव ठेवण्याचा हेतु नसून, त्या तत्त्वज्ञानपूर्ण काव्यमय ग्रथाचा गाभा किंवा आत्मा सामान्य गरीब वाचकाला कसा सुलभ होईल इतकेंच दर्शविण्याचा आमचा हेतु आहे.

---

## ( ३ ) ज्ञानेश्वर चरित्रसार

श्रीसत ज्ञानेश्वरमहाराज याचा जन्म शके ११९७ युवानाम सवत्सरीं श्रावण वद्य ८ स मध्यरात्रीं झाला त्याचें घराणें यापूर्वी शेंकडों वर्षे आपेगाव येथें वसति करून राहिलें होतें. आपेगाव हें पैठणपासून चार कोसावर गोदावरी नदीच्या उत्तर तीरावर वसलेलें आहे पूर्वीपासून हा गाव देवगिरीकर यादव राजाच्या राज्यात मोडत असून त्याचें कुलकर्णी-वतन ज्ञानेश्वराच्या

घराण्याकडे फार वर्षे होतें. हे कुळकर्णी वत्सगोत्री माध्यंदिन शाखेचे यजुर्वेदी ब्राह्मण. ज्ञानेश्वरांच्या पूर्वीच्या सात पिढ्यांची माहिती साधारणपणें मिळते. परंतु त्यांचे पणजे त्र्यंबकपंत हे शके ११२९ सालीं जिवंत होते हें निश्चित समजतें. या घराण्याचे आप्तसंबंध देवगिरी ( आज दौलताबाद ) येथील माधवे, पैठणचे देवकुळे, व आळंदीचे कुळकर्णी यांच्याशीं पूर्वी झालेले होते. त्र्यंबकपंतांनीं कुळकर्णीपण संभाळून शिवाय बीड- परगण्याच्या देशाधिकाऱ्याचेंहि काम केलें. पण उत्तर वयांत त्यांनीं धार्मिक वाङ्मयाचा अभ्यास केला व नाथपंथी साधु गोरक्षनाथ हे आपेगांवीं आले असतां त्यांनीं नाथांची दीक्षा घेतली. त्र्यंबकपंताचा मुलगा व ज्ञानेश्वरांचा आजा गोविंदपंत हे घरीं राहून कुळकर्ण्याचें काम पाहत, व त्यांचे बंधु हरिपंत हे छोटेसे सैन्याधिकारी असून सेनानायकी करीत असतां त्यांना रणांगणावर शत्रूच्या हातीं मृत्यु आला.

गोविंदपंताला विठ्ठलपंत हा मुलगा झाला. तो पूर्ववयांतच विरागी बनला. त्यानेंहि नाथपंथाची दीक्षा घेतली आणि वेदशास्त्रांचें अध्ययन केलें. पुढें तीर्थयात्राच आरंभिल्या. त्या कांहीं केल्यावर तो आळंदीस आला, व त्यानें सिद्धेश्वराच्या देवळांत मुक्काम केला. आळंदीचे त्या वेळचे कुळकर्णी सिधोपंत यांना एक उपवर कन्या होती. तिच्यासाठीं ते वरशोधन करीत असतां त्यांची व विठ्ठलपंतांची गांठ पडली. विठ्ठलपंतांचें रूप, चर्या, वागणूक पाहून या मुलाला आपली मुलगी द्यावी असें सिधोपंतांनीं योजिलें व त्याप्रमाणें पुढें घडून आलें. आणि तें कार्य इतक्या त्वरितपणानें सिद्धीस गेलें कीं, मुहूर्त येवढा म्हणून आपेगांवाहून व्याहीमंडळींनाही आळंदीस आणवितां आलें नाहीं. नतर सावकाशपणे लग्न झालेलीं मुलगा–मुलगी हीं सर्व मिळून आपेगांवीं गेलीं. विठ्ठलपंत पूर्वीप्रमाणें आपला नित्य क्रम करीत राहिला. पण तो नित्यक्रम म्हणजे विरक्ति व हरिचिंतन. पंतांची बायको रुक्मिणी हिला या गोष्टीचा सहजच विषाद वाटून तिनें ती गोष्ट आपल्या. बापाला कळविली. तेव्हां सिधोपंत आपेगांवीं येऊन त्यांनीं त्या दोघां नवराबायकोंना आपणाबरोबर आळंदीस राहण्यासाठीं नेलें. पण विठ्ठलपंतांची विरक्ति कमी न होतां वाढली, आणि मूलबाळ झालें नव्हतें तरी काशीस जाऊन संन्यास घेण्याकरितां ते बायकोंची अनुज्ञा मागूं लागले. पण ती मिळेना असें पाहून सर्व काढीत निघून गेले. तेथें रामानंदस्वामींकडून त्यांनीं संन्यास–दीक्षा घेतली. मात्र ती घेतांना आपण अविवाहित आहोंत असें खोटेंच सांगितलें.

ही यातमी हळूहळू आळंदीस येऊन पोंचली. पुढें योग असा आला कीं, रामानदस्वामी हेच स्वतः यात्रा करीत हिंडत असता एकदा आळदीस आले, तेव्हा इतर बायकाप्रमाणें रुक्मिणी ही त्याच्या दर्शनाला गेली असता तिनें नमस्कार करिताच 'पुत्रवती भव' असा स्वामींनी सहजच आशीर्वाद दिला. तेव्हा रुक्मिणीला हसू आलें. तें पाहून स्वामींनी तिला विचारतां तिनें नवरा सन्यासी होण्याकरिता निघून गेला व त्याचा पत्ताही नाहीं असें सांगितलें. अधिक चौकशीकरिता आपण ज्याला सन्यास-दीक्षा दिली त्या विठ्ठलाचीच ही बायको असें त्याना समजलें. तें ऐकून त्याना वाईट वाटलें. काशीस परत गेल्यावर आपणाला खोटें वर्तमान सागून सन्यास घेतल्याबद्दल त्यानीं विठ्ठलाचा निषेध केला आणि 'फिरून ससार कर, सन्यास-दीक्षा घेतलीस ती व्यर्थ ठरते. कारण त्याच्या मुळाशीं असत्य आहे' असें ठासून सागितलें. तेव्हा निरुपाय होऊन विठ्ठलपंत गृहस्थाश्रमी बनला.

पाहणाराला हें सर्व सहजच विपरीत वाटलें. पण विठ्ठलपतानें तें मनावर घेतलें नाहीं. नतर अशा स्थितींत त्या पतीपत्नींना चार अपत्यें झालीं. तींच अनुक्रमें निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान आणि मुक्ता हीं सुप्रसिद्ध भावडें होत. आईबापासह हीं मुलें बाळींत असल्यामुळें त्याना अनेक तऱ्हाचा छळ सोसावा लागला. विठ्ठलपताला सर्वांत दुःख हें झालें कीं, मुज करण्याचीं मुलाचीं वयें झालीं तरी त्याची मुज यथाविधि होईना. पुढें ही सर्व मडळी त्र्यबकेश्वरा गेली. तेथें नाथपथी साधु गैनीनाथ आले होते, त्यानीं या सर्व कुटुबाला नाथपथाची दीक्षा दिली. नाथपथाचा आद्यगुरु श्रीशकर असा मानला जातो. परंतु या विशिष्ट नाथपथाच्या शाखेंत विष्णु-कृष्ण या वैष्णव देवताचीच उपासना स्वीकारली गेली होती.

आळदीस परत आल्यावर विठ्ठलपतानीं ब्राह्मणवृदाना आपल्यावरील बहिष्कार काढून घेण्याची पुन्हा विनति केली व प्रायश्चित्त असेल तर सागा तेंहि करतों असें ते म्हणाले. मीं फिरून गृहस्थाश्रम घेतला तो केवळ गुरूच्या आज्ञेनें, आणि बायकोची परवानगी न घेता मूळ सन्यास घेतला तो अशास्त्रीय व अविधि होता असें सर्व स्पष्टीकरण केलें. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. तथापि देहात प्रायश्चित घेतल्यानें ज्याचें निरसन होत नाहीं असें पाप नाहीं असें शास्त्रीलोकानीं सुचविल्यावरून विठ्ठलपत व रुक्मिणीबाई दोघानीं प्रयागक्षेत्रीं जाऊन गगेला आपले देह अर्पण केले! अर्थात् हीं चार भावडें

बहिष्कृत असून शिवाय अनाथहि झालीं. त्यांना घर ना दार. आश्रय कोणाचाच नाहीं. तथापि अशा स्थितींत तीं परस्परांना प्रेमाचा आश्रय देऊन राहिलीं. या अवधींत त्यांनीं अध्ययन केलें.

आपेगांवाहून आळंदीस परत आल्यावर या मुलांनीं फिरून एकदां बहिष्कार उठविण्याची विनंति ब्राह्मणवृंदांना केली. तेव्हां तुम्ही पैठणाला जाऊन तेथील शास्त्रीलोकाकडून मिळाल्यास शुद्धिपत्र घेऊन या असें सांगितलें. त्याप्रमाणें पैठणास गेल्यावर ज्ञानदेवांच्या हातून कांहीं चमत्कार घडला. हें पाहून ब्राह्मणांनीं त्यांना शुद्धिपत्र दिलें. पण तें मिळालें तरी या भावंडांनीं संसारात लक्ष न घालता भक्तिमार्गानें व धर्माचरणानें अखंड प्रवास स्वीकारून कालनिर्वाह करण्याचें ठरविलें. यामुळें अनेक ठिकाणच्या लोकांशीं त्यांचा संबंध येऊन अल्प वयातील त्यांची विद्वत्ता व साधुशीलत्व पाहून लोकांना मोठें कौतुक वाटलें. त्यांची कीर्ति होऊं लागली.

अशाप्रमाणें परिभ्रमण करीत असतां हीं भावंडें प्रवरातीरावरील नेवासें या गांवीं येऊन राहिलीं. तेथेंच ज्ञानदेवांनीं ज्ञानेश्वरी हा ग्रंथ लिहिला. पुढें आळंदीस गेल्यावर तेथील लोकांनीं त्यांची कीर्ति ऐकली असल्यामुळें त्यांना या खेपेला त्रास न देतां प्रेमानें वागविलें. त्यांचीं प्रवचनें होऊं लागलीं. त्यांच्या हातून चमत्कारहि घडूं लागले. पुढें ही मंडळी पंढरपुरास गेली. तेथें अनेक संतमंडळींची व त्यांची गांठ पडली. सर्वांचा मिळून एकच मेळा झाला, व त्यांनीं या मेळ्याच्या स्वरूपांतच तीर्थयात्रा करण्याचें ठरविलें.

या मेळ्याचा पुढारी संत नामदेव हा होता. या प्रवासात त्यांनीं कराड, तेरगाव, आवंढ्या नागनाथ, सातपुडा, धार, उज्जयिनी, प्रयाग, काशी, इंद्रप्रस्थ, गया, अयोध्या, गोकुळवृंदावन, द्वारका, गिरनार, मारवाड इत्यादि स्थळीं संचार केला. शेवटीं हा मेळा पंढरपुरास परत आला. तेथें यात्रेचें म्हावदें झाल्यावर निवृत्ति–ज्ञानदेवप्रमुख हीं भावंडें आळंदीला परत आलीं आणि लवकरच ज्ञानेश्वरांनीं तेथेंच समाधि घेतली. त्यानंतर फारच थोड्या अवधींत इतर तिघांहि भावंडांना निरनिराळ्या ठिकाणीं हिंडत असता मृत्यु आला.

जन्म—

शके ११९५ धीमुख संवत्सर माघ वद्य १ प्रातःकाळ– निवृत्तिनाथांचा जन्म.
शके ११९७ युवा सं० श्रावण कृष्ण ८ मध्यरात्र — ज्ञानेश्वरांचा जन्म.

शके ११९९ ईश्वर सं० कार्तिक शुद्ध १५ प्रहररात्र– सोपानदेवाचा जन्म.
शके १२०१ प्रमाथी सं० आश्विन शुद्ध १ मध्यान्ह– मुक्ताबाईचा जन्म.

मृत्यु–

१ ज्ञानेश्वरमहाराज–शके १२१८ दुर्मुखसंवत्सर, कार्तिक वद्य १३, आळंदीस.
२ सोपानदेव–शके १२१८ मार्गशीर्ष वद्य १३ संवत्सर उर्फ सासवड येथें.
३ मुक्ताबाई–शके १२१९ वैशाख वद्य १२ (ह्या पाहता पाहता गुप्त झाल्या.) तापीतीर.
४ निवृत्ती–शके १२१९ ज्येष्ठ वद्य १२ त्र्यंबकेश्वर येथें (पण यात्रा पौष वद्य ११ स.)

ज्ञानेश्वराना इतक्या लहान वयात ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथ कसा लिहिता आला याविषयीं आश्चर्य प्रगट करून, ते ग्रंथलेखनाच्या काळीं चांगल्या प्रौढ वयाचे असावे आणि म्हणूनच इतके परिणतप्रज्ञ असावे असें काहीं लोक अनुमान करितात. पण तेजाप्रमाणें बुद्धि व प्रतिभा हीं ईश्वरी कृपेनें अल्पवयातहि प्राप्त व प्रगट होऊं शकतात. याला प्रत्युत्तर म्हणून असें सांगता येईल कीं, बुद्धीप्रमाणें धैर्य ही देखील एक ईश्वरी देणगी आहे, आणि मराठेशाहींतील कर्तृत्वाच्या काळचा इतिहास वाचला तर अल्पवयी मुलें रणांगणावर जात, सैन्याचे अधिकारी म्हणून काम करीत, सहृ–कारस्थानें करीत असें आढळतें. कर्तृत्ववान् म्हणून नावाजलेले थोरले बाजीराव व थोरले माधवराव यांनीं अल्पवयातच सर्व कारभार आटोपला. विश्वासराव हा पानपतच्या रणांगणावर पडला तो सुमारें सोळासतरा वर्षांचा होता. त्यानें स्वतः तरवार चालविली नसेल. पण तो लढाईच्या घुमश्चक्रींत आघाडीवर हत्तीच्या अंबारींत होता. तो काहीं पिछाडीच्या बाजारबुणग्यांमध्यें तबूत राहुटीच्या आश्रयस्थानात पकडला किंवा मारला गेला नाहीं. आपल्या अगदीं परिचयाचें अलीकडील एक उदाहरण, वाङ्मयक्षेत्रातलें म्हणून अधिक लागू असें घेतलें, तर विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं निबंधमालेंतले उत्तमोत्तम निबंध लिहिले किंवा बालकवि ठोंमरे यांनीं आपल्या कांहीं उत्तमोत्तम कविता लिहिल्या तेव्हा ते किती वयाचे होते? आजकालच्या आंग्लविद्यापदवीधरातहि वयाच्या विशीच्या आत ज्यांनीं सर्व विद्या संपादली आणि आपल्या प्रज्ञाप्रतिभेचें तेज प्रगट केलें

असे कित्येक आढळतात. ज्ञानेश्वरांच्या सहाव्या अध्यायात खालील ओव्या आहेत—

> आणि निज ज्ञानाची पहाट फुटे।
> सूर्यापुढें प्रगटे। प्रकाश जैसा
> तैसी दशेची वाट न पाहता।
> वयसेचिया गावा न येता।
> बाळपणींच सर्वज्ञता। वरी तयातें
> सिद्धप्रज्ञेचेनि लाभें।
> मनचि सारस्वत दुभे।
> मग सकळ शास्त्रें स्वयंभें। निघतीं मुखें

ज्ञानेश्वरानीं वेद, उपनिषदें, महाभारत इत्यादि ग्रंथाचा चांगला परिचय करून घेतला होता असें दिसतें. त्यांच्या अध्यापनगुरुविषयीं विशेष माहिती मिळत नाहीं. परंतु या कामीं निवृत्तीनाथाचें साहाय्य विशेष झालें असावें असें वाटतें. कारण निवृत्तीनाथाशिवाय इतर कोणाचाही वदनपूर्वक उल्लेख गुरु म्हणून ज्ञानेश्वर करीत नाहींत. वडील बंधु म्हणून निवृत्तीनाथ हे ज्ञानेश्वराना सहजच आदरणीय असले तरी, ज्ञानेश्वरींत प्रगट झालेली निवृत्ती नाथाविषयींची भक्ति ही केवळ गुरुस्थानीं मानलेल्या वडील भावाविषयींच्या आदर बुद्धीहून कांहीं विशेष असली पाहिजे यात शंका नाहीं. निष्ठेनें ज्ञानेश्वर हे नाथपंथी असले तरी त्या पंथातील कोणा गुरूची प्रत्यक्ष सेवा त्यानीं केल्याचें दिसत नाहीं. स्वतंत्रबुद्धीनें त्यानीं हठयोगाचा अभ्यास चांगला केला होता. आणि या योगमार्गाबरोबरच चिंतन, मनन, लेखन हाच त्यांचा मुख्य व्यवसाय असताना असें दिसतें. त्यांची गणना संत व भक्त या वर्गांत होते हें उघड आहे. परंतु ते प्रत्यक्ष पंढरीचे वारकरी होते कीं काय याविषयीं वाद आढळून येतो. याचें कारण असें कीं, पंढरपूरक्षेत्र किंवा विठ्ठल दैवत याचा स्पष्ट उल्लेख ज्ञानेश्वरींत कोठेंच आढळून येत नाहीं. नामदेव व ज्ञानेश्वर हे खरोखरच समकालीन होते कीं काय याविषयींहि वाद आहे. ज्ञानेश्वर एक कीं दोन हा वाद प्रसिद्धच आहे अभंगकर्ता ज्ञानदेव व ज्ञानेश्वरीकर्ता ज्ञानेश्वर या दोन व्यक्ति एकच असाव्या या कल्पनेला पुष्कळाचा विरोध आहे. आणि स्वतः माझ्याहि मतें अभंग व ज्ञानेश्वरी यांच्या भाषेची

तुल्ना केल्यास अभंगकार ज्ञानदेव हा ज्ञानेश्वरानंतर बऱ्याच काळानें झाला असावा असें वाटतें. नावाची पुनरावृत्ति नेहमींच होते.

संतचरित्रसेवनांत ऐतिहासिक चिकित्सेची शुद्धि उरत नाहीं. तुकाराम-रामदास हे दोघे समकालीन असतां, जे इतर संत व संतकवि झाले तेहि सर्व समकालीन होते, इतकेंच नव्हे तर एकत्र रहिवासी होते, असेंहि मानण्याकडे भाविक मनाची प्रवृत्ति दिसते ! ! आणि नामदेव–ज्ञानेश्वर यांच्या पुढारी-पणानें सर्व संतमंडळींनीं एकनच एक मेळा बनवून तीर्थयात्रा केल्या ही कल्पना देखील अशीच निराधार असावी. बाकी चिकित्साशुद्धि सोडली तर सर्वच संतकाव्यें जवळजवळ एकाच वेळीं निर्माण झालीं असें मानावें असें वाटण्याला जुन्या गाथा व बाडें यांच्या छपाईनें सहाय्य झालें आहे खरें! अलीकडे सर्व भर पंढरपूर क्षेत्रावर पडलेला आहे. यामुळें एकवेळीं आळंदी हें क्षेत्र पंढरपुराइतकेंच जुनें व पवित्र मानलें गेलें होतें ही गोष्ट तितकीशी विचारांत घेतली जात नाहीं. पण माझ्या मतें आळंदीक्षेत्र हेंच ज्ञानेश्वराला क्षेत्र-सर्वस्व होतें.

---

## ( ४ ) ज्ञानेश्वरी ग्रंथ

ज्ञानेश्वरानीं आपली टीका पुराण पद्धतीनें लिहिली आहे यामुळें तींत मधून मधून विषयांतर झाल्यासारखें आणि पाल्हाळ केल्यासारखें वाटतें. परंतु तें सर्व पुराण पद्धतीला अनुसरून असून, त्यामुळें गीतातात्पर्य सांगण्याला उठाव येतो व विषयप्रस्थापनेला सहाय्य होतें. स्वतः पुराणिकापेक्षाहि श्रोतृगणाला मधून मधून अशी चाळवणी प्रियच असते. तिच्या योगानें कथासूत्र तर सुटत नाहींच, पण कृष्णार्जुन–संवाद कसा वेळीमेळीनें चालला होता, त्यांतील शंकासमाधानानें वर्णित विषयविभागाना सोपपत्तिकपणा कसा येत होता हें फार चांगलें दिसून येतें. शिवाय या अवांतर विषयाच्या आश्रयानें ज्ञानेश्वराना गुरुस्तुति, श्रोतृस्तुति इत्यादि करून उभयताविषयींची आपली आदरबुद्धि दाखविण्याची संधि मिळाली, त्याचप्रमाणें आपली प्रतिभा, आपलें पांडित्य, आपलें शब्द-सामर्थ्य, हीं प्रगट करण्याचीहि संधि मिळाली, आणि केवळ तिचाच उपयोग करून संवादरूप ग्रंथाला अधिक मनोरंजकता प्राप्त करून देतां आली, म्हणून

तें केवळ विषयांतर किंवा पाल्हाळ म्हणता येत नाहीं. अशीं स्थळें सर्व ज्ञानेश्वरीभर पसरलेलीं आहेत. म्हणून तीं याखालीं दिग्दर्शित करितों:—

अध्याय १— ओव्या व विषय—

१–२७ नमनें. २८–४९ भारतमाहात्म्य. ५०–७३ गीतामहत्त्ववर्णन. ५६–८४ गुरु व श्रोते यांना प्रार्थना व आशीर्वादयाचना. १७८–१७९ कृष्णाची मनःस्थिति.

अध्याय २ रा— ओव्या व विषय—

७०–८० कृष्णार्जुनावरील रूपकें.

अध्याय ३ रा— ओव्या व विषय—

२७४–२७६ पुढील अध्यायाचें बीजारोपण.

अध्याय ४ था— ओव्या व विषय—

१–६ गीतानिधानप्राप्तीविषयीं कृतज्ञता व श्रोतृसंवाद. २११–२२५ पुढील अध्यायाची प्रस्तावना.

अध्याय ५ वा— ओव्या व विषय—

१०–१४ देव व भक्त यांच्या संबंधाचें माम्यवर्णन. ६४–६८ श्रोतृसंवाद. १४१–१४३ निवृत्तीनाथाची पाल्हाळ न करण्याची सूचना. १८० पुढील अध्यायाची प्रस्तावना.

अध्याय ६ वा— ओव्या व विषय.—

१०–१३ अध्याय-महती. १४–२५ मराठी भाषेचें वर्णन. २६–३६ श्रोतृविनति. १२०–१३१ विस्ताराचें समर्थन. १३२–१३८ श्रोतृसंवादविलास. १९२–२९२–३१० ज्ञानेश्वरकृत योगप्रक्रिया व योगफलश्रुति यांचें वर्णन, व तद्विषयक काल्पनिक कृष्णार्जुन-संवाद. ४८९–४९७ श्रोतृसंवादविलास.

अध्याय ७ वा— ओव्या व विषय—

६८–१०२ मायानदीवर्णन. १८५–२०४ काल्पनिक कृष्णार्जुनसंवाद. २०६–२१० मराठी भाषेच्या उपयोगाचें समर्थन.

अध्याय ८ वा— ओव्या व विषय—

६–१४ अर्जुनभाग्यवर्णन.

अध्याय ९ वा— ओव्या व विषय—

१–१९ श्रोतृसंवादविलास. २०–३३ गुरुप्रार्थना व सभाश्वासन. १९७–२२७ ईश्वरभजनाचे प्रकारवर्णन. २३१–२३८ काल्पनिक कृष्णार्जुनसंवाद.

३१९–३२७ स्वर्गलोकवर्णन. स्वर्गेंद्रु लोकाच्या पुण्याचा निषेध. ५२२–५३२ संजय–धृतराष्ट्र संवादवर्णन.

अध्याय १० वा— ओव्या व विषय—

१–२३ सद्गुरुप्रार्थना, आत्मसमर्पन २४–४० पूर्वानुवाद. ४१–४७ मराठी भाषेचें श्रेष्ठत्व. ५३–६१ कृष्णार्जुनप्रेमवर्णन १४५–१४८ अर्जुनाच्या धन्यतेचे उद्गार. २०४–२०८ कृष्णार्जुनप्रेमाचें वर्णन. ३२४–३२६ कृष्णाचें काल्पनिक भाषण. ३३१–३३५ पुढीलाची प्रस्तावना.

अध्याय ११ वा— ओव्या व विषय—

१–७ कथारस–वर्णन. ८–१० मराठीचें समर्थन १६–२० गुरुशिष्य–संवाद. ४०६–४०८ भीतिग्रस्त अर्जुनाचें वर्णन ७०१–७०४ दोन रूपाचे दर्शनातील तारतम्यवर्णन. ७०८ ओवी प्रबंधाचें समर्थन.

अध्याय १२ वा— ओव्या व विषय—

१–१९ गुरुशिष्य प्रेमळ संवाद. ३४ कृष्णाचा आनंद. १५६–१६४ कृष्णार्जुन–प्रेमवर्णन.१८८–८९ देव व भक्त. २१४–२२९ भक्ताच्या आवडीचें वर्णन. २४६–२४७ मराठी भाषेचें समर्थन.

अध्याय १३ वा— ओव्या व विषय—

१–६ आत्मरूप गणेशस्तुति ४५५–४६० गुरुसेवेची महती व आवड. ६३०–६३३ तत्त्ववेत्त्याची महती. ६३४–६४९ श्रोत्यानी केलेलें ज्ञानेश्वर वर्णन व प्रत्युत्तर. ८५३–८६० श्रोते व ज्ञानेश्वर याचा संवाद. ९४८–९५२ विस्तार–समर्थन ११४५–११४८ कृष्णार्जुन प्रेमवर्णन ११५६–६७ मराठी भाषेच्या उपयोगाचें समर्थन.

अध्याय १४ वा— ओव्या व विषय—

१–३२ गुरुस्तुति व पाल्हाळाचा निषेध ६१–६४ कृष्णार्जुनप्रेमवर्णन ३२०–३२७ कृष्णार्जुन–संवाद. ४१०–४१६ संजय–धृतराष्ट्र याचा काल्पनिक संवाद

अध्याय १५ वा— ओव्या व विषय—

१–२८ गुरुस्तुति. ६८–७१ कृष्णार्जुनप्रेमवर्णन. १४४–२०८ अश्वत्थवृक्ष वर्णन ३२१–३३७ कृष्णार्जुन–संवाद ४४३–४६१ कृष्णार्जुनप्रेम व संवाद. ५८९–५९३ संजयधृतराष्ट्र. ५९४–५९८ मराठीचें कौतुक.

अध्याय १६ वा— ओव्या व विषय—

१–४० गुरुशिष्यसंबंधीं. ४७२–७३ संतप्रार्थना.

अध्याय १७ वा— ओव्या व विषय—

१–२० गुरुगणेंद्र नमन. ४६–४८ श्रीकृष्णस्वरूपवर्णन. ३८५–३८६ आत्म-समर्थन.

अध्याय १८ वा— ओव्या व विषय—

१–२९ सद्गुरुनमन स्तवन–समापण. ३०–३४–४९ गीताग्रंथविषयक. ५०–५९, स्वत. १८ व्या अध्यायाविषयीं. ७७–८९ कृष्णार्जुनविषयक. २८६–३०२ कृष्णार्जुनसंवादविलास. १३६८–१३८२ पुनः तेंच. १४१८–१४२५ पुनः तेंच. १४२६–१४५१ गीता हें वेदबीज आहे. १४५६–६६ गीतेचें वेदाहून श्रेष्ठत्व. १४७३–१४८५ अर्जुनाचें अद्वैत मोडून द्वैतावर आणणें. १४८६–४९ पुनः तेंच. १६६५–१६८३ गीताशास्त्रावरील काव्य. १६८४–१६८६ गीताशास्त्राचें महत्त्व. १७०९–१७२३ स्वत.चा ग्रंथकर्तृत्वाचा परिहार. १७२४–१७३६ गुरुगौरव. १७३७–५१ मराठीचें समर्थन. १७६५–१७७० गुरुपरंपरावर्णन. १७६५–१७७० गुरु व संत यांची प्रार्थना. १७९३–१८०१ प्रसाद–याचना व दान. १८०२–१८११ ज्ञानेश्वरी ग्रंथनिर्मितीचें स्थळ, काल, राज्याधिकारी इत्यादि.

ज्ञानेश्वरानीं स्वतंत्र बुद्धि व प्रतिभा उपयोगांत आणलेले विषय— १ वेद व गीता यांचे संबंध. २ वेदांचें सापेक्ष महत्त्व. ३ गणेश, सरस्वती, संत, गुरु, श्रोते माना नमनें. ४ श्रीकृष्ण व अर्जुन यांचे काल्पनिक प्रसंग, संभाषणें, प्रेम-जन्य देहस्थिति व भावना. ५ कर्मयोगी व स्थितप्रज्ञ यांचीं विस्तृत वर्णनें. ६ योग–प्रक्रिया. ७ विश्वरूपदर्शन–प्रसंग. ८ दैवी संपत्ति व आसुरी संपत्ति याच्या घटकांच्या व्याख्या. ९ ज्ञानअज्ञानादि गुणांच्या व्याख्या. १० गुरुपूजा–आचार्योपासना. ११ मार्ग चुकलेले योगी–भक्त–याज्ञिक. १२ मायानदीचें वर्णन. १३ अश्वत्थ, वृक्ष. १४ भक्ताची स्थिति इत्यादि.

वरील विषयविवेचनांत मूळांतील गीतेचा एखादा शब्द केवळ निमित्त मात्र आहे, पण त्या सर्व विषयांचें विवेचन ज्ञानेश्वरानीं जणु काहीं त्यावर आपण स्वतंत्र पद्यप्रबंध लिहीत आहों अशा मोकळेपणानें केलें आहे.

ज्ञानेश्वरानीं आत्मविश्वासाच्या भरांत ज्ञानेश्वरीचें जें वर्णन केलें आहे तें

सर्वच महत्त्वाचें आहे. त्यात त्याचा ग्रंथकर्तृत्वाचा हेतु कळून येतो, इतकेंच नव्हे तर ते त्याचें मूल्यमापन स्वतः कसें करितात हें कळून येतें.

या वर्णनात ओवी १७४१ (१८) ही मूळात अशी आहे— तैसा गाणीवेतें मिरवी । गीतेवीणहि रगू दावी । तो लोमाचा प्रयधु ओवी । केला मिया॥ यात गीतेवीण हा शब्द भ्रमोत्पादक आहे. असा कीं— या ओवीचा अर्थ साखरे-प्रतींत असा दिला आहेः "तसा गाणारा मेटला तरी ज्याला शोमा देतो व गाणारा नसला तरी त्याचें तेज पडतें असा हा सर्वलाभदायक ग्रथ मीं ओवी प्रबंधानें केला आहे." परतु बकटस्वामींच्या आवृत्तींत त्या ओवीचा अर्थ दिला आहे तो असा— "त्याप्रमाणें सस्कृत गीतेसह माझी मराठी टीका साग-ण्यात आली तरी शोमा आणील. (अथवा) सस्कृत गीता न सागता केवळ माझी मराठीच टीका सागितली तरी शोमा दाखविणारच." या दोन अर्थां पैकीं स्वतः आम्हाला हा दुसरा अर्थच अधिक योग्य वाटतो. १ गीतेवीण = गायिल्यावीण २ गीतेवीण = मूळ भगवद्गीतेशिवाय. पैकीं गीत गीता याचा जो सामान्य अर्थ गाण्यासबधीं तो येथें इष्ट नाहीं. गीता किंवा ज्ञानेश्वरी हे ग्रथ पद्यमय असले तरी, व कदाचित् हेलावर-स्वरावर म्हटले जात असले तरी, ते कोणी गात नाहीं. उलट टीका ही मूळ गीता ग्रथ लावून बरोबर न वाचली तरी अलड सुसबद्ध स्वतत्र रीतीनें अर्थबोधक ठरेल हाच अर्थ ज्ञानेश्वराना अभिप्रेत असणार. आणि तोच योग्य आहे. या एकाच ओवीवरून ज्ञानेश्वराची स्वतःच्या ग्रथकर्तृत्वाची खरी जाणीव कळून येते.

नाथपथी साधु हे सर्व मोठे सस्कृतज्ञ वा पडित होतेच असें आढळत नाहीं. तथापि ज्ञानेश्वराच्या सस्कृत भाषेच्या गाढ परिचयाचा अनुभव त्याच्या ग्रथात सर्वत्र आढळतो. याविषयीं ज्ञानेश्वरीच्या प्रत्येक अध्यायाच्या प्रारमीं त्यानीं केलेली ईश्वरस्तुति व गुरुस्तवन हीच वाचावीं म्हणजे झालें. यातील समास-घटित पदें अवजड, क्वचित् कर्णकटु, आणि अर्थ समजण्याला दुर्गम अशींहि झालीं आहेत. पण त्यावरून ज्ञानेश्वराना सस्कृत भाषा चागली अवगत असावी हें मात्र उघड दिसतें. या समस्त पदाच्या योजनेचा प्रारभ दहाव्या अध्यायापासून होतो. त्यापूर्वीच्या नऊ अध्यायात तीं आढळत नाहींत. तथापि पुढेहि अध्याय दहा, चौदा व अठरा यातच आढळतात इतर अध्यायाचे प्रारभ अशा क्लिष्ट पदानीं झालेले नाहींत. दहाव्या व अठराव्या अध्यायाच्या प्रारमीं घातलेल्या या समासघटित पदाचीं हीं काहीं उदाहरणेंच पहाः—

विशदबोधविदग्धा, विचारविंदप्रबोधा, परापद्मप्रमदाविलासिया, तरुणतरहेया-लालनलीला, शुभावभंजनभाजना, चतुरचित्तचकोरचंद्रा, मन्मथमन्मथा, जन्मजराजलदजालप्रभंजन, विदळितामंगळकुळ, विगतविषयवत्सल, निगमागमद्रुमफळ, जगदुन्मीलनाविरळ, केलिप्रिय, स्फुरदमदानंदबहळ, सुरनो-द्भवारंभस्तंभ, विबुधयोधास द्विरद, शमदमसदनमदभेद, जगदद्भुतगर्भनभ, अतिक्रांतकंदर्पसर्पदर्प, स्वसंविद्द्रुमबीज प्ररोहणावनी, अकल्पनाप्यकल्प, तरो इत्यादि या समस्त विशेषणांत केवळ शब्दयोजना विलासाची शुद्धि दिसून येते कारण अनुप्रासादिक शब्दालंकार प्रयत्नानें साधले आहेत. यामुळें सतामधील कवि प्रगट होतो! पण संस्कृत भाषेच्या या ज्ञानामुळेंच त्याचें मराठीवरील प्रेम सहेतुक ठरतें.

ज्ञानेश्वराच्या संस्कृत भाषाज्ञानाचें प्रत्यंतर हेंच कीं, 'भाष्यकारातें वाट पुसत' भी चाललों आहे असें ते म्हणतात. यावरून त्यांनीं एक वा अनेक गीताभाष्यें मूळ संस्कृतांतून वाचलीं असलीं पाहिजेत त्या कालीं तरी या संस्कृत भाष्याचें मराठी भाषांतर झालेलें नव्हतें हें सचित अध्याय १३ (६६) यांत ज्ञानेश्वरानीं वेदमतप्रदर्शक ब्रह्मसूत्राचा उल्लेख करून त्यांना क्षेत्रनिश्चय करता आला नाहीं असें सांगितलें आहे—

> येदींचें बृहत्सामसूत्र। जें देखणेंपणें पवित्र
> परी तयाहि हें क्षेत्र। नेणवेचि

भाष्याप्रमाणें ब्रह्मसूत्राचें वाचन, मनन ज्ञानेश्वरानीं केलें असावें असें वाटतें भाष्य वाचल्याचा पुरावा अनेक शब्दावरून उघड मिळतो

ज्ञानेश्वरानीं गीतेवरील आपल्या टीकेंत 'झाडा देईन प्रतिपदीं ग्रथार्थासी' असें म्हटलें आहे याचा अर्थ असा होतो कीं, 'गीतेंतला कोणताहि शब्द टीकेंत स्पष्टीकरण केल्याशिवाय माझ्या हातून सुटणार नाहीं.' यावरून शंकराचार्यांच्या प्रतिपद भाष्यासारखीच ज्ञानेश्वरी हीहि एक टीका असेल असें वाटतें. तथापि टीकेला 'भावार्थ दीपिका' हें नाव असल्यामुळें या वरील प्रतिज्ञेंतून सुटका झाली आहे आपण कांहीं काव्यादि ग्रंथावर जशा टीका पाहतों तशी ही टीका नाहीं तींत पदच्छेद, अन्वय, अर्थ, स्पष्टीकरण, व्याकरण इत्यादि अनेक प्रकार नाहींत, तर गीतेंतील श्लोकाचे गट मनानें करून त्यांतील आशय 'भावार्थ' आपल्या शब्दांनीं सांगावयाचा, पण त्याच्या स्पष्टीकरणार्थ

स्वत चें स्वतन विवेचन, दाखले—दृष्टात देऊन करावयाचें अशीच रीत ज्ञानेश्वरानीं अनुसरलेली आहे यामुळें ज्ञानेश्वरींत त्याचें स्पष्टीकरण किंवा अर्थ सागितलेले नाहींतें असे अनेक शब्द गीताश्लोकात राहिलेले सापडतील येवढेंच नव्हे, तर भावार्थ सागताना मुळाशीं सुटून असेंहि सागितलें काहा काहीं कोठें कोठें आढळेल याची छाननी 'श्रीज्ञानेश्वरदर्शन' या ग्रथात एक दोघा लवकार्नी केली आहे प्रा श्री ना बनहट्टी यानीं असा आक्षेप घेतला आहे कीं, 'सनियम्यैंद्रियग्राम सर्वत्र सम बुद्धय' या श्लोकाचा अर्थ पातजल योगपर लावला आहे तो बरोबर नाहा 'श्रेयो हि ज्ञानमभ्यासात् ज्ञानात् ध्यान विशिष्यते' इत्यादि श्लोकाचा अर्थ ज्ञानेश्वरार्नी भलताच लावला आहे, म्हणजे अभ्यासापेक्षा ज्ञान, ज्ञानापेक्षा ध्यान, ध्यानापेक्षा कर्मफलत्याग या क्रमानें अनेक मार्ग एकाहून एक श्रेष्ठ म्हणजे अर्थात् भिन्न असा अर्थ असता, ज्ञानेश्वरार्नी ते सर्व मार्ग एकाच शिडीच्या चढत्या पायऱ्या आहेत असें सागितलें आहे तें बरोबर नाहीं. तसेंच गीता अध्याय १ यातील ओव्या २, ५, ८, १९, २५ या श्लोकाचे ज्ञानेश्वरींत जें स्पष्टीकरण केलें आहे तें बरोबर नाही इत्यादि.

शकराचार्यांनीं गीतेवर जें भाष्य लिहिलें तें प्रनिषद भाष्य या नावानें प्रसिद्ध असून हें भाष्य लिहिण्याचा हेतु स्वत आचार्य सागतात तो असा—

'इम द्विप्रकारक धर्म नि श्रेयसप्रयोजन परमार्थतत्त्वच वासुदेवाख्य पर ब्रह्माभिधेय भूत गीताशास्त्र। यत तदर्थे विज्ञाते समस्त पुरुषार्थ सिद्धि इति अत तत् विवरणे यत्न क्रियते मया यथाच अत्र अर्थ तथा प्रकरणश विभज्य तत्र तत्र दर्शयिष्याम'

आचार्यांनीं गीतेच्या पहिल्या अध्यायावर भाष्य लिहिलेंच नाहीं दुसऱ्या अध्यायापासून प्रत्येक श्लोकातील प्रत्येक शब्द घेऊन ओळीन दरशब्दाला प्रतिशब्द देऊन स्पष्टार्थबोधक विवरण केलें आहे उदा० न शोच्या अशोच्या। अन्वशोच अनुशोचितवान् असि। प्रज्ञावता बुद्धिमता। वादाश्च वचनानिच। गतासून् गतप्राणान्। अगतप्राणा जीवत। पण्डिता आत्मज्ञा। पण्डा आत्मविषया बुद्धि येषा ते हि पण्डिता। 'पाण्डित्य निर्विद्य' इति श्रुते—इत्यादि

ज्ञानेश्वरांनीं आपल्या टीकेचा हेतु सांगितला आहे त्यांत शब्दाला प्रतिशब्द– संस्कृत शब्दाला मराठी प्रतिशब्द–असा कोठेंच सांगितला नाहीं. किंवा तसा सांगण्याची– तसें विवरण करण्याची प्रतिज्ञा केलेली नाहीं. प्रकरणवारी व श्लोकगटवारी ज्ञानेश्वर व आचार्य यांची एकच नाहीं.

ज्ञानेश्वरांनीं आपली टीका लिहिण्याचा हेतु केवळ एकाच ठिकाणीं निश्चित अशा शब्दांनीं सांगितलेला नाहीं. त्याचे हेतु अनेक ठिकाणीं विखुरलेले आहेत ते सर्व जमेस धरुनच त्याची कल्पना करावी लागते:—

> परी अपराधु तो आणीक आहे। जे मी गीतार्थ कवळूं पाहे
> हें अपार कैसेनि कवळावें। महा तेज कवळें धवळावें
> जरी जाहला अविवेकु। तरी संत कृपा दीपकु। सोज्वळु असे
> म्हणोनि मी प्रवर्तो आहे। ग्रंथीं इये
> तैसी जे ब्रह्मविद्या रावो। सकल शास्त्राचा विसंवता ठावो
> ते भगवद्‌गीता ओवीये गावो। ऐसें केलें
> आता निरोपीन प्रबंधु। अवधान धावें
> तो कृष्णार्जुन संवादु। नागरी बोली·विशदु
> सांगोनि दाऊं प्रबंधु। ओवियेचा
> म्हणोनि तुझिया प्रसादें। मी गीतापदें अगाधें
> निरोपीन विशदें। ज्ञानदेव म्हणे
> यालागीं आम्हा प्राकृतां। देशीकारें बंधें गीता
> म्हणौनि आथिलिया आराणुका। गीतार्थु हा निका
> अर्जुना हा ठाय वरी। मी तयातें सूये जिव्हारी
> जो गीतार्थाचें करी। परगुणें सता
> आता आणीन व्यक्ती। गीतार्थु हा
> तो गीतार्थु मराठीया बोलिजे। हा पाडु काई
> जो गीतार्थु हा आला मन्हाटिये
> या कारणें मिया। श्री गीतार्थ मन्हाटिया
> केला लोका यया। दिठीचा विषो

श्रीज्ञानेश्वरदर्शनात रा. अमृत वापूजी रसाळ म्हणतात त्याप्रमाणे वरील ओव्यांतून गीतार्थ शब्दाची जी योजना केली आहे, ती गीतेतील तत्त्वज्ञान, गीतारहस्य, अगर गूढ असे सत्वरूप, अशा व्यापक अर्थाची न समजता, गीतार्थ म्हणजे गीतेची मराठी मार्येत अत्यत सुलभ–समजण्यास सुलभ–अशी प्रतिकृति असा अर्थ उघड असल्याने गीतार्थ हा शब्द ज्ञानराजाच्या टीकाग्रथाचा वाचक होतो.

ज्ञानेश्वरी हा ग्रथ स्वतत्र नाहीं, कारण बोलून चालून ती गीतार्थ सागू इच्छिणारी टीका आहे. तथापि तो ग्रथ परतत्रहि म्हणता येत नाहीं. कारण ती गीतार्थ सागू इच्छिणारी टीका असली तरी तींत स्वतत्र बुद्धीचें विवेचन पुष्कळच आहे. गीतेवरील ही टीका लिहावयास घेण्यापूर्वी उपनिषदादि इतर वेदाती तत्त्वज्ञानप्रतिपादक ग्रथ वाचून ज्ञानेश्वरानीं आपली मनोभूमिका दृढ केली असावी यात सशय नाहीं. पण अगदीं स्वतत्र स्वमतप्रतिपादक असा एखादा आकर ग्रथ लिहिण्यापेक्षा, गीतेचा सर्वमान्य ग्रथच आधाराला घेऊन त्याला अनुसरून आपलीं मतें सागावीं हें, प्रथम प्रयत्न म्हणून तरी, ज्ञानेश्वराना इष्ट वाटलें असावें, आणि असें असल्यास त्यात काहींच चुकलें नाहीं कारण गीता हाच असा एक सर्वोत्कृष्ट तात्त्विक ग्रथ ज्ञानेश्वरापूर्वी शेंकडों वर्षे सिंहासनारूढ होऊन बसला होता कीं, त्याला वदन केल्याशिवाय पुढें जाणें हें कोणीहि कितीहि विद्वान् पडित झाला तरी त्याला पटणारें नाहीं असें सिद्ध होऊन राहिलें होतें. शकराचार्यांनीं व इतर अनेक आचार्यांनीं गीतेवर भाष्य लिहून हेंच दर्शविलें. तथापि *त्या सर्व पूर्वाचार्यांनी, गीतार्थ अयून सागत* असता स्वतःचें म्हणून काहीं मत सागण्याचा अधिकार बजावला तोच ज्ञानेश्वरानींहि बजावला. एखाद्या प्रवचनकारान पोथी पुढें ठेवून त्यातील एखादा श्लोक वाचावा आणि त्याचे स्पष्टीकरणाच्या कार्यांत आपली स्वतःची प्रज्ञा–प्रतिमा मरीला घालून वाटलें तर साधार व वाटलें तर निराधार म्हणता यावें इतकें सुटें व्याख्यान करावें, असें जें घडतें तेंच ज्ञानेश्वरानीं ज्ञानेश्वरी लिहून केलें आहे. वक्तृत्वसपन्न विद्वान् हरिदासहि आपल्या कथा, आपलीं कीर्तनें अशाच थाटानें करितात. मात्र गीतेवरील टीका लिहून आपली ग्रथलेखनाची भूक मागली नाहीं हें ज्ञानेश्वरानीं पुढें अमृतानुभव किंवा अनुभवामृत ग्रथ लिहून प्रत्ययाला आणिलें.

ज्ञानेश्वरांनीं गीतेवर टीका लिहिली खरी, पण ती लिहितांना बुद्धीला स्वातंत्र्यच नव्हे तरी कांहीं मोकळेपणानें वावरण्याला वाव आणून बुजून ठेवला हें अनेक रीतींनीं सिद्ध करिता येण्यासारखें आहे. याविषयीं प्रथमच हें सांगतां येतें कीं सुप्रसिद्ध वामनपंडित कवीनें गीतेवर 'यथार्थदीपिका' नामक टीका लिहून, ज्ञानेश्वराची टीका ही केवळ 'भावार्थदीपिका' अतएव अपूर्ण, मतलब-वादी असा दोष तिला दिला आहे. आणि या मुद्यावर पंडितपक्षपाती व संत-पक्षपाती असे दोन विवादी पक्षहि निर्माण झाले आहेत. एकाचें म्हणणें असें कीं, वामनपंडितांची कविता रुक्ष असली तरी तिच्यांतील गीतार्थ हा यथार्थ आहे. उलट ज्ञानेश्वराची कविता सरस असली तरी ज्ञानेश्वरानीं कोठें कोठें गीतार्थाला सोडून दिलें आहे, इतकेंच नव्हे तर क्वचित् गीतेचा अर्थ विपरीत केला आहे. अर्थात् असले आक्षेप कांहीं नवीन नाहींत. कारण गीतेवरील अनेक भाष्यांत मेळ नाहीं. यावरून त्यांतला कोणीतरी एकच सोडून बाकी सर्व विपरीत अर्थ प्रतिपादन करणारे असले पाहिजेत हें ओघानेंच म्हणतां येतें. शांकरभाष्य व गीतारहस्य यातील विरोध देखील स्वच्छ अर्थ सांगण्याच्या मुद्यावरच आहे. याविषयीं वामनपंडित काय म्हणतात पहा—

> परी आजी भगवंतजी । या कलियुगामाजीं
> जो तो गीतार्थ योजी । मतानुरूप
> या कारणें जी भगवंता । यथास्थित तुझी गीता
> वाखाणावी म्हणून होता । बहुत काळ संकल्प
> जे योजिती निर्गुण पर । त्यास सगुणीं अनादर
> सगुणींच योजिती जे नर । ते नेणती निर्गुणत्व

वास्तविक अशा मतभेदांना कारण स्वतः गीताच झाली आहे असें म्हटलें तरी फारसें चुकणार नाहीं. कारण गीता प्रसंगविशेषीं निर्गुण व सगुण या दोनहि रूपांना ( मात्र अंतिम ऐक्याचें—अद्वैताचें—तत्त्व न सोडतां ) महत्त्व देते. यामुळें निर्गुणोपासक—सगुणोपासक, अद्वैती—द्वैती हे दोघेहि ( संन्यासवादी व कर्मयोगवादी यांच्याप्रमाणें ) पूर्वग्रहनिष्ठ असल्यामुळें आपल्याला हवा तसा गीतेचा अर्थ लावून दाखविण्याला प्रवृत्त झाले तर त्यांत काय आश्चर्य ? पण गीता द्वैती म्हणणारांत किंवा अद्वैती म्हणणारांतहि परस्पर सूक्ष्म मतभेद दिसतातच. तात्पर्य, अशी स्थिति असताहि ज्ञानेश्वरानीं गीतेचा अर्थ केवळ स्वमताप्रमाणें लावण्याकरिता विपरीत केला असें म्हणणें धाडसाचें होईल.

मूळ,गीतेची श्लोकसख्या अवघी सातशें असता, ज्ञानेश्वरीची ओवीसख्या नऊ हजारावर भरते. केवळ यावरून त्यानीं ज्ञानेश्वरींत स्वमताचा स्वैर सचार केला असें ठरत नाहीं. कारण भावार्थदीपिकेच्या ओव्या नऊ हजार, तर वामन पडिताच्या यथार्थदीपिकेच्या ओव्या बावीस हजार भरतात! गीतेच्या एका श्लोकाला ज्ञानेश्वरींत '१२ ओव्या असें प्रमाण पडत असलें तर वामनपडिताच्या यथार्थदीपिकेंत ३१ असें प्रमाण पडतें. अर्थात् या प्रमाणावरून केवळ सत्यार्थ कथनाच्या प्रश्नावर काहींच निर्णयात्मक प्रकाश पडू शकत नाहीं उलट गीतेच्या एका श्लोकाला ज्ञानेश्वरींत एकच ओवी खर्चिली असल्याचीं उदाहरणें सापडू शकतात. हैद्राबादचे प्रो. जोशी यानीं, परिश्रमपूर्वक गणना करून, गीतेंतील कोणत्या अध्यायातील एकदर श्लोकसंख्येवर त्याच अध्यायातील ज्ञानेश्वराची ओवीसख्या कसकशी बसते याचें कोष्टकच दिलें आहे तें या प्रश्नावर बराच प्रकाश पाडू शकतें त्यावरून असें दिसून येतें कीं, उपक्रमोपसहार याना वाहिलेल्या ओव्या सोडून दिल्या असता, ज्ञानेश्वरानीं गीतार्थ सागण्याकरिता योजलेल्या ओव्याची सख्या अध्यायवार अशी भरते—

| अध्याय | गीतेची श्लोकसख्या | ज्ञा ओव्याची सख्या | ओव्याचें दर श्लोकी प्रमाण |
|---|---|---|---|
| १ | २७ | २७५ | ४ |
| ४ | ४२ | २२५ | ४ ६ |
| २ | ७२ | ३७१ | ५ |
| ५ | २९ | १८० | ५ ५ |
| ७ | ३० | २१० | ६ १ |
| ३ | ४३ | २७६ | ६ ३ |
| १० | ४२ | ३३५ | ६ ४ |
| ८ | २८ | २७१ | ९ ४ |
| ६ | ४७ | ४९७ | ९ ५ |
| १२ | २० | २४७ | ११ |
| ११ | ५५ | ७०८ | ११ ९ |
| * १४ | २७ | ४१५ | १३ ५ |
| १७ | २८ | ४३३ | १३ ९ |
| ९ | ३४ | ५३५ | १४ ३ |

| अध्याय | गीतेची श्लोकसंख्या | ज्ञा. ओव्यांची संख्या | ओव्यांचें दर-श्लोकी प्रमाण |
|---|---|---|---|
| १६ | २४ | ४७३ | १६.७ |
| १८ | ७८ | १८१० | २०.७ |
| १५ | २० | ५९९ | २५.८ |
| १३ | ३४ | ११७० | ३३.५ |

पहिल्या पहिल्या काहीं अध्यायांतील टीका अगदीं त्रोटक आहे. उदाहरणार्थ, गीतेच्या दुसऱ्या अध्यायांतील श्लोक १८ आणि २२ यावर केवळ एकेरी ओवीचीच टीका आहे. आणि त्यांत प्रतिपदाचा अर्थहि सांगितलेला नाहीं.

> अंतवंत इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।
> अनाशिनोऽप्रमेयस्य

यावरील टीका—

' आणि शरीरजात आघवें हें नाशवंत स्वभावें ' इतकीच आहे.

तसेंच—

> वासांसि जीर्णानि यथा विहाय
> नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।
> तथा शरीराणि विहाय जीर्णा
> न्यन्यानि संयाति नवानि देही ॥

यावरील टीका—

> जैसें जीर्ण वस्त्र सांडिजे । मग नूतन वेढिजे ।
> तैसें देहांतरातें स्वीकारिजे । चैतन्यनाथें ॥

इतक्या मोजक्या शब्दांनींच दिली आहे. किंवा तिसऱ्या अध्यायाच्या ४१ व ४२ या श्लोकावरील टीका एकेका ओवीतेंच भागविली आहे—

> तस्मात्त्व इंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।
> पाप्मानं प्रजहि ह्येनं । ज्ञानविज्ञाननाशनं ॥ ( गीता )
> याचा पहिला कुरुठा इंद्रियें । एथूनि प्रवृत्ति कर्मातें विये ।
> आधीं निर्दळूनी घालीं तियें । सर्वथैव ॥ ( ज्ञाने० )

इंद्रियाणि पराण्याहु इंद्रियेभ्य पर मन ।
मनसस्तु परा बुद्धि । यो बुद्धे परतस्तु स ॥ ( गीता )
मग मनची धाव पारुषेल । आणि बुद्धीची सोडवण होईल ।
इतुकेनि थारा मोडेल । या पापियाचा ॥ ( ज्ञाने० )

येथें मुळातील किती तरी शब्द टीकेशिवाय सुटले आहेत मूळ वेगळें व टीका वेगळी असाहि भास होतो वास्तविक ज्ञानेश्वरानीं मनात आणलें असतें तर ही कल्पना त्यानीं किती तरी नटविली–रगविली असती.

या पहिल्या पहिल्या अध्यायात प्रत्येक श्लोकागणिक कोठें दोन कोठें तीन अशा ओव्या सापडतात. पुढील अध्यायात ज्ञानेश्वरानीं टीका इतकी विस्तारली आहे कीं ज्यावर शेपन्नास ओव्या लिहिल्या असे श्लोक कैक सापडतील.

गीताध्याय अकरामध्यें मूळ श्लोक इतकाच आहे—

पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रश ।
नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥

पण या नाना रूपाचें वर्णन करिताना ज्ञानेश्वरानीं स्वतची प्रतिभा किती चालविली आहे पहा—

कृश स्थूल, ऱ्हस्व विशाळ, पृथुतर सरळ, अप्रात, अनावर प्राजळ, सव्यापार निश्चळ, उदासीन स्नहाळ, तीव्र, घूर्णित सावध, असलग अगाध, उदार, अतिबद्ध, क्रुद्ध, शात सन्मद, स्तब्ध सानद, गर्जित नि शब्द, सौम्य, साभिलाप विरक्त, उन्निद्रित निद्रित, परितुष्ट आर्त, प्रसन्न, अशस्त्र सशस्त्र, रौद्र अतिमित्र, भयानक विचित्र, स्वस्थ, जनलीला विलास, पावनशील लालस, सहारक साक्षेप, साक्षीभूत, सुवर्ण, कपिलवर्ण, शेंदुरानें डवरलेलें, स्फटिक सोज्वळ, इद्रनीळ सुनीळ, अजनवर्ण, रक्तवर्ण, सोनेरी पिवळें, मेघासारखें सावळें, चापेकळी-सारखें गोरें, तापलेल्या ताब्याप्रमाणे लाल, चद्राप्रमाणें शुभ्र इ०

ज्ञानेश्वरानीं ' भाष्यकारातें वाट पुसत मी आपली टीका लिहिली ' असें म्हटलें आहे. यातील ' भाष्यकारातें ' या शब्दातील ' रा 'वर अनुस्वार आहे कीं नाहीं हा एक पाठातरविषयक चिकित्सेचा व वादाचा विषय होऊन राहिला आहे. कारण अनुस्वार नसेल तर शब्द एकवचनी होतो, आणि ज्ञानेश्वरानीं एकाच कोणातरी भाष्यकाराचा आधार घेतला आणि तो एकच म्हणजे

शंकराचार्यच असें अनुमान निघतें, असें एका पक्षाचें म्हणणें पण अनुस्वार असून शिवाय तो केवळ बहुमानार्थी नाहीं, तर बहुवचनार्थी आहे, यावरून ज्ञानेश्वरांनी अनेक भाष्यांचा आधार घेतला असें दुसऱ्या पक्षाचें म्हणणें आहे. पण नुसत्या अनुमानावर हवाला न देता दोनहि पक्षांनीं आपापलें मत प्रस्थापित करण्याकरिता विवक्षित भाष्य व ज्ञानेश्वरींतील त्याच मुद्यावरचीं वचनें यांचा मेळहि घालून दाखविला आहे. मुख्यत शंकराचार्यांचेंच भाष्य ज्ञानेश्वरापुढें होतें असें म्हणणारांत प्रमुख म्हटले म्हणजे नागपूरचे विद्वान् प्राध्यापक डॉ पेंडसे हे होत आणि इतर कोणा भाष्यकाराना ज्ञानेश्वरांनीं अनुसरलें असो किंवा नसो, पण इतर भाष्यांचा आधार निश्चित घेतला असें म्हणणारांत आळंदी येथील संस्थानचे एक पंच व सतवाङ्मयाचे विद्वान् अभ्यासक पांडुरंगशर्मा हे प्रमुख आहेत डॉ पेंडसे यांनीं आपल्या मतपुष्टयर्थं अध्यायवार उतारे देऊन ' श्री ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान ' या ग्रंथात खालीलप्रमाणें निष्कर्ष काढिला आहे ते म्हणतात. ( पृ० १६६ ) ' एकदर २१८ स्थलांची तुलना केली त्यात असें दिसलें कीं १४६ ठिकाणीं तत्त्वज्ञानाच्या व अर्थाच्या दृष्टीनें ज्ञानेश्वराच्या टीकेंतील शब्द शंकराचार्यांच्या भाष्याशीं मिळते-जुळते आहेत पैकीं ४२ ठिकाणीं शंकराचार्यांचेच शब्द ज्ञानेश्वरांनीं योजिले आहेत. १० ठिकाणीं शंकर व ज्ञानेश्वर यांचे दृष्टांत सारखे आहेत, व ५७ ठिकाणीं शंकराचा अर्थ घेऊन रामानुजाचा टाकला आहे. ६८ ठिकाणीं शंकराचा किंवा रामानुजाचाहि अर्थ न घेता ज्ञानेश्वरांनीं स्वतंत्र अर्थ केले आहेत ३८ ठिकाणीं तर निर्गुण किंवा मायावादपर अर्थ शंकरापेक्षाहि पुढें जाऊन किंवा त्याच्याहिपेक्षा स्पष्ट केले आहेत एका ठिकाणीं शंकर व रामानुज दोघांच्याहि अर्थाचा समुच्चय केला आहे आणि फक्त ५ ठिकाणीं शंकराला सोडून रामानुजाचा अर्थ स्वीकारला आहे तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें शंकराला विरोधी असें एकहि स्थळ नाहीं '

याच्या उलट पांडुरंगशर्मा यांचें मत असें कीं, ' ज्ञानेश्वरांनीं आपल्या तत्त्वज्ञानाचा विधायक भाग, विष्णुस्वामी परपरेंतील ( वल्लभ सप्रदायातील ) विधायक तत्त्वज्ञानाशीं जवळचेंच नातें लागेल व परस्पराचे बरेचसे गुण जमतील, अशा थाटाचा मांडला आहे.' ' सह्याद्री 'च्या गेल्या जानेवारीच्या अंकात पांडुरंगशर्मा यांनीं याच विषयावर एक लेख लिहून व सुमारें ४५ उदाहरणें देऊन हें दाखविलें आहे.

या वादांतून निदान हें सिद्ध होतें कीं, अनेक भाष्यें वाचून ताडून पाहण्या-इतकें संस्कृताचें ज्ञान व चिकित्सक बुद्धि ज्ञानेश्वरांना होती, आणि अनुसरणाची उदाहरणें एका भाष्यापेक्षां दुसऱ्या भाष्यासंबंधीं अधिक दिसलीं किंवा असलीं तरी ज्ञानेश्वरांचें स्वतःचें म्हणून एक मत होतें. तसेंच भाष्यांचा आधार त्यांनीं घेतला असेल तो केवळ आपल्या स्वतःच्या मताला पुष्टिदायक असेल तेवढाच घेतला असेल.

एकंदर संतकवींत ज्ञानेश्वर, एकनाथ हेच काय ते संस्कृतज्ञसे वाटतात. पण त्यांतल्या त्यांत ज्ञानेश्वर हे संस्कृतज्ञ असून शिवाय स्वतंत्र बुद्धि चालविणारे होत.

---

## (५) ज्ञानेश्वरी व वेदादि

वेद हे सर्वच वंदनीय, पण त्यांतहि कांहीं विशेष स्वीकार्य आहे इतकेंच कुशलतेनें ज्ञानेश्वर म्हणतात. वेदांत कांहीं टाकाऊ-त्याज्य आहे असें मात्र ते स्पष्ट म्हणत नाहींत. कारण वेदांची निंदा कशी करावी? अध्याय १ मध्यें ते म्हणतात—' जरी वेदें बहुत बोलिलें। विविध भेद सूचिले। तरी आपण हित आपुलें। तेंचि घेपें' ॥ कसें? तर—' जैसा प्रगटलिया गभस्ती। अशेषहि मार्ग दिसती। तरी तेतुलेहि काय चालिजती। सांगें मज॥' इतर मार्गेहि स्वीकारणीय, पण ते इतरांना!

तसेंच ज्ञानेश्वरीमध्यें ज्या ज्या ठिकाणीं स्वर्गलोकाचा उल्लेख आला आहे त्या त्या ठिकाणीं स्वर्गाला नाक मुरडलेलें आहे. आणि स्वर्गाला स्पृहणीय म्हणून मनुष्यदृष्टीपुढें ठेवल्याबद्दल वेदांना दूषण दिलेलेंच आढळेल. अमृतानु-भवांत तर याहून स्पष्ट शब्दांनीं वेदांची अवज्ञा केलेली आढळते. ज्ञानेश्वर हे अद्वैती–ज्ञानवादी–सत्वादी असल्यामुळें त्यांना वेदांविषयीं प्रामाण्यबुद्धि ठेवणें कठीण गेलें. कारण स्वतः वेदांमध्यें (उपनिषदादि वाङ्मयांत नव्हे) तत्त्वज्ञान असें फार थोडें आहे. ज्ञानेश्वरांची वेदविषयक आदरबुद्धि पुष्कळशी औप-चारिक व परंपरागत असावी.

ज्ञानेश्वरीच्या पहिल्या अध्यायांत महाभारत व गीता यांची स्तुति व महत्त्व-वर्णन आहे तथापि प्रत्यक्ष वेदांना नमन नाहीं. गीतेचा मुख्य विषय म्हणजे

ईश्वरस्वरूपवर्णन तें वेदानाहि यथार्थ करिता येत नाहीं. त्या 'अगाधा 'चा परामार्ष घेताना ' ज्ञेय वेडावती वेद ' येवढेंच म्हटलें आहे. मात्र ज्या गीतेचें महत्त्व ज्ञानेश्वरानीं इतकें वर्णिलें तिला ' वेदार्थ सागरू ' म्हटल्यानें वेदाची अप्रत्यक्ष स्तुति झालीच. पण वेदातील प्रत्यक्ष विषय काय आहे त्याचा या-परता उल्लेख नाहीं. उल्लेख येतो मुख्यत: वेदानीं सांगितलेल्या यज्ञमार्गाचा, व तो प्रथमच असा दोषदर्शक—

> वेदाधारें बोलती । केवळ कर्म प्रतिष्ठिती
> परी कर्मफळीं आसक्ति । धरूनिया ॥
> म्हणती संसारीं जन्मिजे । यज्ञादिक कर्म कीजे
> मग स्वर्गसुख भोगिजे । मनोहर ॥
> एथ हें वाचोनि काहीं । आणिक सर्वथा सुखचि नाहीं
> ऐसें अर्जुना बोलती पाहीं । दुर्बुद्धि ते ॥
> क्रिया विशेषें बहुतें । न लोपिती विधीतें
> निपुण होऊनी धर्मातें । अनुष्ठिती ॥
> परी एकचि कुडें करिती । जे स्वर्गकामु मनीं धरिती
> यज्ञपुरुषा चुकती । भोक्ता जो ॥
> म्हणोनि हे पार्था । दुर्बुद्धि देख सर्वथा
> तया वेदवादरता । मनीं वसो ( अ० २ )

हें झालेंच. पण उलट पुढें स्पष्ट शब्दात आहे ती वेदाची एक प्रकारें निंदाच आहे—

> तिहीं गुणीं आवृत । हे वेद जाणे निभ्रांत
> म्हणोनि उपनिषदादि समस्त । सात्त्विक ते

यावरून हें उघड ठरतें कीं, ज्ञानेश्वरानीं गीतेला 'वेदार्थ सागर' म्हटलें तेथें वेद याचा अर्थ उपनिषदादि वैदिक तत्त्वज्ञानग्रंथच मुख्यत: जमेला धरून म्हटलें. तोच विचार रेटून ' वेद पुष्कळ हवें तें सांगतात म्हणून काय तें सगळें आहे तसेंच घ्यावयाचें नाहीं ' असा गीतेला अनुसरून ज्ञानेश्वर दृष्टान्तादि देतात—

> जरी वेदें बहुत उपदेशिलें । विविध भेद सूचिले
> तरी आपण हित आपलें । तेचि घेवें ॥

> जैसा प्रगटलिया गमस्ती । अशेषहि मार्ग दिसती
> तरी तेतुलेहि काय चालिजति । सांगें मज ॥
> का उदकमय सकळ । जरी जाहले असे महीतळ
> तरी आपण घेपें केवळ । आर्तीचजोगें ॥
> तैसे ज्ञानिये जे होती । ते वेदार्थातें विवरिती
> मग अपेक्षित स्वीकारिती । शाश्वत जें ॥

पधराव्या अध्यायात वेदातील तत्त्वज्ञानाचा आधार गीतेनें घेतला आहे तो असा कीं अश्वत्य वृक्षाचें वर्णन करिताना त्या वृक्षाचें मूळ माया ही होय असें वेदामध्यें सागितलें आहे, आणि वेद जाणणारे तेंच म्हणतात असें म्हटलें आहे पण

घन अज्ञान सुषुप्ति । तो बीजाकुर मावो म्हणती । येर स्वप्न हन जाग्रती । हा फळ भावो तयाचा ॥ ऐसीं यया वेदार्ती । निरूपण माया प्रतीति ।

अर्थात् हा वेदाताचा उल्लेख वेदसंहितेविषयीं नसून उपनिषदाचा आहे.

याच पधराव्या अध्यायात गीतेच्या मूळच्या 'वेदैश्च सर्वै अहमेव वेद्य' या श्लोकचरणावर टीका करिताना ज्ञानेश्वरानीं वेदाना थोडासा टोलाच दिला आहे ते म्हणतात—

> म्हणोनि जैसा असे तैसया । मातें नेणोनी धनजया
> वेदु जाणों गेला तव तया । जालिया शाखा ॥
> तरी तिहीं शाखभेदीं । मीचि जाणिजे निरुद्धी
> जैसा पूर्वापरा नदी । समुद्रुचि ॥
> आणि महासिद्धातापासी । श्रुति हारपती शब्देसी
> जैसिया सगधा आकाशीं । वात लहरी ॥

आठव्या अध्यायात म्हटलें आहे तेंहि असेंच—

> ऐसें जें पद । दुर्लभ आणि अगाध
> जयाचिये थडियेचि वेद । झुबुकळिले ठेले ॥

पधराव्या अध्यायात 'वेद मला पुरुषोत्तम म्हणतात' इतकेंच सागितलें आहे.

सतराव्या अध्यायात इतकेंच म्हटलें आहे कीं, ॐ तत्सत् ही खूण वेदानीं अज्ञाकरिता उत्पन्न केली कीं अज्ञानाच्या रात्रीं परब्रह्म हें त्या खुणेनें ओळखावें

आठव्या अध्यायातहि फक्त इतकेंच सागितलें आहे कीं, वेदाच्या अध्ययनानें

पुण्य मिळतें. पण तत्त्वज्ञानदृष्ट्या ही फारशी मोठी स्तुति नव्हे हेंच स्पष्ट करून अकराव्या अध्यायात असें म्हटलें आहे कीं, वेदाध्ययनानें-पठणानें पुण्य मिळत असलें तरी सष्टा शास्त्रासह वेद हे विश्वरूपापासून मागें हटले.

ज्ञानेश्वरींत कोठेंहि पहा, बहुधा वेदनिर्दिष्ट यज्ञमार्गाची निंदाच आढळेल. उदाहरणार्थ, सोळाव्या अध्यायात प्रथम वेदाना नावें ठेवणाराला दूषण दिलें आहे, मात्र तें वेदातील श्रेष्ठ तत्त्वज्ञान अमान्य करणाराला. पण मग वेदानीं प्रशंसिलेल्या यज्ञमार्गाचें अवलंबन करणाराची निंदाच केली आहे. असुर हे वेदनिंदक होत—

> विश्व हा अनादि ठावो । येथ नियता ईश्वर रावो
> चावडिये न्यायो अन्यावो । निवडी वेदु ॥
> वेदीं अन्यायी पडे । तो निरय भोगें दडे
> सन्यायी तो सुखाडे । स्वर्गीं जिये
> ऐसी ही विश्वव्यवस्था । अनादि जे पार्था
> इयेतें म्हणती ते (असुर) वृथा । अवघेंचि हें

ही तत्त्वज्ञानात्मक अनादि व्यवस्था न मानणारे असुर नरकाला जावोत. पण केवळ वेदात यज्ञकर्मप्रशस्ति आहे म्हणून यज्ञाच्या मार्गे लागणाराचें नशीब तरी थड कुठें आहे? त्यानें 'यज्ञमूढ ठकिले यागीं' असेंहि घडतें. कारण यज्ञ कोण व कसे करतात? तर 'ऐसे नरकाचिये सेले । मागीन जे जे जन्मले । तेहि देखो भुरले । यजिती यागीं ॥

ते यज्ञ करतात पण कसे?

> येरवीं यागादिक क्रिया । लाहाणें तेंचि धनंजया
> परि विकळती आचरोनिया । नाटकी जैसे ॥
> वह्कमाचिया उजरिया । आपणया पति कुस्त्रिया
> जोडोनि तोषिती जैसिया । अहेवपणें
> तैसें आपणया आपण । मानिता महत्तपण
> पुगती असाधारण । गर्वें तेणें ॥
> तेथ जाळिति जियें दहें । पामार्जी जो मी आहे
> तया आत्मया मज घायें । वाजती ते ॥
> आणि अभिचार कीं तिहीं । उपद्रविजे जेतुलें काहीं
> तेथ चैतन्य मी पाहीं । शिणु पावे ॥

नवव्या अध्यायांतहि यज्ञमार्गाची यदीच निंदा आढळते—

> यजन करितां कौतुकें । तिहीं वेदांचा माथा तुके
> क्रिया फळासि उभी ठाके । पुढां जया ॥
> ऐसे दीक्षित जे सोमप । जे आपणचि यज्ञाचें स्वरूप
> तिहीं तया पुण्याचे नि पाप । जोडिलें देखें ॥
> जे श्रुतित्रयातें जाणोनी । शतवरी यज्ञ करोनी
> यजिलिया मातें चुकोनी । स्वर्गु वरिती
> तैसे शतक्रतु यजिले मातें । कीं इप्सितातीं स्वर्गसुखातें
> आतां पुण्य कीं हें निरुतें । पाप नोहे ? ॥

जया आंगीं आयती ऐसी । तेथ यज्ञाची गोठी कायसी
तरी काय काय पिसीं । न करिती गा ॥
ना कुंड मंडप वेदी । ना उचित साधन समृद्धि
आणि तयासि तंत्रविधी । द्वंद्वचि सदा ॥
देवां ब्राह्मणाचेनि नांवें । आडवारेनहि नोहावें
ऐसें आधीं तेथ यावें । लागे कवणा ॥
पैं वासरुवाचा मोकसा । गाई पुढें ठेवूनि जैसा
उगाणा घेती क्षीररसा । बुद्धिवंत
तैसें यागाचेनि नांवें । जग वायूनि हावें
नागविति आघवें । अहेरावारी ॥
ऐशा कांहीं आपुलिया । होमिती जे उजरिया
तेणें कामिति प्राणिया । सर्वनाशु ॥
मग पुढां भेरी निशाण । लावुनि ते दीक्षितपण
जगीं फोकारिती आपण । वावो वावो ॥
तेव्हां महत्त्वें तेणें अधमा । गर्वा चढे महिमा
जैसें लेवे दिधले तमा । काजळाचे ॥
तेथ उन्हाळा आंगी खरमरा । तेला तुपाचिया कोठारा
लागला आणि वारा । सुटला जैसा ॥
ते आपुलिया सवेशा । मग कोणी कोणी हिंसा
या प्राणियातें वीरेशा । न साधिती गा ॥

पहिलें तव धनुर्धरा । आपुलिया मासरुधिरा
वेचु करिती अभिचारा- । लागोनिया ॥

महाभारताविषयीं ज्ञानेश्वर म्हणतात—

आता अवधारा कथा गहन । कलाकौतुका जन्मस्थान
कीं अभिनव उद्यान । विवेक तरूचें
ना तरी सर्व सुखाची आदी । जे प्रमेय महानिधि
नाना नवरस सुधाब्धि । परिपूर्ण हे
कीं परमधाम प्रगट । सर्व विद्यांचें मूळपीठ
शास्त्रजाता वसौट । अशेषांचें

आणि मग त्यातूनहि गीता—

बाप बाप ग्रंथ गीता । जो वेदीं प्रतिपाद्य देवता
भारत कमळपरागु । गीताख्यु प्रसंगु
शब्द ब्रह्माब्धि । मथियला व्यासबुद्धि
निवडिलें निरवधि । नवनीत हें
मग ज्ञानाग्निसंपर्कें । कडसिलें विवेकें
पद आलें परिपाकें । आमोदासी—अ. १ (५०–७२)
जें गीतार्थाचें व्यापारें । मोक्षोपायपर आघवें
आन शास्त्रोपाय कीं नव्हे । प्रमाणसिद्ध
तया अध्यात्मशास्त्रीं । जैं साचपणाची ये पुसी
तैं वेद्धे जया ठायासी । ते हे गीता ॥
भानुभूपिता प्राचिया । सतेजा दिशा आघवियां
तैसी शास्त्रेश्वरा गीता या । सनाथें शास्त्रें ॥

गीतेविषयीं मात्र ज्ञानेश्वराची अत्यंत आदरबुद्धि होती हें उघड आहे. पण त्या आदरबुद्धीच्या भरात त्यानीं गीतेला

हें गीतानाम विख्यात । सर्व वाङ्मयाचें मथित
गीतापद्य रत्नाचीं लेणीं । लेयली आहे

असें जें वर्णन केलें आहे तें तितकें यथार्थ नाहीं कारण एकदर महाभारताचें काव्यदृष्ट्या जें स्वरूप तेंच तदंतर्गत गीतेचें आहे. गीतेंत तत्त्वज्ञान आहे, नीतिबोध आहे, पण तींत काव्याचा अभिनिवेश नाहीं. तींत खरे काव्यगुण

फार थोडे आहेत तींत काव्याचा जो एक गुण म्हणजे रसात्मता तो नाहीं असें नाहीं कारण येथून तेथवर शातरस गीतेंत चागलाच प्रतीत होतो कदाचित् अद्भुत रसाचाहि थोडा भासला आहे तो विश्वरूप वर्णनात आढळतो परतु इतर कोणताहि रस गीतेंत नाहीं आणि काव्याच्या चित्ताकर्षकत्वाची भर सामान्यत' ज्यावर असते ते अलकारहि गीतेंत साधण्याचा प्रयत्न नाहीं या दृष्टीनें शकराचार्यांचे गीताभाष्य गीतेला अनुरूप असेंच आहे पण ज्ञानेश्वरी ही गीतेवरील टीका असूनहि अर्थस्पष्टीकरणाबरोबर तिनें काव्याचें प्रयोजन इतकें साधलें आहे कीं, गीता बाजूला ठेवली तर तें स्वत च एक काव्यसें वाटावें. गीतेंत अलकार इतके थोडे उपयोगात आणले आहेत कीं ते नेमके मोजून काढता येतात

भगवद्गीतेंतील उपमा-दृष्टात—

१ वासासि जीर्णानि यथा विहाय इ०
२ यावान् अर्थ उदपानें इ०
३ यदा सहरते चाय कूर्मो ऽगानीव सर्वश
४ वायु नौ इव अमसि
५ समुद्रमाप प्रविशति यद्वत्
६ धूमेनाऽऽव्रियते वन्हि यथाऽऽदर्शो मलेन च। यथा उल्बेनाऽऽवृतो गर्भ
७ ज्ञानप्लव
८ यथैधासि समिद्धोऽग्नि भस्मसात् कुरुते
९ नवद्वारे पुरे देही
१० यथा दीपो निवातस्थो नेंगते
११ तस्याह निग्रह मन्ये वायोरिव सुदुष्कर
१२ मयि सर्वमिद प्रोत सूत्रे मणिगणा इव
१३ यथाकाश स्थितो नित्य वायु' सर्वत्रगो महान्
१४ यथा नदीना बहव' अबुवेगा' इ०
१५ यथा प्रदीप्त ज्वलन पतगा' इ०
१६ यथा सर्वगत सौक्ष्म्यात् आकाश नोपलिप्यते
१७ यथा प्रकाशयत्येक कृत्स्न लोकमिम रवि'
१८ ऊर्ध्वमूल अध शाख अश्वत्थ प्राहुरव्यय

१९ सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः
२० भ्रामयन् सर्व भूतानि यंत्रारूढानि मायया

गीतेवरील ज्ञानेश्वरी टीकेंत सुमारें पांच हजार ओव्यांत उपमादृष्टांतादि अलंकाराचा उपयोग केलेला आढळेल.

---

## ( ६ ) ज्ञानेश्वरी व मराठी भाषा

शुद्ध मराठी भाषेच्या अभिमान्यांना ज्ञानेश्वरी हा ग्रंथ फार मौल्यवान् वाटण्यासारखाच आहे. कारण ज्ञानेश्वराच्या वेळीं दक्षिणेकडे किंवा महाराष्ट्रापर्यंतहि मुसलमानाचें आक्रमण झालेलें नव्हतें. मग भाषा दूषित होण्याचा संभव कोठचा ? मराठी भाषेचा उगम शक ४०० च्या सुमारास झाला असें कांहीं संशोधक मानतात. तथापि केवळ शिलालेख व ताम्रपट यांच्या पुराव्यावरून, म्हणजे त्यांतील प्राकृत किंवा अपभ्रंश भाषेच्या शब्दावरून, मराठीचा काल ठरविणें कदाचित् अयोग्य ठरेल. पण या कालांतील राजवट कोणचीहि असो, आणि दानपत्रादिकांत कोणतीहि अन्य भाषा योजिलेली आढळो, तथापि लोकसमाजांत प्रचलित असणारी भाषा मराठीच असावी असें वाटतें. अशा लेखांत संस्कृत भाषेचाहि क्वचित् उपयोग केलेला आढळतोच. पण त्यामुळें त्या काळीं संस्कृत भाषा लोक बोलत होते हें जसें सिद्ध होत नाहीं, त्याप्रमाणेंच प्राकृत–अपभ्रंश भाषाहि प्रचारांत होती म्हणजे लोकसमाजाच्या तोंडीं होती असें म्हणता येणार नाहीं. वाङ्मयाची गोष्ट वेगळी. पण बाराव्या शतकांत लिहिलेल्या ज्ञानेश्वरींत जर इतकी प्रौढ–प्रगल्भ–परिणत स्वरूपानें मराठी भाषा आढळते तर लौकिक मराठी भाषेचा उगम व प्रसार त्यापूर्वी झालेला असला पाहिजे. ज्ञानेश्वरीमध्यें कांहीं अमहाराष्ट्रीय भाषेंतील शब्द सांपडतात असें कांहीं संशोधकांनीं दाखविलें आहे. परंतु हे शब्द फार तर शेजार प्रांतांतील, उदाहरणार्थ, गुजराती, कर्नाटकी या भाषांतून आलेले असतील. पण अशा शब्दांनीं मराठी भाषा दूषित झाली असें म्हणतां येणार नाहीं. खरें भाषादूषण मुसलमानी भाषाचे शब्द समाविष्ट होण्यानेंच प्रथम सुरू झालें. परंतु महाराष्ट्राला मुसलमानांचा परिचय ज्ञानेश्वराच्या कालानंतर प्रथम झाला. अल्लाउद्दिनासारखा मराठी दौलताबादेवर आला तो ज्ञानेश्वरानंतर, आणि

अशी मराठी मारून जाणाऱ्या मुसलमानाच्या स्वारीनें स्थानिक भाषा दूषित होऊ शकत नाहीं. मुसलमानाचें उत्तरेंत राज्य दृढमूल झाल्यानतर त्याच्या ससर्गानें हळूहळू मुसलमानी भाषा हिंदी लोकाच्या कानावर पडू लागली व व्यवहारात मूळ धरू लागली. परतु महाराष्ट्रापर्यंत ती येऊन पोंचण्यास पुढेंहि पार काळ सहजच लागला. ज्ञानेश्वरींत म्लेंछ हा शब्द आढळतो. अठराव्या अध्यायातील ५५० वी ओवी अशी आहे—

> येरीही शास्त्र वटिकरीं । जें निंदेचे विटाळवरी
> बोळविलेंसे डोंगरीं । म्लेंछ धर्मांच्या

पण म्लेंछ हा शब्द स्वत परकीय नाहीं. म्लेंछ, यवन, हे शब्द इकडीलच आहेत. ज्ञानेश्वरींत कीं हें अव्यय पुष्कळच ठिकाणीं येतें. तें पर्शियन भाषेंतहि आढळतें. परतु ज्ञानेश्वरींतील कीं हें अव्यय किम् या सस्कृत अव्ययाचेंच रूपातर आहे. तें सयोजक म्हणजे वाक्याची साधजोड करणाऱ्या अर्थी नसतें, तर प्रश्नार्थी असतें. उदाहरणार्थ—

> *आम्हीं जेतें जया रीती । उगाणिलें आनाऱ्या हातीं*
> येरी तैसेंच तुझ्या चित्तीं । पैठें केलें कीं ( किम् )
> तरी स्वज्ञानजनितें । मागिलें मोहें तुतें
> मुलविलें तो येथें । असे कीं नाहीं ( *नास्ति किम्* )

'किंवा' शब्द सस्कृत आहे. त्यात कि हें आहे

ज्ञानेश्वरींत मराठी भाषेचा उल्लेख आलेलीं स्थळें—

| | अ० | ओवी |
|---|---|---|
| | १ | ८४ |
| मराठी | १ | ५६–६१ |
| | ६ | १४–२५ |
| | ६ | १२०–२१–३१ |
| | ६ | ४९४–९७ |
| मराठी | ७ | २०६–२१० |
| ” | १० | ४१–४७ |
| ” | ११ | ८–१०–१५ |
| | ११ | ७०८ |

| मराठी | १२ | २४६–२४७ |
|---|---|---|
| ,, | १३ | ११५६–६७ |
| ,, | १५ | ५९४–५९८ |
| ,, | १८ | १७०९–१७५१ |

या कारणें मिया, गीतार्थु मऱ्हाठिया,
केला लोकालागिया, दिठीचा विखो ।
परि मऱ्हाटे बोल रंगे, कवळिता जैं गीतागें,
तैं गा तेयाचेनि पागें, एकावट झालें ।
म्हणोनि गाता गावो म्हणे, तैं गाणिवे होये नेणे
ना मोले तरी उणें, गीताही न आणिती ।
नाना गुफिली का मोकळी, उणी नव्हती परिमळीं
वसतागमींची बाटोळी, मोगरी जैसी ।
ग्रुसतीच शांतिकथा, आणिजेल कीर वऱ्हवपथा,
परि शृंगाराच्या माथा, पावो ठेविती ।
दाउ वेव्हाळ देशी नवी, जैसी साहित्यातें वोजावी,
अमृताही चुकी ठेवी, गोडिसेपणें ।
बोलु वेव्हावितेनि गुणें, चंद्रासि घे उमाणे,
रसुमंगू भुलवणें, नादु लोपी ।
खेचराचेंही मना, आणि सात्त्विकाचा पान्हा,
श्रवणासवें सुमना, समाधि जोडे ।
तैसा वाग्विलासु विस्तारू, गीतार्थी विश्व भरू,
आनंदाचे आवारू, माड जगा ।
पीडो विवेकाची वाणी, हो काना मना जीणी,
देखो आवडे ते खाणी, ब्रह्मविद्येची ।
दीसो परतत्त्व डोळा, पाहो सुखाचा सोहळा,
रिगो महाबोधु, सुकाळा, माजि विश्व ।
हें निपजे आता आघवें, ऐसें बोलिजैल बरवें,
तें अधिष्ठिलें असें परदेवें, निवृत्ती मी ।

म्हणोनि आखरी सुमेदी, उपमा श्लेष कोंदाकोंदी,
झाडा देईन प्रतिपदीं, ग्रथार्थासी।
हा ठावो वेरी मातें, पुरतेया आहे सारस्वतें,
केलें असे श्रीमतें, गुरुरायें।
तेणें जी कृपा सावाये, मी बोलें तेतुलें सामायें,
आणि तुमचिये सभे लाहें, गीतार्थु म्हणों।
हा हो नवळ नाहि देशी। मऱ्हाटी बोल्जिे तरी ऐशी
वाणें उमटतहे आकाशीं। साहित्य रगाचें
तीरें संस्कृताचीं गहनें तोडोनि मराठिया शब्दसोपानें
रचिलीं धर्मनिधानें॥
ये मऱ्हाठियेचिया नगरीं। ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं
घेणें देणें सुखाचि वरी। हा देईं या जगा॥
नवरसी भरवी सागरू
करवी उचित रत्नाचे आगरू।
भावार्थाचे गिरिवरू
निफजवी माये॥
म्हणूनि अक्षरी सुमेरीं। उपमा श्लेष कोंदाकोंदी
झाडा देईन प्रतिपदीं। ग्रथार्थासी॥

कित्येक ठिकाणीं निवृत्तीनाथाचें नाव आड धरून आपल्या ग्रथकर्तृत्वाचा अभिमान ज्ञानेश्वरानीं जाणविला आहे. पण काहा ठिकाणीं हाहि पडदा दूर सारून केवळ स्वतःच्या ग्रथकर्तृत्वाचा अभिमान प्रौढ शब्दानीं प्रगट केलेला आढळतो.

ग्रथकर्तृत्वाचा अभिमान कसा आहे तो पाहा—

तरी अवधान एकलें दीजे। मग सर्व सुखासि पात्र होइजे
हें प्रतिज्ञोत्तर माझें। उघड आइका

माझा ग्रथ श्रवण करा, कारण तेवढयानें सर्व सुखाचा पात्रता तुम्हामध्यें येईल असा आत्मविश्वास प्रगट करण्याचें भाग्य किती ग्रथकाराना लाभू शकलें आहे?

पण इतकें बोलून होताच आपण विनयाची भूमिका सोडली अशी जाणीव होऊन ज्ञानेश्वर पुढें लगेच मुरड घालून म्हणतात—

> परी प्रौढी न बोलें हो जी। तुम्हा सर्वज्ञाच्या समाजी
> देयावें अवधान हे माझी। विनवणी सलगीची

अशा अधिकारी ग्रंथकारानें अशी प्रेमळपणाची सलगी न करावी तर दुसरा कोण करील ? आत्मविश्वासानें विनय व अहंकार याची जुळणी उत्तम होते.

> तुमचे या दिठिवेयाचे बोले। सासिन्नले प्रसन्नतेचे मळे
> ते साउली देखोनि रीघे। आलु जी मी

वाचक व श्रोते यांचें प्रेम संपादन झालें याची जाणीव झाली असता ग्रंथकर्तृत्वाच्या श्रमाचा परिहार होतोच होतो हा अनुभव सामान्य ग्रंथकाला-हि येतो. अशाच आणखी काही वचनांनीं ज्ञानेश्वरांनीं वाचकांशीं केलेल्या—योजलेल्या सलगीचें सुंदर समर्थन पदोपदीं केलें आहे.

---

## ( ७ ) ज्ञानेश्वरांचा ज्ञानसंग्रह

ज्ञानेश्वरांनीं अनेक ज्ञानविषयांना अशा रीतीनें स्पर्श केला आहे कीं, ते त्या सर्वांमध्यें तज्ज्ञ–शास्त्रज्ञ होते असें वाचकाला वाटू शकेल. परंतु यांतील काहीं अनुमानें खरीं असतात व काही नसतात. यांचीं एकदोन उदाहरणें देतों. प्रा. ग. स. दीक्षित यांनीं ' ज्ञानेश्वरीचें शास्त्रीय मंथन ' या लहानशा पुस्तकात असें म्हटलें आहे कीं, ज्ञानेश्वर हे इतर विषयात जसे पारंगत होते तसेच आयुर्वेद व योगशास्त्र हे विषयहि त्यांनीं अधिकृत वाणीनें ज्ञानेश्वरींत प्रतिपादिले आहेत पैकीं योगशास्त्राविषयीं त्यांचें म्हणणें सर्वस्वी ग्राह्य असलें तरी आयुर्वेदशास्त्राविषयीं त्यांनीं दिलेला पुरावा हवा तसा, हवा तितका नाहीं असें वाटतें उदाहरणार्थ—१ ' जैसा नखाग्रीं व्याळ लागे। तो शिखांत व्यापी येगे '— सर्प विष नखापासून डोक्यापर्यंत वेगानें भिनतें हें सामान्य माणसालाहि माहीत असतें, त्याला वैद्यकाचा ज्ञान नको २ ' कावीळ झालेल्या माणसाला धवळेंहि दिसत नाहीं. ' ३ ' आयुष्य सरलें म्हणजे औषधाचा उपयोग होत नाहीं. ' ४ ' रक्तावर साप चावला म्हणजे रोग्याला लहरी ( वेगामुळे ) येतात. ' ५ ' गुळवेलाचें औषध जिभेला कडू लागलें तरी परि-

णामीं गोड अमृतच असतें.' ६ ' दुर्धर रोगावर वैद्य हा सामर्थ्यवान् रसायनाची योजना करितो.' ७ ' तीव्र विष थोडें घेतलें तरी मनुष्य मरतो.' ८ ' शरीर हें मरणानंतर पंचभूतांत जाऊन मिळतें.' ९ पांडुरोग्याचा लक्षणा हा खरा नसतो.' १० ' जागेपण व झोंप दोनहि योग्य प्रमाणातच असावा.' ११ ' डोळ्यावर सारा आला म्हणजे दिसत नाही.' १२ ' कुपथ्यामुळें रोग अनावर होतो.' १३ ' मनुष्य सन्निपातात बडबडतो.' १४ ' तापात तोंडाला अरुचि उत्पन्न होते.' १५ ' उदरातल्या गर्भाला बाहेरचे व्यवहार कळत नाहींत.' १६ ' रोग झाला असता औषधाविषयीं उदासीन राहून कसं चालेल?' १७ ' दुष्काळातून उठलेल्या माणसाला खावा सुटते.' अशीं उदाहरणेंच उदाहरणें देता येतात. त्यावरून ज्ञानेश्वराचें व्यवहारज्ञान कळून येतें. पण तें त्याचें आयुर्वेदीय ज्ञान खास नव्हे. ' जैसा रसाआतु सिद्धरस ' म्हणजे ' साऱ्या पाऱ्यामध्यें सिद्धरसायन श्रेष्ठ प्रकारचें असतें ' अशा प्रकारचें एखादें वाक्य दिशाभूल करी. परंतु ' देवा, मागें तू आम्हाला जळत्या लाक्षागृहांतून वाचविलेंस तेव्हा देहाला मरणच येण्याची भीति होती ' हे वचन देखील ज्ञानेश्वराचें आयुर्वेदीय ज्ञानदर्शक कसें मानावं कळत नाहीं! ' तसेंच ' जया प्राण्याचे घरीं। अगें रावती माऊ चारी। आणि मना ऐसा आवडी। कुळवाडीकर ' हें १३ व्या अध्यायातलें ' क्षेत्र ' वर्णन आयुर्वेदांतर्गत शारीरज्ञानाचें उदाहरण कसें मानावें हें कळत नाहीं. अहिंसेचा निषेध करताना वैद्य लोक वनस्पतींना पीडा करितात याचा उल्लेख ज्ञानेश्वर करितात. पण त्यावरून त्याचें औषधिज्ञान किती खोल होतें हें कसें कळणार?

परंतु प्रा० दीक्षित हे ज्ञानेश्वराच्या योगशास्त्रीय ज्ञानाविषयीं म्हणतात तें खरें वाटतें. सहाव्या अध्यायात योगासन व समाधि इत्यादि प्रक्रियापूर्ण जें वर्णन ज्ञानेश्वरांनीं दिलें आहे ती केवळ त्यांनीं आपली ऐकीव माहिती कागदावर उतरली असें म्हणताच येत नाहीं. ते स्वतः योगसाधन करीत असले पाहिजेत अशी वाचकाची खात्रीच होते. या दृष्टीनें दीक्षित यांच्या ग्रंथाचा पुढील सर्व भाग ( पृ. २८ पासून ) वाचल्यास सामान्य ज्ञानाच्या वाचकास फार उपयुक्त माहिती मिळेल. योगसाधनाचें हे विशेष ज्ञान गुरुमुखावाचून स्वीमजूव शकणार नाहीं. आणि तेंहि गुरूपासून सक्रिय, सप्रयोग समजून घेतलें पाहिजे दीक्षित म्हणतात, ' ज्ञानेश्वरीचे बहुतेक प्रवचनकार हा योगप्रक्रियेचा भाग सोडून देतात.' कारण पारिभाषिक शब्द समजले व शब्दांचा अर्थ

कळला तरी वस्तुबोध होत नाहीं. दीक्षित हे स्वतः शारीरशास्त्राचे तज्ञ असल्यानें त्याचें हें विवेचन बोधप्रद आहे. त्याची वैद्यकशास्त्रीय ज्ञानेश्वरचर्चा मात्र तशी वाटत नाहीं.

( पातंजल ) हठयोगक्रिया पूर्ण होऊन, समाधि विसर्जून, योगाभ्यासी पूर्व स्थितीवर आला म्हणजे तो कसा दिसतो याचें वर्णन करिताना ज्ञानेश्वरांनीं आपली काव्यशक्ति कशी ओतली आहे हें पाहून कौतुक वाटतें. ( याविषयीं अ० ६ तील ओव्या २४९ पासून २६८ )—

तातलिये मुसे । मेण निघोनि जाय जैसें ।
मग कोंदली राहे रसें । ओतलेनि ॥ २४९ ॥
तैसी पिंडाचेनि आकारें । ते कळाचि का अवतरे ।
वरी त्वचेचेनि पदरें । पांघुरली असे ॥ २५० ॥
जैसी आभाळाची बुंथी । करूनि राहे गभस्ती ।
मग फिटलिया दीप्ती । धरून ये ॥ २५१ ॥
तैसा आइाचवरि कोरडा । त्वचेचा असे पातोडा ।
तो झडोनि जाय कोंडा । जैसा होय ॥ २५२ ॥
मग काश्मीरींचें स्वयंभ । का रत्नबीजा निघाले कोंभ ।
अवयवकांतीची भाव । तैसी दिसे ॥ २५३ ॥
ना तरी संध्यारागींचे रंग । काढूनि वळिलें तें आंग ।
कीं अंतर्ज्योतीचें लिंग । निर्वाळिलें ॥ २५४ ॥
कुंकुमाचें भरींव । सिद्धरसाचें वोतींव ।
मज पाहतां सावेव । शांतिचि ते ॥ २५५ ॥
तें आनंदचित्रींचें लेप । ना तरी महासुखाचें रूप ।
कीं संतोषतरूचें रोप । थावलें जैसें ॥ २५६ ॥
तो कनकचंपकाचा कळा । कीं अमृताचा पुतळा ।
नाना सासिनला मळा । कोंवळिकेचा ॥ २५७ ॥
हो का जे शारदियेचें नि वोलें । चंद्रबिंब पाल्हेलें ।
का तेजचि मूर्त बैसलें । आसनावरि ॥ २५८ ॥
तैसें शरीर होये । जे वेळीं कुंडलिनी चंद्र पिये ।
मग देहाकृती बिहे । कृतांतु गा ॥ २५९ ॥

वार्धक्य तरी वहुडे । तारुण्याची गाठी विघडे ।
लोपली उघडे । बाळदशा ॥ २६० ॥
वयसा तरी येतुलेवरी । एऱ्हवीं बाळाचा बळार्थु करी ।
धैर्याची थोरी । निरुपमु ॥ २६१ ॥
कनकद्रुमाच्या पाल्वीं । रत्नकळिका नित्य नवी ।
नखें तैसी बरवीं । नवीं निघती ॥ २६२ ॥
दांतही आन होती । परि अपाडें सानेजती
जैसी दुबाहीं वैसे पाती । हिरेयाची ॥ २६३ ॥
माणिकुलियाचिया कणिया । सावियाचि अनुमानिया ।
तैसिया सर्वांगीं उधवती अणिया । रोमाचिया ॥ २६४ ॥
करचरणतळें । जैसीं का रातोत्पळें ।
पाखाळींव होती डोळें । काय सांगों ॥ २६५ ॥
निडाराचेनि कोंदाटें । मोतियें नावरती सपुटें ।
मग शिवणी जैसी उतटे । शुक्तिपल्लवाची ॥ २६६ ॥
तैसी पातियाचिये कवळिये न समाये । दिठी जाकळोनि
निघों पाहे । आधिलीचि परी होये । गगना कवळिती ॥ २६७ ॥
आइकें देह होय सोनियाचें । परि लाघव ये वायूचें ।
जे आप आणि पृथ्वीचे । अंशु नाहीं ॥ २६८ ॥

कै. केशवराव छापखाने यानीं आपल्या 'स्वाध्याय ज्ञानेश्वरी' नामक पुस्तकांत योगशास्त्रांतील सोळा कलाचा अन्वय ज्ञानेश्वरीच्या ओव्यांतून लावून देतां येतो हे दाखविलें आहे तें बोधप्रद होतें. हा अन्वय व तो ज्यांतून निघतो त्या ओव्या अशा:—

१ तो अमृतरस इतर देहभागास लाभतो—२४८
२ प्राणातही मिळतो—२४८
३ देहाला ओतीव धातुरसाची कांति येते—२४९ ते २५३
४ देहाला कृतावदुमैद असें अत्यंत मोहक रूप प्राप्त होतें—
२४९ ते २६१
५ सर्व शरीर नवीन होतें—२६१ ते २६७
६ कांहीं सिद्धि येतात—२६७ ते २७०
७ कुंडलिनी हृदयांत येऊन स्थिर होते—२७१

१२ प्राण परततो—२३६
१३ प्राणाची व कुंडलिनीची विरुद्ध गति—
२३७ व २३८
१४ त्यात चन्द्राचे पदर दिसू लागतात—२३७
१५ दोन शरीरधातु रूपांतराला येतात—२३९
१६ सुषुम्नेतून गति—२४०
१७ कुंडलिनी प्रसन्न होते—२४१
१८ तेजाचा प्रसाद देते—२४२
१९ त्यामुळ प्राणाच्या गति उल्हसित होतात—२४१
२० "शीत" पक्ष ज्वाला—२४३
२१ जीर्णोद्धारास प्रारंभ—२४३
२२ नव्या सामुग्रीने प्रारंभ—२४३
२३ लिंगशरीरावर परिणाम—२४४
२४ अर्धजागृत स्थानांतून चक्रे
२५ क्रमाक्रमानें जागृत होतात म्हणजे करावीं लागतात.
२६ इडा व पिंगला एकवटतात. तिन्ही गाठी सुटतात व चंद्र सूर्य असे
भवस्वरूप भेद—२४५
२७ लीन होतात. ज्ञानशक्ति साम्याला येतात—२४६
२८ कुंडलिनीचें पोषण चंद्रामृतानें चालतें—२४७

ज्ञानेश्वरांनीं आपल्या टीकेंत स्वतःचें ज्ञान असें जें उपयोगांत आणलें, म्हणजे ज्याला मूळ गीतेच्या शब्दांत स्पष्ट सूचना नाहीं, त मुख्यत दोनतीन गोष्टींत दिसून येतें १ अलंकार-दृष्टान्त २ व्याख्या, ३ उदाहरणांत पैकीं अलंकारांचें विवेचन स्वतंत्रच केलें पाहिजे. दुसरी गोष्ट व्याख्या दिसण्यात साधे असलेले, परिचयानें तोंडीं बसून रूढ झालेले, असे जे पदार्थ ( शब्द ) असतात त्यांच्या व्याख्या करणें हें काम कठीण असतें. सोपें हें अधिक सोपें करून समजावून देण्यालाच अधिक मर्यादा पडते. या मुख्यत १६ व्या अध्यायांतील दैवी व आसुरी संपत्तीच्या वर्णनात आणि तेराव्या अध्यायांतील ज्ञान, अज्ञान इत्यादींच्या लक्षणांत आढळतात. मूळ गीतेंत नुसते पदार्थदर्शक शब्द आहेत, व्याख्या नाहींत. उदाहरणार्थ, दैवी व आसुरी संपत्तीविषयक १६ व्या अध्यायांतील हे श्लोक पाहा—

अभयं सत्त्वसंशुद्धिः ज्ञानयोगव्यवस्थितिः
दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायः तप आर्जवं ।
अहिंसा सत्यमक्रोधः त्यागः शांतिः अपैशुनम्
दया भूतेषु अलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलं ।
तेजः क्षमा धृतिः शौच अद्रोहो नातिमानिता
भवति संपद दैवीं अभिजातस्य भारत ।
दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च
अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ।

श्रीशंकराचार्यांच्या गीताभाष्यांत प्रायः गीतेंतील प्रत्येक पदाचा अर्थ सांगून अवश्य तेथें स्पष्टीकरण व प्रतिपादन केलेलें आहे. पण वरील आठ ओळींत जे महत्त्वाचे शब्द आहेत त्यांतील अनेकांच्या स्पष्टीकरणार्थ आचार्यांनीं प्रायः पर्याय शब्दच देऊन भागविलें आहे. कारण, आम्हीं वर सांगितल्याप्रमाणें सोप्याचें अधिक सोपें म्हणून किती करावें असें त्यांना वाटलें असावें. म्हणून त्यांनीं पर्याय शब्दानींच खालीलप्रमाणें निर्वाह केला आहे. उदाहरणार्थ—

अभयं—अभीरुता. अहिंसा—अहिंसनं, प्राणिनां पीडावर्जनं. अक्रोधः—क्रोधस्य उपशमः त्यागः-सन्यासः पूर्वं दानस्य उक्तत्वात्. शांतिः—अंतःकरणस्य उपशमः अपैशुनं—अपिशुनता, परंध्रप्रकटीकरणस्य अभावः दया—भूतेषु कृपा. मार्दवं—मृदुता. ह्रीः-लज्जा.

वरीलपैकीं कांहीं प्रतिशब्द तर त्याच धातूचे तद्रूप किंवा केवळ व्याकरण-भेदानें बनविलेले असे आहेत. इतर कांहीं थोड्या शब्दांच्या व्याख्या सोपपत्तिक केल्या आहेत. नाहीं असें नाहीं. तथापि असें करतांना कित्येक पर्याय शब्दांत मूळ शब्दापेक्षांहि कठिणता आली आहे. ज्ञानेश्वरांनाहि व्याख्यांची अडचण भासली, परंतु आचार्यभाष्यांत जें करता आलें नाहीं तें काव्यमय टीकेंत करितां येण्यासारखें असल्यामुळे त्यांनीं त्या त्या पदार्थांचीं उदाहरणेंच दिलीं आहेत. अभय याचा अर्थ अभीरुता इतकाच आचार्य सांगतात, तर ज्ञानेश्वर तोच अर्थ असा सांगतात—

न घालूनि महापुरीं । न धरे बुडणियाची भियारी
कां रोगु न गणिजे घरीं । पथ्याचिया

तैसा कर्माकर्मांचिया मोहरा । उठू नेदूनि अहंकारा
संसाराचा दरारा । साडणें येणें
अथवा ऐक्यभावाचेनि पैसें । दुजें मानूनि आत्मा ऐसें
भयवार्ता देसें । दवडणें जें
अगा अभय येणें नावें । बोलिजे तें हें जाणावें
सम्यक् ज्ञानाचें आघवें । धावणें हें

अर्थात् ही व्याख्या केवळ वेदांतपर आहे, व्यवहारपर नाहीं.

तसेंच सुख हा शब्द. सुख हा एक क्षेत्रघटक आहे त्याचा अर्थ आचार्यांनी अनुकूलत्व-प्रसन्नसत्त्व असा दिला आहे. त्यानें विशेष बोध होत नाहीं. परंतु सुख या शब्दाचें ज्ञानेश्वरांनी असें स्पष्टीकरण केलें आहे—

आता यावरि सुख । तें एवंविध देख
येणें एकेंचि अशेख । विसरे जीवु
मना वाचे काये । जे आपली आणवाये
देह स्मृतीची धाये । मोडित जें ये
जयाचे नि जालेपणें । पांगुळा होइजे प्राणें
सात्त्विकासी दुणें । वरीहि त्यासु
का आघवियाचि इंद्रिय वृत्ती । हृदयाचिया एकांतीं
थापटूनि सुषुप्ति । आणि जगा
किंबहुना सोये । जीव आत्मयाची लाहे
तेथ जें होय । तया नाम सुख

आचार्यांनी इतकेंच सांगितलें कीं, सुख म्हणजे ती एक अनुकूल वृत्ति होय. अनुकूलता तें सुख, प्रतिकूलता तें दुःख. तसेंच सुखाचा परिणामदर्शक असाहि प्रसन्न हा शब्द आचार्यांनी घातला आहे पण प्रसन्नतेच्या पलीकडे जाऊन झोंप, तंद्री, एकात्मता, समाधि येथपर्यंत सुखाच्या परिणामाची मजल ज्ञानेश्वरांनी नेली ती समर्पक व मार्मिक अशी वाटते.

शंकराचार्यांपेक्षाहि ज्ञानेश्वराच्या कांहीं कांहीं व्याख्या अधिक समर्पक वाटतात. त्यांचीं उदाहरणेंच देतों. दैवी संपत्ति व आसुरी संपत्ति यातील संपत्ति हा शब्दच घ्या

शंकराचार्यांनी संपदा इतकाच पर्याय शब्द योजला आहे. पण ज्ञानेश्वरांनी संपत्तीचा अर्थ असा स्पष्ट केला आहे—

जेथ एक एकातें पोखी । ऐसे बहुत पदार्थ येकीं
संपादिजती ते लोकीं । संपत्ति म्हणिजे

संपत्ति म्हणजे 'परस्पराना उपकारक–पोषक–अशा पदार्थांचा संग्रह' ही व्याख्या सोपपत्तिक व शास्त्रीय अशीच ठरते. मनुष्य अनेक वस्तूंचा संग्रह करितो. त्यांतील प्रत्येक वस्तूचा स्वतंत्र असा उपयोग असतोच. तथापि त्यांतील काहींचा परस्परोपकारी असाहि संबंध असतो. वास्तविक विजेचा पंखा हा स्वतंत्र उपयोगाचा पदार्थ आहे. तसाच आरामखुर्ची हा. तथापि आरामखुर्चीवर पडलें पण उकडत असलें तर तें अपूर्ण सुखच होय. उलट विजेच्या पंख्यानें शीतळ वारा लागतो खरा, पण तो घेताना बसायला खुर्ची असली तर चांगली व आरामखुर्ची असली तर ती त्याहून चांगली. अर्थशास्त्रातहि संपत्तीचा अर्थ जवळ जवळ असाच म्हणजे परस्परसापेक्ष उपयुक्त वस्तूंचा संग्रह असा घेतात. दुसरें एक असेंच उदाहरण म्हणून धृति हा शब्द घेता येईल.

अध्याय १३ मध्यें गीतेच्या ६ व्या श्लोकात धृति हा शब्द येतो. त्याची व्याख्या भाष्यांत शंकराचार्यांनीं 'यया अवसादप्राप्तानि देहेंद्रियाणि ध्रियते' अशी केली आहे. पण ज्ञानेश्वराची व्याख्या स्वतंत्र आहे—

तरी भूतां परस्परें । उघड जातिस्वभाववैरें
नव्हे पृथ्वीतें नीरें । न नाशिजे ?
नीरातें आटी तेज । तेजा वायूसी झुंज
आणि गगन तंव सहज । वायू भक्षी
तेवींचि कोणेहि वेळे । आपण कायिसयाहि न मिळे
आतु रिगोनि वेगळें । आकाश हें
ऐसीं पांचहि भूतें । न साहतीं एकमेकांतें
कीं तियेंहि ऐक्यातें । देहासि येतीं
द्वंद्वाची उखी विखी । सोडूनि वसती एकीं
एकेकातें पोखी । निजगुणें गा
ऐसें न मिळे तया सानणें । चळे धैर्य जेणें
तया नाव म्हणे । धृती मी गा

१४ व्या अध्यायात धीर असा शब्द आहे. शंकराचार्य त्याचा अर्थ धीमान् असा करितात. पण ज्ञानेश्वर असा करितात—

हा महा ऐसेनि स्तविजो । का नीच म्हणोनि निंदिजो
परि नेणे जळो विझो । रावुडी जैसी
तैसी निंदा आणि स्तुति । नव्हे कोण्हेचि व्यक्ति
नाहीं आधारें का वाती । सूर्याघरी

वरील दोन उदाहरणावरून हें दिसून येईल कीं, ज्ञानेश्वरांनीं आचार्यांना–भाष्यकारांना–सर्वसामान्यपणें 'वाट पुसली', परंतु मूळ गीतेचा शब्दार्थ व भावार्थ आपल्या बुद्धीला पटेल असा निश्चित करून सांगण्याची सवड स्वतंत्रता स्वतःला ठेवून घेतलीच.

ज्ञानेश्वरींतील कांहीं ओव्यांमुळे ज्ञानेश्वरांना आयुर्वेदशास्त्र चांगलें माहीत होतें असें अनुमान ज्याप्रमाणें कांहीं लोक सुकानें काढतात, त्याचप्रमाणें ज्ञानेश्वरींत मधून मधून आलेल्या साहित्यशास्त्रविषयक कांहीं शब्दप्रयोगावरून ज्ञानेश्वरांनीं साहित्यशास्त्राचा अभ्यास केला होता, आणि त्यावरून मराठीच्या साहित्यशास्त्राच्या मांडणीला आधार मिळतो, असें जें मत नागपूरचे डॉ० माधव गोपाळ देशमुख यांनीं प्रदर्शित केलें आहे तें हि आम्हाला यथार्थ वाटत नाहीं. साहित्यशास्त्रानें परामर्शिलेल्या अलंकारांचीं उदाहरणें ज्ञानेश्वरींत वाटेल तितकीं सापडतील हें म्हणणें वेगळें, आणि ज्ञानेश्वरींतील या उदाहरणावरून, मराठी संतकाव्यावरून, मराठींतल साहित्यशास्त्र सिद्ध करूं पाहणें हें वेगळें. पण तें साधणारें नाहीं. ज्ञानेश्वरांनीं योगशास्त्राचा अभ्यास केला होता असें आपण निखालस म्हणू शकतों, परंतु ज्ञानेश्वरांना साहित्यशास्त्रहि अवगत होतें असें म्हणता येणार नाहीं. त्यांना रस या साहित्यशास्त्रीय शब्दाचा यथार्थ उपयोग केला आहे हे 'नवरस,' 'आठा रसाची वोवाळणी' या शब्दावरून दिसतें. तसेंच उपमा हा शब्दहि ते यथार्थ साहित्यशास्त्रीय अर्थाच योजतात. रूपक हा शब्दहि यथार्थ योजतात. परंतु श्लेष शब्द ते साहित्यशास्त्रांतील अर्थानें वापरीत नाहींत.

---

## (८) ज्ञानेश्वरांचें कवित्व

ज्ञानेश्वरांनीं अंगी कवित्व का स्वीकारलें हा एक प्रश्न आहे त्याचें उत्तर असें —ज्याला आपण सुदसवेदन म्हणतों त्यांतही गुणोत्कर्षाचे चढते क्रम लागू

शकतात. सुखांत सुखाची भर ही कल्पना सार्थ व यथार्थही ठरते. याचें कारण असें कीं, सुखाचा आनंद भोगणारें मानवी अंतरंग हें समुद्रासारखें मोठें आहे. पावसाळ्यांत अनेक नद्यांच्या द्वारें सगळ्या डोंगरावरील पाणी जेऊन त्याची भर पडली तरी समुद्र तें आपणांमध्यें सामावूं शकतो. तसेंच सुखानंद भोगणाऱ्या मनाचें आहे. मनुष्याचीं अनेक ज्ञानेंद्रियें हीं करभार वसूल करण्यास मुलुखगिरीवर अधिराजानें पाठविलेल्या सैनिकांसारखीं होत. आणि त्यांनीं लुटून आणलेला करभार कितीही मोठा असला तरी तो आतां कोषांत मावत नाहीं, एकाच वेळीं त्याच्या आंत ठेवतां येत नाहीं, अशी तक्रार अधिराजाचा खजिनदार कधींही सांगत नाहीं. त्याप्रमाणें निरनिराळ्या इंद्रियांनीं लुटून आणलेला आनंद अंतरंग स्वीकारतेंच, पण सुखाचा आस्वाद घ्यावयाचा तरी तें सुख एकेरी असावें कीं अनेक पदरीं असलें तरी चालेल याचें निश्चित उत्तर म्हणून असें देतां येईल कीं, अनेक इंद्रियांनीं मिळवून आणलेला सुखानंद मन एकाच वेळीं घेऊं शकतें. ज्ञानेश्वरांनीं या कल्पनेचा उपयोग अनेक ठिकाणीं केलेला आढळतो. याविषयीं त्यांचा ठळक दृष्टांत असा—सुंदर आकाराचें कमळ असावें, पण तेंच सोन्याचें असेल तर अधिक बरें, आणि त्या कमळाला सुगंध असेल तर आणखी बरें. हीच कल्पना थोडीशी वाढवितां येईल. ती अशी कीं, कमळ म्हटलें म्हणजे नेत्रेंद्रियाचें समाधान झालेंच, पण तेंच दातांनीं खुडून खालें असतां गोड लागेल तर काय वाईट ? (स्वतः मला एखाद वेळ असें वाटतें कीं, सुंदर दिसणाऱ्या मेणबत्तीचा तुकडा तोडून खाल्ला तर साखरेसारखा गोड लागावा अशी योजना कां नसावी ?) कमळ सुंदर व रुचीला गोड, म्हणून नेत्र व जिव्हा या इंद्रियांचें समाधान झालें. पण तेंच कमळ सुगंधी असलें तर घ्राणेंद्रियाची तृप्ति झाली. कमळ हें स्पर्शाला अति मृदु असावयाचेंच हें सांगावयाला नको. म्हणजे त्यांत त्वचेनें जें चौथें इंद्रिय त्याचें समाधान आलें. राहतां राहिलें श्रोत्रेंद्रिय. मग कल्पना करावी कीं, वर चार गुणांनीं युक्त असें सांगितलेलें कमळ हें अरेबियन नाइट्मधल्या त्या एका झाडासारखें आहे, म्हणजे या कमळाच्या देठाशीं किंचित् दाबलें कीं अनेक प्रकारचें सुंदर गायन त्यांतून निघत राहावें.

या सर्व पाल्हाळाचें तात्पर्य हेंच कीं, सुखाच्या चढत्या उतरत्या प्रती न मानल्या किंवा न लावितां आल्या तरी, अनेक सुखांचा एकाच वेळीं आस्वाद घडला तर तो अधिक इष्ट होय यांत वाद नाहीं. उदाहरणार्थ, वात्सप हा जर

मुखाचा एक विषय मानला तर त्याविषयीं ज्ञानेश्वरांनींच सांगितलें आहे कीं, त्या वाङ्मयांत कवित्व, रसिकत्व, इत्यादि गुण असून शिवाय त्यातच परमतत्त्वाच्या आनंदाची भर पडली तर अधिक चांगली. आणि अनेक इंद्रियांना एकाच वेळीं संतोष मिळवून देता आला तर तो चांगला. हा सिद्धांत मान्य असल्यामुळें, ज्ञानेश्वरादि जनतेला परमार्थ सांगण्याची इच्छा झाली तेव्हा त्यांनीं गद्य टाकून देऊन पद्याचा स्वीकार केला. मग पद्य खरें, पण तें निर्यमकापेक्षां सयमक अधिक गोड लागतें, म्हणून यमकाची जोड दिली. हवी तशी गेयता साधावी म्हणून ओवीचा छंद घेतला. अनुप्रास म्हणजे त्याच त्या अक्षराची पुनरावृत्ति कानाला सुख देते म्हणून साधेल तितके अनुप्रास जोडले. आणि साम्यदर्शनानें मनाला होणारा आनंद सर्वोत्तम म्हणून उपमा, दृष्टांत इत्यादि अलंकाराचा उपयोग केला. म्हणजे अनेकांगी सुख एकाच वेळीं भोगल्यासारखें झालें नाहीं काय ?

कोणी असें विचारील कीं, ब्रह्मज्ञानाचा उपदेश करणाराला ही येवढी उठाठेव आणि कृत्रिम उपाधींचें बंधन काय म्हणून असावें ? त्याची कल्पना बहुधा अशी कीं, साधुसंत म्हटला म्हणजे त्याची भाषा असंबद्ध असावी, त्याची शब्दयोजना इतकी स्वैर असावी कीं तींतून अर्थ काढणें बुद्धीला कठीण वाटावें. साधूचे असंबद्ध स्वैरालाप हाच खरा उपदेश. म्हणजे त्यांतून हवा तो अर्थ काढता यावा. आणि आज आपण व्यवहारांत प्रत्यक्ष असेंच पाहतों कीं, लोकांना लोभविणारे जे गुरु व साधु-बुवा असतात ते खरोखर असेच निरक्षर, स्वैरालापी, असंबद्धभाषी असेच असतात. आणि अशाच्या वेडसर उद्गारांतून मनानें वाटेल तो बोध काढून भाविक भक्तांनीं, अनुयायांनीं, आनंद-परमानंद मानला आहे. पण हें सर्व कांहीं बुद्धीला पटण्यासारखें नाहीं. तिला हेंच पटेल कीं, परमार्थाचा उपदेश करावयाचा झाला तरी तो असंबद्ध उद्गारापेक्षां सुसंबद्ध भाषेनें केलेला अधिक बरा. ती भाषा व्याकरणशुद्ध असली तर अधिक बरी. ती भाषा व्याकरणशुद्ध असून कानाला गोड लागणारी असली तर आणखी अधिक बरी. निला सफाईदार गद्याचें रूप असलें तर अधिक बरी. पण गद्यापेक्षांहि गेयतेला अनुकूल अशी पद्यरूपता असली तर अधिक बरी. पद्य असून त्यांत शब्दगुण असले तर अधिक बरें. आणि त्यांतच काव्यगुण असले तर त्याहून बरें. ज्ञानेश्वरांनीं आपल्या ज्ञानाला-उपदेशाला-काव्याचें रूप दिलें याचें त्यांना स्वतःला तर वावगें वाटलेंच नाहीं, पण वाचकहि सर्व

एकजात एकमुखानें सांगतात कीं, त्यांनीं केलें तें योग्यच केलें. फार तर असें म्हणावें कीं, मुलाला खेळविण्याकरिता बाप एखादें सोंग अंगीं आणतो व तें साधण्याकरिता बहाणे करितो, त्याप्रमाणें अज्ञान जनांना गूढ परमार्थतत्त्व समजून सांगण्याकरिता ज्ञानेश्वरांनीं काव्याचा स्वीकार केला. आणि एकदां कवीचें सोंग पत्करलें म्हणून साधतील तितके कवित्वाचे बहाणे त्यांनीं साधले. म्हणूनच त्यांनीं यमक कोठें चुकूं दिलें नाहीं. जमतील तितके अनुप्रास साधले. शब्दरचना ठाशीव तथापि कर्णमधुर अशीच केली. आणि अंगीं असलेलें रसिकत्व अनेक दृष्टांत व उपमा देऊन प्रगट केलें. साधूच्या साधुत्वाला किंवा गुरूच्या उपदेशकत्वाला काव्यगुणानें कमीपणा का यावा ? म्हणून संत, साधु ज्ञानेश्वर यांच्या निर्मितीची चिकित्सा कोणी काव्यदृष्टीनें केली तर त्यामुळे त्यांच्याविषयाच्या आदरबुद्धीला कमीपणा खचित येत नाहीं. एकाच जिन्यावरून मनुष्य चढतो व उतरतो. चढत्या माजलीप्रमाणें उतरती माजलीहि व्यवहाराला हवीच. त्याप्रमाणें ज्ञानेश्वर पद्यापासून परमार्थापर्यंत जिना चढले, तसेच परमार्थापासून पद्यापर्यंत जिना उतरले. पण हे चढउतार दोनहि त्यांनीं एकाच कार्याकरिता केले.

ज्ञानेश्वर यमक नेहमींच चांगलें साधतात. तथापि यमक साधण्याकरितां ज्ञानेश्वर एखाद्या अक्षराला मुरड अशी घालतात कीं ती मुरड मुद्दाम घालीत आहो ही जाणीव त्यांची त्यांनाहि असावी. उदाहरणार्थ—

'हें असो काजेंवीण । जें जें कांहीं करण'

या ठिकाणीं 'करण' असा शब्दप्रयोग चिंत्य ठरतो. तोंडी खासगी समाषणांत करणें याऐवजीं करणे असेंच आपण म्हणतों. पण ज्ञानेश्वरांनीं इतरत्र—बहुश सर्वत्र—'एकार' च वापरला आहे. म्हणून केवळ यमकाच्या गरजेमुळें येथें त्यांनीं 'करण' याऐवजीं करणं असा मानासखेर निरुपायानें स्वीकारलेला दिसतो.

तसेंच सुतळ सुतला याला जेवढा हें यमक नीट बसत नाहीं. (५-४७) कोठें ग व घ यांचें यमक जोडलेलें आढळतें, तें फारसें बावगें वाटत नाहीं. पण—

> जैसें कां स्वप्न मोहा । तो एकाकी देखे बहुवा
> तोचि पाहु आरमया । सरणेवीण असे

या तीनहि चरणांतर्ग यमक जुळत नाहींत शिवाय राजवाडे प्रतींत ही ओवीच सापडत नाहीं. यामुळें हा ओवी प्रक्षिप्त किंवा कोणीं तरी कधी तरी घरुंच घुसडून दिली असावी. मात्र सावरे व चक्रस्वामी याच्या आवृत्तींत ती घेतलेली असून तिचा अर्थहि केला आहे।

* चुकीचें यमक एखादे ठिकाणीं आढळूं शकतें—

तव श्रोते म्हणती राहे। के परिहारा ठावो आहे
मिहिली का वायें। कविपोषका

येथें 'हे' यार्शी 'यें' हें यमक जुळत नाहीं.

तसेंच—

हा सात्त्विक होय मान्यु। तेंचि भोगावया आरोग्यु
शरीरासि मान्यु। उदयलें जाणो

एकाच ओवींत मान्यु हा शब्द त्याच अर्थी घालणें ही यमकजुळणी चांगली नाहीं.

पण—

येरवी बोधा आलेनि ज्ञानें। जरी ज्ञेय न दिसेचि मनें।
तरी ज्ञान लाभहि न मने। साता झाला (१३ ६२६)

येथें 'मनें' हा शब्द लागोपाठ दोन ओळींत आला आहे, तथापि पहिला शब्द मनें हा नामाची तृतीया व दुसरा 'मने' हा शब्द 'न मानी' या अर्थी क्रियापद आहे म्हणून यमक ठीक आहे.

ज्ञानेश्वरानीं शक्य तेथें अनुप्रास साधले आहेत. अक्षरपुनरावृत्तींच्या गोडीची ओळख त्याना निःसंशय होती. उदाहरणार्थ,

हे विसावेंवीण वाट वाहवी कवण।
विचरे विश्व होउनी विश्वामाजी।
परिमळ निघालिया पवनापाठीं।
वाया वादविता वाणी। शिणेल इन
मनासि तुकिता तुका। तुरी नाहा
रचूनि महत् तत्त्वाच खळ। मळी एके काळुगेनि पोळे

---

## ( ९ ) ज्ञानेश्वरींतील पाल्हाळ

ज्ञानेश्वर विवेचन–स्पष्टीकरण–करू लागले म्हणजे कित्येक वेळा वाहवत जाऊन पाल्हाळ होतो याची जाणीव त्यांची त्यांना असते. मग एखादे वेळ ते तो दोष निमूटपणें खेळीमेळीनें आपल्या पदरात घेतात, किंवा त्याचें समर्थनहि करू इच्छितात. याचें उत्तम उदाहरण तेराव्या अध्यायात सापडतें. ज्ञान व ज्ञानी पुरुष यांच्या व्याख्या सांगून झाल्यावर खालील ओव्या आढळतात—

श्रोते म्हणती असो । न सांगें तयाचा अतिसो ।
प्रयोकि तेश आडसो । घालितासि का ।
रसु होवावा अतिमातू । हा घेतासि कविमतू ।
तरि अवतूनि दातू । करितोसि का गा । इ०

अर्थ—" तेव्हा श्रोते म्हणाले, हें राहू दे. त्या पुरुषाचेंच अतिशय वर्णन करू नकोस प्रथाच्या चाललेल्या विचारात मध्येंच खोळंबा का करतोस ? आपल्या व्याख्यानात विषयाचें प्रतिपादन करताना त्याचें पाल्हाळानें अतिशय रसभरित वर्णन करावें ही जी सामान्य कवींची क्लृप्ति तिचा आश्रय करून तू श्रोत्याना मुद्दाम बोलावून आणून शत्रु केल्याचा दोष का घेतोस ? पाहुणा जेवायला बोलावून आणावा आणि तो पाटावर बसताच स्वयंपाक घेऊन पळून जावें, आणि इतर रीतीनें मान त्याचा आदरसत्कार करावा असें एखाद्या बाईनें केलें तर तें चालेल का ? गाय एरवीं मोठी देखणी व गुणी, पण धार काढायला बसलें कीं, लाथ मारते *त्या गाईला चांगली कोण म्हणेल ?*" असा दोष ज्ञानेश्वरानीं स्वत कडे घेतला. पण लगेच श्रोत्याकडून त्याचा परिहारहि करविला आहे कारण लगेच श्रोते म्हणतात कीं, " अमृताच्या पावसाची झड एक सप्ताहभर लागली तरी नको कोण म्हणेल ? तुम्हां आम्हा दोघातहि ज्ञानाची प्रीति आहे, म्हणूनच ज्ञानाच्या निरूपणाला, हे ज्ञानेश्वरा, तुला चौपट स्फूर्ति आली "

तथापि आपण पाल्हाळ करीत आहों याची खरी जाणीव असल्यानें ज्ञानेश्वरानीं पुढील शब्दानीं समारोप केला " पदे करी साच करी निरूपणी वा सत याक्यापरिसे माझेहि जी ऐसे मनोगत यावरी आता तुम्हीं आज्ञापिला तरी बाया वाग् मी वाढीं नेदीं । "

असाच प्रसंग आणखी दोन तीन ठिकाणीं झालेला आहे पुनरुक्ति हा पाल्हाळाचाच एक प्रकार असतो. उदाहरणार्थ, दहाव्या अध्यायात पहिल्या ८३ ते ८७ या ओव्यांत पुनरुक्ति झालेली आहे असें वाटतें.

पाल्हाळाचा आणखी एक प्रकार उपमाच्या गर्दीत किंवा भडिमारात दिसून येतो. याचें उदाहरण तेराव्या अध्यायातील ५१२ पासून ५५८ या ओवी-पर्यंतचें म्हणून देता येईल. उपमाची अशी गर्दी का, जसा कांहीं उपमाचा पाऊस पाडावा. अर्थात् असें झालें म्हणजे फारशा समर्पक नाहात अशाहि उपमा त्यात येतात.

त्याच त्या उपमा देणें हाही पाल्हाळाचा एक प्रकार होऊ शकतो. उदाहरणार्थ, पाणी व मीठ, सुवर्ण व अलंकार, समुद्र व लाटा, चंद्र व चकोर, आरसा व प्रतिबिंब, इत्यादि ठरीव उपमाची पेरणी प्रथमर इतकी झाली आहे कीं, त्याची पुनरुक्ति किंवा ठराविक क्रमानें लागलेली राग मनाला चरी वाटत नाहीं.

केवळ विनोदात्मक अशीं ज्ञानेश्वराचीं वचनें फार थोडीं सापडतात अशा पैकीं पुढील एक होय. अठराव्या अध्यायातील ५६९ व ५७० या ओव्या अशा आहेत—" ईश्वर कर्मफळ भोगावयाला लावतो अशी समजूत केली तर तो तामस ज्ञानी दगडा-धातूचे केलेले मानीव देवच विकून खातो. गावातील देवळातले देव जर खरोखर सृष्टीचे नियामक असतील तर देशातले डोंगर गुपचुप का राहतील? कारण देवळातील देव हे डोंगरातील दगडाचेच केलेले असतात अर्थात् ते डोंगर या दगडी देवाचे बापच नव्हेत का? मग ते सृष्टीनियमनाची उठाठेव केल्याशिवाय गप्प कसे बसतील? इ० "

म्हणोनि इया वाहणी । केला म्या उपलवणी
वाचुनिदुधा मेळऊनि पाणी । फार कीजे
तैसें जी न बडबडी । पदाचा कोर न साडी
मूळध्वनींचिये वाढी । निमित्त जाहलों
तव श्री ने म्हणती राहें । कें परिहारा ठावो आहे
बिहिसी का वायें । कविपोषका

ज्ञानेश्वर हे आपणाकडून विषयांतर–विच्छेद–टाळण्याची खबरदारी घेतात. अ. ५·६६ पहा—

हा असो अतिप्रसंगु । न संडी पां कथालागु
होईल श्लोकसंगतिभंगु । म्हणऊनिया
जें मना आकळितां कुवाडें । घाधुसितां बुद्धि नातुडे
तें दैवाचेनि सुरवाडें । सांगवलें तुज
तें शब्दातीत स्वभावें । तें बोलींचि जरी फावे
तरी आणिकें काय करावें । कथा सांगे
हा आर्तिविशेषु श्रोतयांचा । जाणोनि दास निवृत्तीचा
म्हणे संवादु दोघांचा । परिसोनि परिसा
तैसा सज्ञानासि तरी हा ठावो । आणि अज्ञानासि आन गांवो
म्हणोनि बोलावया विषय पहावो । विशेषु नाहीं
परि अनुवादलों मी प्रसंगें । तें सज्जनीं उपसाहावें अंगें (६·३०)

## ( १० ) ज्ञानेश्वरांचा आत्मविश्वास

स्वतःच्या ग्रंथ कर्तृत्वाच्या गुणाची ज्ञानेश्वराना पूर्ण जाणीव व आत्मविश्वास होता. या जाणिवेचा त्यांनीं अनेक ठिकाणीं उच्चारहि केला आहे—

तैसें शब्दाचें व्यापकपण । देखिजे असाधारण
पाहातयां भावज्ञा फावती गुण । चिंतामणीचे ( ६·२१ )
जैसें बिंब तरी बचकेयेवढें । परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें
शब्दाची व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी
नातरी कामितयाचिया इच्छा । पळे कल्पवृक्षु जैसा
बोलु व्यापकु होय तैसा । तरी अवधान द्यावें ( ४·२१५–२१६ )

ज्ञानेश्वरांचा आपल्या ग्रंथाविषयीं किती विनयमिश्रित पण दांडगा आत्मविश्वास होता हें पाहा:—

तरी अवधान एकलें दीजे । मग सर्वसुखासि पात्र होइजे ।
हें प्रतिज्ञोत्तर माझें । उघड आइका ॥ १ ॥
परी प्रौढी न बोलें हो जी । तुम्हां सर्वज्ञांचे समाजीं ।
देयावें अवधान हे माझी । विनवणी सलगीची ॥ २ ॥

का जे लळेयाचे लळे सरती । मनोरथाचे मनोरथ पुरती ।
जरी माहेरें श्रीमंतें होतीं । तुम्हाऐसीं ॥ ३ ॥
तुमचेया दिठिवेयाचिये वोलें । सासिन्नले प्रसन्नतेचे मळे
ते साउली देखोनि लोळे । मातु जी मी ॥ ४ ॥
प्रभू तुम्ही सुखामृताचे डोहो । म्हणोनि आम्हीं आपुलिया स्वेच्छा ।
वोलावो आहों । येथही जरी सलगी करू बिहों । तरी निवों कें पा ॥५॥
ना तरी बाळक बोबडा बोलीं । वाकुडा विचुका पाउलीं ।
ते चोज करूनि माउली । रिझे जेवीं ॥ ६ ॥
तेवीं तुम्हा संताचा पढियावो । कैसेनि तरी आम्हावरी हो ।
या बहुवा आलुकिया जी आहों । सलगी करित ॥ ७ ॥
वाचूनि मासिये बोल्तिये योग्यते । सर्वज्ञ भवादृश श्रोते ।
काय धड्यावरी सारस्वतें । पढों सिकिजे ॥ ८ ॥
अवधारा आवडे तेसणा धुधुरु । परि महातेजीं न मिरवे काइ करू ।
अमृताचिया तारीं वोगरू । ऐसी रससोय कैंची ॥ ९ ॥
हा हो हिमकरासी विंझणें । कीं नादापुढें आइकवणें ।
लेणियासी लेणें । हें कहीं आथी ॥ १० ॥
सांगा परिमळें काय तुरवावें । सागरें कवणें ठायीं नाहावें ।
हें गगनचि आडे आघवें । ऐसा पवाडु कैंचा ॥ ११ ॥
तैसें तुमचें अवधान धायें । आणि तुम्ही म्हणा हें होय ।
ऐसें वक्तृत्व कवणा आहे । जेणें रिझा तुम्ही ॥ १२ ॥
तरी विश्वप्रगटितिया गभस्ती । काय हातिवेन न कीजे आरती ।
का चुळोदकें आपापती । अर्घ्यु नेदिजे ॥ १३ ॥
प्रभू तुम्ही महेशाचिया मूर्ती । आणि मी दुबळा अर्चितुसें भक्ती ।
म्हणोनि बोल जाही गगावती । ते ही स्वीकाराल कीं ॥ १४ ॥
बाळक बापाचिये तारीं रिगे । आणि बापातेंच जेवऊं लागे ।
कीं तो संतोषलेनि वेगें । मुखचि वोढवी ॥ १५ ॥
तैसा मीं जरी तुम्हाप्रती । चावटी करीतसें बाळमती ।
तरी तुम्ही संतोषिजे ऐसी जाती । प्रेमाची असे ॥ १६ ॥
आणि तेणें आपुलेपणाचेनि मोहें । तुम्ही संत घेतले असा बोहें ।
म्हणोनि केलिये सलगीचा नोहे । आभारु तुम्हा ॥ १७ ॥

अहो तान्हयाचें लागतां झटें । तेणें अधिकचि पान्हा फुटे ।
रोषें प्रेम दुणवटे । पढियतयाचेनि ॥ १८ ॥
म्हणऊनि मज डेंगुरवाचेनि बोलें । तुमचें कृपाळूपण निदेलें ।
तें चेइलें ऐसें जी जाणवलें । यालागीं बोलिलों मी ॥ १९ ॥
एऱ्हवीं चांदिणें पिकविजत आहे चेपणीं । कीं वारया घापत आहे वाहणी ।
हां हो गगनासि गवसणी । घालिजे केवीं ॥ २० ॥
आइका पाणी वोथिजावें न लगे । नवनीतीं माथुला न रिगे ।
तेवीं लाजिलें व्याख्यान न निगे । देखोनि जयातें ॥ २१ ॥
हें असो शब्दब्रह्म जिये वाजे । शब्द मावळलेया निवांतु निजे ।
तो गीतार्थु मऱ्हाटिया बोलिजे । हा पाडु काई ॥ २२ ॥
परि ऐसियाही मज धिवसा । तो पुढीलयाचि येकी आशा ।
जे धिटींवा करूनि भवादृशां । पढियतया होआवें ॥ २३ ॥
परि आतां चंद्रापासोनि निववितें । जें अमृताहूनि जीववितें ।
तेणें अवधानें कीजो वाढतें । मनोरथा माझिया ॥ २४ ॥
का जें दिठिवा तुमचा वरखे । तें सकळार्थसिद्धि मती पिके ।
एऱ्हवीं कोंभेला उन्मेषु सुके । जरी उदास तुम्हीं ॥ २५ ॥
सहजें तरी अवधारा । वक्तृत्वा अवधानाचा होय चारा ।
तरी दोंदें येल्ती अक्षरां । प्रमेयाचीं ॥ २६ ॥
अर्थ बोलाची वाट पाहे । तेथ अभिप्रावोचि अभिप्रायातें विये ।
भावाचा फुलौरा होत जाये । मतीवरी ॥ २७ ॥
म्हणूनि संवादाचा सुवावो ढळे । तरी हृदयाकाश सारस्वतें वोळे ।
आणि श्रोता दुश्चिता तरि वितुळे । मांडला रसु ॥ २८ ॥
अहो चंद्रकांतु द्रवता कीर होये । परि ते हातवटी चंद्री की आहे ।
म्हणऊनि वक्ता तो वक्ता नोहे । श्रोतेनविण ॥ २९ ॥
परि आतां आमुतें गोड करावें । ऐसें तांदुळीं कासया विनवावें ।
साखळदिशानें काइ पार्थावें । सूत्रधारातें ॥ ३० ॥ (अध्याय ९ या
जैसा मापथी चंद्र नोळखिजे । तैसा मार्गतां भगु हा नेणिजे । (६. २९
अ. १५ (५६० ते ५६४); अ. १८ (१७८५-१७९०); अ. १
१४७-१६४).

अ. १५ (११ ते २१)—

शब्द कैसा घडिजे। प्रमेयीं कैसे पां चढिजे।
अलंकारू म्हणजे। काय तें नेणें॥

वास्तविक आत्मावगणनाचे हे तीनहि प्रकार व्यर्थ होत. कारण शब्दांची घडण-घुळण करण्यांत ज्ञानेश्वरांचा हात कोण धरील? तसेंच त्यांच्या विवेचनांत हा प्रमुख गुण आहे कीं, प्रमेयांची चढती श्रेणी सजवून सिद्धांत पटविण्यांत ते निष्णात आहेत. आणि अलंकार रंगविण्यांत-बांधण्यांत तर कालिदासा-इतके किंवा त्याहून क्वचित् सरस ठरतील. असें असतां 'अलंकार म्हणजे काय हें मला कळतहि नाहीं' हें बोलणें इतकें अयथार्थ ठरतें कीं तो खरा विनय नसून ते विनयाचें जाणून बुजून ढोंग आहे असाहि आक्षेप कोणी घेऊं शकेल. गीतार्थप्रतिपादनांतहि 'मी पूर्वींच्या भाष्यकारांचाच अर्थ सांगत आहें, पदरचें सांगण्यासारखें मजजवळ कांहीं नाहीं' असें ज्ञानेश्वर म्हणतात.

याच्या उलट अहंकारबुद्धिहि दाखवितां येण्याजोगी आहे. मात्र अशा बहुतेक प्रसंगीं आपण प्रतिष्ठेचा दावा सांगतों तो स्वतःपेक्षां मराठी भाषेच्या अभिमानानें सांगत आहों अशी कलाटणी ज्ञानेश्वरांनीं दिली आहे व अहंकाराला मुरड घातली आहे.

---

## (११) कांहीं दोष

श्री, शोभा, सौंदर्य, आनंद, या गोष्टी जशा ज्ञानेश्वर उज्वल शब्दांनीं वर्णन करूं शकतात, त्याचप्रमाणें तद्विरुद्ध म्हणजे अशुद्ध, अमंगळ, अशुभ, घाणे-रड्या, अशा किळसवाण्या गोष्टीहि ते उचित शब्दांनीं रंगवूं शकतात. याविषयीं मनुष्यजन्मांतलें म्हातारपण, तामस गुणी मनुष्याचें वर्तन, नरकवास, गर्भवास, इत्यादि विषय उपस्थित झाले तेव्हां त्यांचीं केलेलीं वर्णनें, भाषा-प्रभुत्वाच्या दृष्टीनें, वाचनीय आहेत. अशीं वर्णनें करितांना वाचकांना किळस येईल हेंहि त्यांना ठाऊक असतें, पण तीं वर्णनें करणें प्राप्तच असतें त्याला ते काय करणार?

जाता तया तामसा । आवडे आहारू जैसा
तेंहि सागों चिळसा । झणें तुम्ही

'चिळस मानू नका' हें वाक्य जाणूनबुजून घातलेलें आहे. यावरून आपण वर्णन करणार तें चिळस उत्पन्न करणारें आहे हें त्याना माहीत असल्यामुळें तो दोष जाणता म्हणून सहेतुक ठरतो.

ज्ञानेश्वरींत एकहि अश्लील किंवा सदभिरुचीला सोडून असलेलें वचन सापडणार नाहीं अशी कोणी पैज मारील तर तींत मात्र त्याला हार खावी लागेल असें म्हणता येईल. यथार्थ स्पष्टीकरणाला अश्लील शब्दच कशाला?

(मात्र या बाबतींत वामन पंडितानीं आपल्या यथार्थदीपिकेंत ज्ञानेश्वरावर ताण केली आहे.) याचीं काहीं उदाहरणें देतो. दहाव्या अध्यायातील पहिलीच ओवी अशी आहे, "स्पष्ट बोध करण्यात चतुर असलेल्या व विचाररूपी कमळाचा विकास करणाऱ्या, व पराबाणीचा विषय जी स्वरूपस्थिति हीच कोणी तरुण स्त्री त्या स्त्रीशीं विलास करणाऱ्या, श्रीगुरो, तुम्हाला माझा नमस्कार असो." येथें वाणीचा विलास इतकें म्हटलें असतें तरी चाललें असतें. तिला तरुण स्त्रीची उपमा देऊन तिच्याशीं विलास करणारा गुरु इतकें स्पष्ट म्हणण्याचें कारण होतेंच असें नाहीं. तसेंच दुसरें उदाहरण, नवव्या अध्यायात २१ वी ओवी अशी आहे—

"जैसा वेश्याभोगीं कवडा वेंचे । मग दारिहि चेपू नये तियेचें ।
तैसें लाजिरवाणें दीक्षिताचें । काय सागों ।"

(ज्याप्रमाणें वेश्येचा उपभोग घेतल्यानें तिला कबूल केलेल्या द्रव्याची भिकारपीड होते, आणि मग तिच्या दाराला हात लावण्याचीहि सोय राहत नाहीं त्याप्रमाणें पुण्याची पुंजी सरलेल्या यज्ञ करणाऱ्याची स्थिति एक्याखद होते त्याचें काय वर्णन करावें?) यज्ञकर्त्यांच्या पदरात जितका पुण्याचा अंश असतो तितका तो स्वर्गातील सुख भोगून सरला म्हणजे त्याला देवलोकातून फिरुन मृत्युलोकाला यावें लागतें. ही उपमा समर्पक आहे यात शकाच नाहीं. तथापि या उपमेला कोणी अश्लील म्हणू शकेल हेंहि खरें आहे. तसेंच तिसरें उदाहरण अठराव्या अध्यायातील खालील ओवीचें म्हणून देता येईल—

आत्मज्ञानें चोखडीं । सत जे मासीं रूपडीं
तेथ दृष्टि पडे आवडी । कामिनी जैसी ।

श्रीकृष्ण म्हणतो ' आत्मज्ञानानें शुद्ध असलेले जे सत तीं माझीं रूपें आहेत. त्या सताच्या ठिकाणीं तुझी दृष्टि प्रेमानें पडू दे—जशी कामुक पुरुषाची दृष्टि सुंदर स्त्रीवर पडते.' याहि ठिकाणीं उपमेंत अश्लीलतेचा वास विनाकारण लागू दिला आहे असेंहि कोणास म्हणता येईल.

तसेंच—

स्वप्नीं प्रियापुढें तरुणाशी। निदेली चेवऊनी वेगीं
आलिंगिलेनिवीण आलिंगी। सकामु करी

## ( १२ ) सार्वकालिक सत्यें

प्रतिभासपन्न व अनन्तदर्शी कवींच्या–तत्त्वज्ञान्यांच्या–तोंडून काही वचनें अमर होण्यास योग्य अशीं निघतात कारण त्यात त्रिकालाबाधित सत्य गर्भित असतें. ज्ञानेश्वराच्या वेळीं जागतिक साम्राज्यवादाचें राजकारण रातलेले नव्हतें. तथापि त्यानीं ज्ञानेश्वरींत सोळाव्या अध्यायात ३४८ ते ३६४ या ओव्यात जें तामस ( आसुरी ) गुणाचें एक वर्णन केलें आहे तें ज्ञानेश्वरानतर सहा शतकानीं जन्माला आलेल्या जागतिक साम्राज्यवादाला कसे लागू पडतें ते पाहा—

म्हणे आजि मिया। रापति बहुतेकाचिया
आपुल्या हातीं केलिया। धन्यु ना मी !
ऐसा श्लाघो जव जाये। तव मन आणीकही वाहे
सर्वांचि म्हणे पाहे। आणींकाचे हि आणू
हें जेतुलें असे जोडिलें। तयाचेनि माडवलें
लाभा घेईन उरलें। चराचर हें
ऐसेनि धना विश्वाचिया। मीचि होईन स्वामिया
मन दिठी पडे तया। उरों नेदी
हे मारिले वैरी थोडे। आणीकही साधीन गाढे
मग नांदेन पवाडे। एकलाचि मी
मग माझी होतील कामारीं। तियेंवाचूनि येरें मारीं
किंबहुना चराचरीं। ईश्वरु तो मी

मी भोगभूमीचा राजो । आणि सर्व सुखांसी ठावो
म्हणूनि इंद्रहि वावो । मातें पाहुनि
मी मनें वाचा देहें । करीं तें कां नोहे
कैं मजवांचूनि आहे । आज्ञासिद्ध आजु
तवचि बळिया काळू । जंव न दिसे आमुचा बळु,
सुखाचा कीर निवडु । राशिचा मीचि
कुबेर आथिला होये । परी तो नेणे माझी सोये
संपत्ति मनसम नव्हे । श्रीनाथाहि
माझिया कुळाचा उजाळु । का जातिगोत्राचा मेळु
पाहतां ब्रह्मयाहि हळु । उणाचि दिसे
म्हणोनि मिरविती नांवें । वायां ईश्वरादि आघवे
नाहीं मजसी सरी पावे । ऐसे कोणी
आतां लोपला अभिचारू । त्याचा करी मी जीर्णोद्धारु
प्रतिष्ठीन परमारु । यागवरी
मातें गाती वानिती । नट नाचे रिझविती
तयां देईन मागती । ते ते वस्तु
माजिरा अन्नपानीं । प्रमदांच्या आलिंगनीं
मी होईन त्रिभुवनीं । आनंदाकारु
काय बहु सांगों ऐसें । ते आसुरी प्रकृति पिसे
तुरंबिति असोसें । गगनीचें तिये

आज लोकांच्या डोळ्यांपुढें असणारी मोठी राष्ट्रें लक्षांत आणिलीं तर त्यांच्या साम्राज्यवादी अहंकारी आकांक्षांचीं अंगें-उपांगें सर्व वरील वर्णनांत तपशीलवार दिसून येणार नाहींत काय ?

---

## ( १३ ) समजण्यास अवघड ओंव्या

ज्ञानेश्वरीची भाषा साडेसहाशें वर्षांपूर्वीची जुनी यामुळें आजच्या सामान्य* वाचकाला दुर्बोध व्हावी यांत काय नवल ! पुष्कळांची प्रथम अशी समजूत असते कीं बोलून चालून ही भाषा मराठी मग ओंवी अवघड अवघड ती

कितीची असणार ! पण तसें नाहीं. कारण खरोखरच काही ओव्या अशा आहेत कीं, त्याचा अर्थ सागणारा न भेटला तर आज मराठी घेऊन एम्. ए. झालेल्या व त्याहून विद्वानालाहि त्या आपण होऊन समजणार नाहींत. उदाहरणार्थ—

१ भुकेलियापुढें अन्न । होत्रा मलतेंसें कन्ह
तरी बुद्धी न घेता लंघन । मार्णे पापरा झाल्या

यातला चवथा चरण गुरुमुखाशिवाय समजणें अशक्य आहे.

२ हे यावडी लोकसृष्टि । मोन्कीये विपाइली दिठी
आणि दुःख कालिंदियेच्या तटीं । झाड होउनी ठेली

३ नाना भेरूवरी सपूर । परमाणू बैसले

४ रत्न पारतियाच्या गावीं । जाईल गह्की तरि सोडावी
कादिमरी न करावी । भिडगणें जेणें

५ आतुवेगु विंदाणु । आशा शका प्रतारणु

६ हाती हाला पुली । पासवणा जेविन घाली

७ आणि दूसालु जैसा घरा । का ददिया हतियेरा

८ वाहेरी धीट जैसी । दाटुगापति क्ळासी

९ पाहेचा पेणा वाटवधा । तव आजाचि होय सावधा

१० पुत्राचिया मोघालागी । प्रेम टागा

११ तियेचा येरू वोडवु मिळे । कोणा अर्थी

१२ अमृताची सातवाडुडी । लागो का अनुघडी

१३ आरें धारणु गिळिला । अत्य राणीवे बैसविला

१४ गुणियासि नागवे । पोडसें तैसें

१५ ढोइये ठेविलेनि मोजें । देवलविसें जेवीं फुजे

१६ ऐसे सावियाची आयेचकु जैं पडे

१७ करीं साधुहृदय राउळी । मगळ उत्ता

१८ पार्सीचि गोसावी न वार्णिजे । मग पाइकाचा गुण घेइजे

१९ अथवा निलागें निसरडा । तपोदुर्गाचा आडकडा

२० जे वेळीं लोह मांसातें घाटी

२१ अग्नि ऐसें आहाच । तेनीं नामाचें आहे कवच

२२ रसाचीच सुघठ । बीज कणिका घनवट

२३ परि दोंखीणा कैसा । वत्साचा मळी
२४ फल हेतूचा उगाणा । कवण चाळी
२५ डोंया चडिया ना गव्हाळा ऐसी
२६ मग स्वर्गावाती वांकुलिया
२७ वोसणताहि बोल । सोप नवचे
२८ जमावरी जगदलें थाखापिजातीं
२९ आपाविरुद्ध जें झालें । तें उपजतांचि याचें नेलें
३० सखोळपणें वळला मोट
३१ आम्ही सावियाचि प्रसन्न होणें । तें आंगाचि वरी म्हणे देणें
३२ मोडोनि मांगाराचा रवा । जेणे घडिलें आंपलिया सवा
३३ पंजिवानी ज्ञातुका । तेचि वेगळिये वाला एका
३४ ऐथ स्वामीचें काज । ना वापिकें व्याज
३५ तरी पढियंतयाची कहाणी । हे मुलीची मारणी
३६ रचूनि महत् तत्त्वाचें खळें । मळी एकें काळुगेनि पोळे
३७ न रिघावे तेथ करणें तोंडें मुती
३८ ज्ञानी मुनीश्वरांची उलान्ही वेद । तरूच्या पानोवानी । हिंडतातीं
३९ तैसा जो पूर्णपणी । पाहतां घाती आयणी
एरव्ही तरी वाणी । तोचि ठावो
४० वेगें आणि लेसा । दिठी घालूनि आविसा
४१ रचलेपणा पडेल । होती हन
४२ (हात) नाभिकारा उचलिजे
४३ जीव सेनापति करूनि घाली । गुरुग्रही जो
४४ आपण भराडा होय । गुरु तो लिंग
४५ म्हणियाचेनि दाटपणें । राजा होय
४६ हारीं उमचावेया । ढुंवारी जैसा ये डाया
४७ जैसे सरलिया लेख । आंख होतीं एक
४८ विदळ बहु चोखा । मीनलिया वाळ एका
४९ प्रभु कारिसरी गुर्के । नुपजे हें काय कौतुकें
५० जाकळीजतु असे वोरसें

## ( १४ ) ज्ञानेश्वरांचें शब्दसामर्थ्य

शब्दार्थांच्या सामर्थ्याची कल्पना ज्ञानेश्वराना फार चांगली होती आणि त्या सामर्थ्याचा उपयोग त्यानीं स्वत: करून दाखविला आहे ते म्हणतात कीं, सूर्यबिंब केवळ वचकेएवढेंच असतें, परंतु प्रकाश पाडण्याला त्याला त्रैलोक्यहि अपुरें पडतें. त्याप्रमाणें शब्दार्थांची व्याप्ति समजावी.

> जैसें बिंब तरी बचकेचि एवढें
> परि प्रकाशासि त्रैलोक्य थोकडें
> शब्दाची व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी
> ना तरी कामतयाचिया इच्छा
> फळे कल्पतरु जैसा
> बोल व्यापक होय तैसा

आणि विशेषेंकरून हें लक्षात ठेवावें कीं, केवळ संस्कृत भाषेच्याच नव्हे तर मराठी भाषेच्या शब्दसामर्थ्याविषयींहि त्याना तसाच विश्वास वाटत होता. ते म्हणतात—

> तो शांतुचि अभिनवेल । ते परियसा म-हाठे बोल ।
> जे समुद्राहुनी सखोल । अर्थभरित ॥

शब्द हा आपल्या व्यापक शक्तीनें मनुष्याचा ऐहिक व्यवहार तर पार पाडतोच, पण तो पठणश्रवणानें मोक्षहि मिळवून देतो

> तैसा मनाचा मारु न करता । आणि इंद्रिया दु:ख न देता
> एथु मोक्ष असे आयता । श्रवणाचि माजी

ज्ञानेश्वरींतील सिद्धातांची ठाशीव माडणी, आणि अलंकार-दृष्टात यांच्या सहाय्यानें परिणामक प्रतिपादन या दोन गुणाशिवाय तिसरा एक महत्त्वाचा गुण मला ज्ञानेश्वरींत वाटतो तो चटकदारपणा सिद्धातांचें मर्म किंवा उपमा-दृष्टांतादिकांनीं पडणारा प्रकाश याहून हा गुण स्वतंत्र आहे हा चटकदारपणा शब्दांच्या ठेवणींत साठविलेला आहे, व तो साधण्याला एक प्रकारची सफाई किंवा लीलाकौशल्य हेंच कारणीभूत होतें. यातच ज्ञानेश्वराच्या खऱ्या भाषाप्रभुत्वाची साक्ष पटते आणि मला वाटणारा हा विशेष गुण स्पष्ट करण्याकरिता अध्यायक्रमवार कांहीं उदाहरणेंच देतों:—

१ एथ चातुर्य शहाणें झालें । प्रेम रुचीस आलें । आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें येथ २ रंगीं सुरंगतेची आगळिक ३ अर्थजात सुरवाडलें ४ लावण्याची

२

नव्हाळी ५ घनशोभेची खाणी उघडे ६ पदं आलें परिपाकें आमोदासी ७ बोल प्रार्थी शोधिजे। प्रमेयासी ८ महातेज कवणें धवळावें ९ न्यून तें पुरतें। अधिक तें सरतें। करूनि घेयावें १० दळभार संरसे करा ११ त्रैलोक्य बधिर झालें १२ भिरुदाचे दादुले हिंवताती १३ उसिणां धाईं झुंझावें १४ ही कीर्तीच स्वयंवरें आली तुज १५ पापा वरपडा होसील १६ हे सांख्य स्थिति मुकुलित सांगितली १७ देखें संतासंत कर्मी। हे जें सरसेपण मनोधर्मी १८ तेणें निचाड होइल मन १९ जयातें अभ्यासाची घरटी। यमनियमांची ताटी २० संगें प्रगटे मूर्ति अभिलाषाची २१ ये युक्तीची कडसणी। नाहीं जयाच्या अंतःकरणी २२ सांगे सूर्याच्या घरा। प्रकाशू काय वातीवरी २३ आमुच्या काजा कीर आलें २४ आतां संपलें म्हणों पां आघवें। विवेकाचें २५ तंव तुम्ही एकेक नवाई २६ आणि तुवांचि ऐसें करावें। तरी सरलें म्हणे २७ तरी झकवितु आहासी मातें २८ आजि पुण्य यशासि आलें २९ वोळखीसवे पावे तद्रूपता ३० परि उपास्ती ते योग्यते। आधीन असे ३१ पक्षी फळासि झोंबे जैसा ३२ मग संतुष्टीच्या ठायीं कुंठे सहज ३३ वाचा सिद्धि पावाल। आशापक होवाल. ३४ दैवचि मूर्तिमंत। येईल देखां कादत। तुम्हांपाठीं ३५ इंद्रियें बरळों नेदी ३६ जो असतिये समृद्धि। विनियोग करी ३७ खंती करिती कर्माची। ते गांवढे गा ३८ कर्मी भरून होवावा तैसा। निराशाहि ३९ अलौकिका नोहावें। लोकाप्रति ४० एथ निजवृत्तीचा वोलावा। नासों नेदी ४१ जयांसि भुकेलिया आमिषा। हें विश्व न पुरेचि घासा ४२ तिये भ्रांतीहि धाकुटी। वाल्ही दुल्ही ४३ सत्याचा मोकसा काढिला ४४ विवेकाची न्याय पेडिली। वैराग्याची साल काढिली ४५ बोधाची चोपी द्धरिली। सुखाची लिपी पुसिली ४६ मनाची धांव पारुषेल। आणि बुद्धीची सोडवण होईल ४७ गुरुशिष्याची गोष्टी। पदपिंडाची गांठी ४८ श्रवणेंद्रियें पिकलें ४९ कैसी आगळीक दैवाची ५० आशा येणें मानें यशा येतीचि ना ५१ कैसा याचिये आवडी। आवरला असे ५२ तूं प्रेमाचा पुतळा। भक्तीचा जिव्हाळा। मैत्रि येची चित्कळा ५३ दोघांची लिहिली फेंडी। सज्ञानाकरवीं गुढी। उभवी मी ५४ धर्मासी नीतीशीं। हौस भरीं ५५ भक्तां निवती डोंदे। सात्त्विकाची ५६ पुण्याची पहाट फुटे ५७ ते मज तयां उरले। पदर नाही ५८ एथप्रति फळे भावना। ५९ आपुलाली ५९ जैसें कां कुडें नाणें। सत्याचेनि सारखेपणें। डोळ्याचेंहि देखणें। संशयी घाली ६० एथ मोहले गा क्रांतदर्शी ६१ न भोगितां

भोगिलें। भाग्यजात ६२ जो श्रद्धेचेनि सभोगें। सुरिया जाहला ६३ कथेची संगति। भावाची संपत्ति। रसाची उन्नति। ६४ बुद्धीची भाषा नेणिजे। मनाचा अंकुर नुदैने ६५ कैसा वासनेचा ससारा। देहा होऊं नेदी उजगरा ६६ जैं भ्रांतिसे जे सुतला। तें स्वप्नसुख भुतला ६७ अगा करितेनवीण कर्म। तेंचि तें नैष्कर्म्य ६८ फळासला खुंटी। फळभोगाच्या ६९ करितुचि न करीं काहीं। फलत्यागी ७० महाभूतांचें दळवाडें। उभारिलें मलें ७१ देसें आपुलिया प्रतीति। जगचि मुक्त ७२ अमृत नायके कानीं। मृत्युकथा ७३ जैसें जळासि जळ लोळे। ते आपिके म्हणती वेगळें। कल्लोळ हें ७४ तरी विपुस्फुरणें का न पाहे। जगामाजीं ७५ तें मी जाणें निखळ बोतले। सामरस्याचे ७६ ते आनंदाचे अनुकार। सुखाचे अंकुर ७७ सुखाच्या डोहीं। एकसदा तळुचि घेतला ७८ तो पव्हण्याहूनि पाय उतारा। सोहळा जैसा ७९ जे अमृताची बोतली। कीं प्रेमचि पिकूनि मातली ८० सहजें अक्षरतांचें पारणें ८१ अमृतातेंहि पैजा जिंके। ऐसीं रसिकें अक्षरें मेळवीन ८२ आल्हादाच घोलाची वालीफ फेडिजे। आणि प्रज्ञाचिया अंगा घडिजे। मग सुखेंसि सुखाडिजे। सुखाचिमाजी ८३ जे दिठीहि न पविजे। तें दिठीवीण देखिजे। अतींद्रिय परी भोगवीन। इंद्रिया करवीं ८४ नवी लागेल ढाळें ढाळें। वैराग्याची ८५ तरी आपुली स्वस्ति सहजें। *आपणचि केली ८६ तया पावे तें आहे। तोचि म्हणउनी* ८७ मग लागला जंव पाहों। तंव ज्ञान तें तोचि ८८ आवडी आणि लाजवी। व्यसन आणि शिणवी। दिसें आणि न भुलवी। तरी तें काई ८९ आल्हादिल्यिा तरी जोडे। स्वर्गसुख ९० ऐसी रम्यपणाची थोरी। अखंड जेथ ९१ जनाचेंहि पायखें दळेंविना ९२ इंद्रियांची कसमस मोडे। मनाची घडी घडे ९३ प्रवृत्ति माघौति मोहरें। समाधि ऐलाडी उतरे ९४ नेत्रद्वारीची कवाडें। लागू पाहती ९५ कल्पना निमे प्रवृत्ति शमे। आग मन विरमे। सावियाची ९६ विद्युल्लतेची विंडी। वन्हिज्वाळाची घडी ९७ तेथ नक्षत्र जैसें उलडलें। का सूर्याचें आसन मोडलें ९८ सिद्धरसाचे ओतीव। आनंद चित्रींचे लेप ९९ पृथ्वीतें आप विरवी। आपातें तेज जिरवी। तेजातें पवनु हरवी। हृदयामाजी असे १०० योग्यता जे म्हणिजे। ते प्राप्ताची अधीन जाणिजे। योग्यतेची काई उखाणी १०१ मनाच्या कानीं ऐकावें। बुद्धीच्या डोळां देखावें १०२ जाणीव जेथ न रिघे। विचार माघुता पाउली निघे १०३ साग तयाचे बोलणें खुटे। ऐकतयाचें व्यसन तुटे १०४ जडातें जीववी। चैतन्यातें चेतवी १०५ अर्यासव धर्मु

थोर होय १०६ डोळ्याचे डोळानि पटव रचे । तेथ देखणेपण डोळ्याचे । न गिळिजे काय १ १०७ पार्थरयाच्या तरगा । मानि मतिभ्रमाचा जरगा १०८ ऐक्याचा उतारा । जोडला बोधाचा तारा १०९ ते पोहती पाणिये । तळ्हा तिचेनी ११० उगाना भाव का मुतावें १११ अहकारा तूसी । यालभ पडले ११२ पिकल्या रस गळे । पूर्णतेचा ११३ हृदयाच्या जीवा गुनगुलिया होत आहाती ११४ गगनाचेनि पालवें । गाळूनि घेतलें ११५ जो चेतनेचा चक्षु । इंद्रिय देशींचा अध्यक्षु ११६ गगनाहूनि जुनें । आणि परिमाणूहूनि साने ११७ घगनाद लयस्थु । धटेसींच होय ११८ सयमाची अखडे । सर्वद्वारी कवाडें । कळारती ११९ जें भुलीचे मरीव । पिरल्याचे पोतीज १२० अक्षरें पुसिल्या न पुसे । अर्थु जैसा १२१ मरतिये जीवाकारी । अमर जें आहे १२२ म्हणोनि अक्षर जें म्हणिजे । तेविचि म्हणता बोधहि उपजे १२३ ते विदेही जे देहेंचि । वस्तु जाहाले १२४ जे विटे ना सरे । महासुखाचें सोयरें माव हचि १२५ वारयाचिया धारसा । कणाचा आपैसा । राशिवा जोडे १२६ गाहगे मडकेयाचे कोंम । ते तुलालमतचि गर्भ । उमटले कीं १२७ बीजाचिया वेल्याल्या । समर्थ भूमी १२८ तें जाणणेंचि जाणणेया थाड । रिघोनि ठाके १२९ ज्ञानचि तें आधारें । ज्ञानेसि करी १३० ज्ञातीसि आले । पालव नवें १३१ तयाचिया ज्ञाना । पाठी पोट नाहीं १३२ कर्माचे डोळे ज्ञान । तें निर्दोष होवावें १३३ एथ जाणीव करी तोचि भेणे १३४ काय पखुडी फुकता दीप लागे १ १३५ श्रवणेंद्रिया देवें घातली माळ १३६ चित्त चाकाटलें वाचा पागु ळली १३७ आनंदाचे राशीवरी बैसावें १३८ वाचाचि केली कल्पलता विवे- काची १३९ आनद भाडारा केली वोवरी १४० तरंगासी धवळारें तरगचि होती १४१ बोध बोधाची लेणी बोधेंचि मिरवी १४२ उपास्तीची पदवी मी पोषित जाये १४३ आजि आयुष्या उजवण जाहली १४४ अद्वैतहि वाचामाजि नटनाच सत्याचा १४५ जीवचि करोनि श्रवण आइकोनि आइक १४६ मग केल्यानुरूप होती भोग नियम जे १४७ जेणे चोखाळत दिसे न्याय १४८ नुघडता बाल्पणाची कुरी १४९ देहियेच्या सुखासनीं मिरविले रस १५० रसा जाहलें प्रयाग १५१ रसभाव फुलीं फुलेल १५२ हे जीवा आतुलीं चाड १५३ दावी विश्वरूप झाडा देउनी १५४ सेहा घातलें आहे माजवर— १५५ पाचहि पालव मोकलिले मजप्रति १५६ ऐसी थोर आस जीवें बाधोनि आहे १५७ आर्तीचे डोहाळे पुरवी देवा १५८ शृगारश्रियेचीं भाडारें उघडिली

१५९ आतंचि लेंगे लेइला १६० मोलत मोलन घसाळ गेलो १६१ तीं अक्षरें नव्हती ब्रह्मसाम्राज्यदीपिका १६२ चमत्काराचे एकार्णव जाहले १६३ दिशाचे ठाव हरपले १६४ लावण्यश्रियेचीं निधानें प्रगटलीं १६५ सौंदर्या साणीव जोडिली १६६ दर्शनाची अनेकता प्रतिफळली १६७ आत आनंदा चेहरे जाहाले १६८ नक्षत्रांचें होत पुडाणे १६९ बापुड्या त्रैलोक्याचा होतसे हुरडा १७० सुरवाडली सात्त्विकांची माधवी १७१ सुखाचें सोहळे सुयाणें पाहिलें १७२ आलें मरण रसाचे लोंढे १७३ योगसुखाचें सोहसिद्धीचे मळे १७४ आत्मसुखाची पाळेगी १७५ विवेकवल्लीची लावणी १७६ कैवल्याचा अधिकारी मोक्षासि सोडी बांधी करीं १७७ जयाचेनि आठवे शब्दसृष्टि आगवे १७८ रस होती वोळगणे अक्षरेंसी १७९ हाता चढे संपूर्ण तत्भेद १८० तर्कु येणें तोंडाळु केला १८१ जीव वस्ती करू वाटे जातां १८२ आकाशीं कवणें केली मेघाचीं मरणें १८३ पुराणे द्रयेविषयीं मतपत्रिका १८४ सुख दुःखाची उखीविखी १८५ मन रजोगुणाच्या खांदीं तरळत असे १८६ मनोरथाच्या उतरडी १८७ ( सुख ) देहस्मृतीची भाय मोडिते १८८ परतत्त्वा अरौते स्थावरा आतौतें १८९ योगी गगन गिळितातीं स्वर्गाची आडवंगी उमरडोनी १९० ( ज्ञान ) अनावरातें ज्ञेयातें वेढाळी १९१ झाडाचेनि साजेपणें वसंताचे रिगवणे १९२ कोंभाची लवलव भूमीचें मार्दव सांगे १९३ दर्शनाचिये प्रशस्ती ( पुण्य पुरुष वोळखावा ) १९४ जाण तया ज्ञानासी शेज जहाली १९५ पथ्यागना वडिलपण लपवी १९६ मातामतालरां निर्वेचु कीजे १९७ कृपा फली फुळी आली १९८ माधुर्या आले अंकुर तैसे दशन १९९ मवई कृपणाची नुचलावी ऐसा भाव जीवा २०० पतिव्रते आलें वार्धक्य जैसें २०१ थासुडेल वारा नव लागे अचरा २०२ हाता हाचि सरोवा जे जोडिजति २०३ तें मजचि गा सावयव ऐसे जाणे २०४ मागुतिया पाउली पळे अवधान येतें २०५ नाना द्रवी मार्तीं घामेजेना २०६ जगींसि जुनाट सोयरीक २०७ चोखाळपण रत्नाचें रत्नावरी किरणाचे २०८ ज्ञान तयापासी पाइकी करी २०९ सामरस्याची रस सोय २१० गुरुदास्यें कृशु गुरु गुरुप्रेमे सपोषु २११ सोय चुकी घोली केली २१२ माधव तीर्थी न्हाणिला २१३ उपवासी अन्नें लिंपिलें २१४ कुसुमसेंदूर केले कात हीनेने २१५ आकाश वोसरो पृथ्वी विरो २१६ मचपा आगीचें वज्र लेणा हातींचें शस्त्र २१७ वेलावरी शस्त्र घावले आहे २१८ मरणें मृत्यु मारी आपण उरे २१९ ताम्बूलें घोट यावू हासतां दात दाऊ २२० झाला आमि तरी रात्रोंडी जाळील काइं २२१ अत्यु राणीवे

मैसाविला २२२ जया गजबजेचें कौतुक २२३ वोहरेवीण धाधावणें २२४ नभाचे शून्यत्व गिळुन २२५ तेजा दिवे लावणी जेगे तेजें २२६ सरीळ्या लेख आंख होती एक २२७ हे नादाची टांकसाळ हें चमत्काराचें पेव्हाळ २२८ (मायेची) सौभाग्य व्याती २२९ हालो असतुचि आहे २३० हा महत्वाला गोसावी अल-कोल खाधरी २३१ सोलीव फलितार्थ २३२ ज्ञानाचा टोळा डोळसां माजी डोळस २३३ अर्थाा शुभेदी उपमालेन कोंदाकोंदी २३४ नभ तुजमाजि खेळे लपीथपी २३५ नाही प्रभावेळी वेल्हाळ काव्यें होई सकळ २३६ वसंत होई स्नेहाळ शिरोमणी २३७ अवधानाची सवे लेला भेळवुनिया द्या ज्ञाना शोभावें २३८ उजवणी आजि वक्तृत्वता २३९ माझी ग्रहिण अनादि तरणी २४० युगानुवृत्तीची करी चोज पाउलें २४१ जळधारधी गळु आसडी २४२ चातुर्य-चंद्रा गगन चित्त मालें २४३ नादकणे तें कानचि पाळी २४४ वासना एकवटे प्रवृत्ति योहटे मानस विटे २४५ गुणाचिये गजबजे डोलेना २४६ चंद्रबिंब सोळावें नलगे २४७ परमाणु भूतळीं हिमकण हिमाचळीं २४८ ज्ञानाची दिवाळी करी २४९ श्रवणसुखाच्या मांडवी वाचावल्ली २५० प्रेम रळत असे बोलतां २५१ झालें गगनाचि पाळवियें २५२ आकारजाताचें दुसपडी केळे २५३ तें पान वाल्हें दुल्हें एक निघे २५४ मंगत्वचेचे वेल पल्लव २५५ कल्पांतींचीं झुंबाडें पाल्हेजती २५६ सत्याची बाहुटळ रुपाण सुटे २५७ मृगजळाचेनि पाणिये लाविती साळी केळी २५८ वांझेचिया लेका जन्मपत्रिका २५९ गगन लोळे गगनावरी २६० फळली केळी उन्मूळे २६१ सगळिये पाटणी एकेचि दीपें दिवे लावणी २६२ संवादसुखाचें रसाळ २६३ ताकाचे थेंड फेडणें याचि नाव लोणी काढणें २६४ काळासि जूं (जुगार) खेळणें २६५ ज्ञानें कीर्तिमुखत्व केलें २६६ सुखासि सुख जोडलें शून्य बुडालें महाशून्यीं २६७ परिपाकीं दुणावलें २६८ कमळांचा लिंगदेह २६९ विरहवेडीं बुद्धिबोध २७० महानंदाची दाटणी महानंदाचा पूर २७१ सुखानुभूतींची देणी घेणी २७२ इष्टानिष्टकरणी दोघींचि द्या कवतिकणी २७३ प्राणेंद्रिय शरीर आटणी २७४ वसंताचिया वाहाणी वनश्रीच्या अक्षौहिणी २७५ वाचेचा चौधारा पसारा २७६ मोह लोहाची साखळी २७७ उधवणीचें तोंड उभवी धुवाचे उमट २७८ नारिकळ्याचे हाट रोविलें २७९ वारद्याचा मोकळा । उगाणा घेती क्षीर रसा २८० पातकांची दाटुगी सभा २८१ (तुझ्या हातीं) विश्व प्रामाण्याची मुदी मुद्री २८२ श्रद्धेचें दळवाडें २८३ वाफेच्या शिंगे वाती लागल्या २८४, सर्व

वैसोनि नारी का गीतार्थील करी २८१ आइकता रुचि न विटे २८६ आचा-
रार्चे मूळपीठ वेदाची उतार पेठ २८७ साद घातलिया आकाशा २८८ वोळविजे
ऋणाइतु २८९ चालनयाची मार्ग साडे २९० गीतार्थांची मुद्दमुदी २९१
प्रमेयाची उजरी २९२ न पेढ्दिता ऋण वोसडीना २९३ वसतें दुणात्र वन २९४
चालें वेगावत जाय २९५ भोजनसुख महाग पाककरिता २९६ सकल्प लावी
दिवा वाचेच' २९७ वारा वाजोनि वोसरे २९८ वराता (शिक्षा) ल्यात्रिजति
आकाशा २९९ कर्माचें जितवणी (ओलावा) ३०० आनद दुणवटे ३०१ वायु
वाहुट्ळी चळला ३०२ हाट मेरीचें कलन ३०३ समीन निमीन भार्गी ३०४
नवगुण टिकला लेणे ३०५ जाणिव नेणिव नेणोनि जाणिजे. इत्यादि.

---

## (१५) ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान

तत्त्वज्ञान व काव्य या दोनहि दृष्टींनीं ज्ञानेश्वरीचें महत्त्व विशेष आहे. ज्ञानेश्वर तत्त्व हा शब्द व ज्ञान हा शब्द उपयोगात आणतात. उदाहरणार्थ, तैसे विचारीता निरसले। ते प्रत्यु सहज साडवले। मग तत्त्वता तत्त्व उरलें ज्ञानीयासी ॥ किंवा—तरी तत्त्वा परस्परें। उघड जातीं स्वभाव वेरें। नव्हे पृथ्वी ते नीरें। न नाशीजे ॥ आणि ज्ञान हा शब्द तर सर्वत्रच येतो. त्याविषयीं उदाहरणें देण्याचें कारण नाहीं. तथापि, तत्त्वज्ञान हा आधुनिक पारिभाषिक शब्द ज्ञानेश्वरींत कसा सापडणार ? तत्त्व हा शब्द ब्रह्म शब्दाचा वाचक म्हणून योजलेला आढळतो, व क्वचित् तो पचमहाभूतांना उद्देशून लावलेलाहि आढळतो. आणि ज्ञान याचा अर्थ या दाहाची जाणीव. विज्ञान हा शब्दहि आधुनिक अर्थानें ज्ञानेश्वरींत नाहीं व नसणारच विज्ञानाचा अर्थ ज्ञानेश्वर हे प्रपच किंवा ससार असा पदार्थरूप करतात शकराचार्याप्रमाणें ते त्याचा अर्थ अनुभव असा करीत नाहीत. ज्ञान हें मोक्षप्राप्तीचें मुख्य साधन होय. म्हणजे तें निव्वळ बौद्धिक ज्ञान नव्हे, तर ज्ञान म्हणजे काहीं झाल्यानें जिवाला प्रत्यक्ष येणारा अनुभव पाठिमाझा तियें प्रसादीं। माझें ज्ञान जाये सिद्धि। तेणें मिसळी जे निशुद्धो। स्वरूपी माझा ॥

* ज्ञानेश्वराचें तत्त्वज्ञान अद्वैती आहे त्यात द्वैताची भेसळ नाहीं. द्वैत हा शब्द ज्ञानेश्वरींत येतो. परंतु तो मूळ वस्तुभेदानें नाहीं. तर, ईश्वर व जीव या भेदानें.

ईश्वर व भक्त या भेदानें. म्हणवूनी कर्म आणि कर्ता। या द्वैतभावाची वार्ता। नेणे तो पाडुसुता। सात्त्विक त्यागू।' मूळ उत्पन्न होताना ब्रह्म व प्रकृति हीं समांतर स्वतंत्र उत्पन्न झालीं असें द्वैतवादी सांख्यशास्त्र मानतें, तें ज्ञानेश्वर मानीत नाहींत. उत्पन्न झालें तें एक मूळ ब्रह्मच. द्वैत हा प्रथमपासून आभासच होय. किंबहुना ब्रह्म हें मुळां अजातच म्हणजे न जन्मलेलेंच आहे. या आभासामुळें जन्माची कल्पना उत्पन्न होते. म्हणून विश्व, जीव, इत्यादि आभास आहे. तो मूळ जीवानें उत्पन्न केलेला आहे आणि स्वतः जगाप्रमाणें जीव हे अज्ञानात्मक प्रकृतीचे दोन विभाग आहेत. वस्तुतः जीव व जग हीं परमात्मारूपच आहेत. मूळ ब्रह्माच्या विकासानें किंवा विलासानें पुढें सर्व सृष्टि उत्पन्न झाली. परंतु ती सत्य वस्तु नाहीं जीवानें अहंकारामुळें स्वतःला वेगळेपणा आणला आणि त्याचप्रमाणें आपल्या संकल्पानें त्यानें जगाला वेगळेपणा आणला. आणि एकदा संकल्पात्मक—भ्रमात्मक सृष्टि निर्माण होऊं लागली म्हणजे तिला अंत कसा राहणार? तिचा विस्तार अनंत म्हणण्याइतकाहि मोठा होतो. परंतु तो सर्व विस्तार, ज्ञानानें भ्रमनिरास झाला म्हणजे, नाहींसा होतो.

अद्वैत तत्त्वज्ञानाची सिद्धि करणें फार कठीण कारण बुद्धि ही त्याला अपुरीच पडणार. अशा कार्याला वाचा तर पुरी पडूंच शकत नाहीं. यामुळें जें एक प्रकारें बोलता येत नाहीं, तें अन्य प्रकारें बोलून दाखवावें येवढीच युक्ति मन करितें. म्हणून या अद्वैत तत्त्वज्ञानात जे अनेक वाद म्हणून आढळतात, ते ' कलह ' या अर्थाचे वाद नसून केवळ समजूत पटविण्याचे निरनिराळे प्रकार आहेत. आणि जो तो आपल्या अभिरुचीप्रमाणें यापैकीं एखाद्या वादप्रकाराचा उपयोग करितो ज्ञानेश्वरींत या बहुतेक वादांचा स्वीकार अगर अभिप्रेत असा उल्लेख केलेला आढळेल कारण आर्धीच अद्वैतसिद्धीचें बोलणें अवघड, त्यातून तें बोलणें काव्याच्या भाषेंत बसवावयाचें, आणि उपमा दृष्टांतादिकांनीं समजावून सांगावयाचें यामुळें या वादांतील सूक्ष्म भेद काढून अमुक वाद ज्ञानेश्वरांनीं स्वीकारला नाहीं, किंवा अमुकच स्वीकारला, हें सिद्ध करणें कोणालाहि कठीण जाईल जें दिसतें त्याला वेगळें स्वतंत्र अस्तित्व नाहीं, किंवा जें दिसतें तें वेगळें दिसत असलें तरी स्वतः पाहणारा हाच तें आहे, आणि जो पाहणारा जीव तोहि मूळ आत्मा—परमात्माच—आहे, असें वेगवेगळ्या प्रकारांनीं बोलावें लागतें. हें सांगताना—समजताना बुद्धीला किती कसरत करावी लागते याची कोणालाहि कल्पना होईल. आणि

त्यातही फिरून हें झाले कीं, वेगळा म्हणून दिसणारा जीव तो व्यवहारी व मोक्षार्थी असा मानून, त्याचें चरित्र गीतादि ग्रंथात व ज्ञानेश्वरींत इतकें परोपरीनें रंगविण्यात आलेलें आहे कीं, मूळ परमात्मा हा दृष्टींतून जाऊन मायेनें म्हणा, भ्रमानें म्हणा, सकल्पानें म्हणा, सृष्टि व जीव हीं त्यावेळे पुरतीं इतका सत्यरूप वाटू लागतात का, त्याचा निरास करावयाचें मनात आणल तरी ह काय परम दुघट होऊन बसतें आपण गीतेचेंच उदाहरण घेऊ तींत जीव हा इतका सत्यस्वरूप, व्यवहाराकरिता का होईना, मानलेला आहे कीं, त्याला निष्काम स्वधर्माची नीति आणि ईश्वरभक्ति हा दोन उप देशाच्यातच सगळी गीता खर्च पडली आहे, असें कदाचित् म्हणता येईल एखाद्या मूठभर बाहुलीला ठाणभर वस्त्र नेसवाव त्याप्रमाण अद्वैत वेदाताला आधारभूत असलेलें ब्रह्म आणि सृष्टिप्रपच याच्या वर्णनाचें प्रमाण बसतें असें विनोदान म्हटल तरी त्यात अतिशयोक्ति होणार नाही. मूळ ब्रह्म ह एकदा निर्गुण निराकार असें म्हणून टाकल कीं, त्यापलीकडे त्या विषयीं काही सागण्या बोलण्याच उरल नाही परतु प्रकृतिजन्य मायाजन्य ससार-प्रपच वर्णनाला काढल म्हणजे त्या कामाला बुद्धि, प्रतिभा, वाणी हीं पुरींच पडत नाहींत असं माणसाला वाटू लागत मूळ अद्वैत ह काय असेल त असो पण स्वधर्माचरण व भक्तिमार्गान मोक्षप्राप्ति हा जीवाला सागितलेलीं कर्तव्यें इतकीं उदात्त व मोहक आहेत का, त्याच्या विचारान वर्णनात मनुष्य मग्न होऊन जातो

स्वत ज्ञानेश्वर ह ज्ञानवादी असले तरी भक्तिमार्गी होते ज्ञानावर अधिष्ठि लेली भक्ति म्हणून त्याच्या भक्तीला ज्ञानोत्तर भक्ति म्हणतात अगदी अतिम स्वरूपी भक्त हा ईश्वराच्या सायुज्यतेनें काय मिळून जावयाचा तो मिळून जावो, परतु भक्त व भक्ति या शब्दानीं द्वैताची कल्पना इतक्या उठावदार रीतीनें मनावर ठसते कीं, ती पुसून टाकणें कठीण जात आता ज्ञानेश्वर व सत मालिकेतील इतर भक्त मडळी याच्यामध्यें कदाचित् थोडा आचारभेद असेलहि कारण इतर काही भक्ताप्रमाणें ज्ञानेश्वर हे सगुण दैवताची पूजा स्वीकारून भजनपूजनाचा थाट सभार सजवून त्या ऐश्वर्यात कधी गर्क झालेले असतील असें वाटत नाहीं. जनाबाईला आपलें दळण दळण्याला ईश्वर धावून आला असें वाटलें, त्याप्रमाणें ज्ञानेश्वराना ईश्वराशीं अगदी घरगुती स्नेहाचें, सहकारि तेचें, घरोबरीचें नात ठेवलें नसेल इतक तरी निश्चित वाटतें त्याचा भक्तिप्रकार

अत्यंत प्रौढ प्रतिष्ठित अशा डोळ्याचा म्हणजे केवळ मनानें अंतरंगानें भक्ति प्रगट करण्याचा असावा असें वाटतें.

ज्ञानदेवांना द्वैती म्हणणें ही वावदूकपणाची परम सीमा ठरेल. 'भक्ति, सगुण पूजा इत्यादि करणारा जीव हा परमात्म्याहून वेगळा मानल्याशिवाय कसें चालेल?' असा युक्तिवाद करिता येतो, पण अद्वैताची स्थिति ही अंतिम स्थिति आहे, आणि त्या स्थितीला पोंचण्याला जीवाला ज्याप्रमाणें द्वैतांतूत जावें लागतें, त्याप्रमाणें अद्वैताची अंतिम स्थिति वर्णन करण्यालाहि त्याला त्याला द्वैतदर्शक शब्दांचा उपयोग करणें प्राप्त होतें. या अडचणीचें वर्णन ज्ञानेश्वरांनीं अशा शब्दांत केलें आहे—

> सर्वादि जें एक। तेथ कें व्याप्य व्यापक
> परि बोलावया नाव एक। करावें लागे
> पैशून्य जें दावावें जालें। तें बिंदुलें एक केलें
> तैसें अद्वैत दावावें बोलें। द्वैतचि कीजे
> म्हणोनि गा श्रुति। द्वैतभावें अद्वैतीं
> निरोपणा वाहाती। वाट केली

चोद्य वा परिहारो वा क्रियते द्वैतभाषया (विद्यारण्य)

अद्वैत निरूपणाची एक वाहाती रूढ रुळलेली लोकपरिचित अशी वाट म्हणजेच द्वैतनिरूपण. द्वैतवर्णन हें अद्वैत वर्णनसाध्याचें साधन ठरतें. हें दिसायला चमत्कारिक वाटे. पण ज्ञानाचा व्यवहार शब्दांनींच करावा लागतो त्याला काय करणार? निराकार शून्याची कल्पना येण्याला साकार असें शून्य कागदावर लिहून काढून दाखवावें लागतें असें वरील ओव्यांत जें म्हटलें आहे तें फारच समर्पक आहे. शून्याची कल्पना येण्याकरिता बिंदुलें काढून दाखविलें, पण नंतर तें पुसल्यावरच खऱ्या शून्याचा बोध समजावा, तसेंच शेवटीं 'शून्यहि पुसालें शून्यीं जिये,' असा हा सर्वशून्यसिद्धांताचा निष्कर्ष होतो.

मात्र द्वैताची स्थिति जशी स्वाभाविक तशी ती दुसऱ्या बाजूनें हुकमीहि आणिता येते. 'डोळा घालिता अंगुळी एकाचीं तीं दोन झालीं.' असें तुकारामानें म्हटलेंच आहे. मद्यपी देखील एकाच्या ठिकाणीं दोन दिसण्याचें (See double) स्थिति हेतुपुरस्सर आणू शकतो.

ज्ञानेश्वरांनीं गीतेंत नसलेली भाषा वापरून श्रीकृष्णानें उपदेशाच्या

अतां अर्जुनाला केवळ सवादसुखासाठीं अद्वैतातून द्वैतात आणल्याचें वर्णन मौजेनें केलेंच आहे.

गृहिणी ताक करून त्यातून लोणी काढते, पण तें तिला परत ताकात जिरविता येत नाहीं. पण ईश्वराला जीवासमर्थी तें करता येतें.

> मग ताकौनिया काढिलें। लोणी मागौते ताकीं घातलें
> पारे न घेचेचि काहीं केलें। तेणें जीवीं
> तैसें अद्वयत्वें मज। शरण रिघालिया तुज
> घर्माधर्म हे सहज। लागतील ना

अद्वैतातून द्वैत बुद्धिपुरस्सर निर्माण करणें आणि फिरून द्वैत निरसून अद्वैत सिद्ध करणें ही ईश्वराची लीला आहे इतकेंच ज्ञानेश्वर म्हणतात. सवाद-सुखासाठीं अर्जुनाला द्वैतात आणला, पण फिरून—

> हृदया हृदय येक जालें। ये हृदयींचे ते हृदयीं घातलें
> द्वैत न मोडिता केलें। आपणा ऐसें अर्जुना
> दीपें दीपु लाविला। तैसा परिष्वगु तो झाला
> द्वैत न मोडिता केला। आपणपें पार्थ

असो अद्वैत शून्यरूप आहे पण अभावरूप नाहीं ही कल्पना बुद्धीला पटा-वयाला कठीण होय यात शंका नाहीं. पण तत्त्वज्ञानाच्या सिद्धांतिक कल्पना अशाच कठीण असतात. आणि आता विज्ञानवादी देखील हें म्हणू लागले आहेत कीं, विज्ञानात्मक उपपत्तीच्याहि कल्पना अशाच समजण्याला कठीण आहेत. विज्ञानप्रतिपादनात गणिताचा भाग बराच येतो आणि या गणितानें अशीं काहीं समीकरणें ( ईक्वेशन्स ) निष्पन्न होतात कीं, त्याचा प्रत्यय येऊच शकत नाहीं आहे आणि नाहीं, अस्तिभाव व नास्तिभाव, हे सामान्य तर्क-शास्त्राप्रमाणें असबद्ध परस्परविरोधी आणि अशक्य वाटतात. पण अद्वैतसिद्धा ताची मदार अशा विरोधावरच असून, त्याच्या सिद्धांताचा उपन्यास अशा न समजणाऱ्या भाषेनेंच करावा लागतो व केला जातो. तेथें शब्द व्यर्थ ठरून मूक अनुभूतिच उपयोगी पडते.

> न बोलणें ते बोलों। जेथील सर्व नेणिवा जाणणें
> काहींचि न होउनि होणें। जे वस्तु गा

बोलल्याशिवाय बोलणें कसें असेल हृ काहींसें समजतें, पण जाणल्याशिवाय जाणणें कसें असेल याची कल्पना तरी कोण कशी करू शकेल!

पण मायावाद स्वीकारून सृष्टि, संसार, जगत्, जीव इत्यादि निर्माण होऊ लागल्याची कल्पना मनानें केली म्हणजे मग, समजुतीचा मार्ग सुलभ होतो. कारण यापुढील सर्व मानवी अनुभवातच बसण्यासारखें आहे.

ज्ञानेश्वरी ही अद्वैततत्त्वज्ञान, सांख्य, पातंजल योग, निर्गुण भक्ति, सगुणोपासना आणि कर्मयोग या सर्वांचा परामर्ष सारख्याच मान्यतेनें कशी घेऊ शकते असा आक्षेप कित्येक घेतात. परंतु त्याला उत्तर हेंच कीं, ज्ञानेश्वरी ही गीतेवर टीका आहे. यामुळें मुळांत गीतेनें ज्यांना ज्यांना यथाप्रसंग सर्वसंग्राहक बुद्धीनें मान व महत्त्व, त्यांना त्यांना तोच मान व तेच महत्त्व देणें ज्ञानेश्वरांना प्राप्तच होतें.

तथापि अद्वैतसिद्धांत हाच त्यांना स्वतःला पटणारा–आवडणारा सिद्धांत असल्यामुळें तो विषय जेथें आधाराला थोडासाहि सांपडला तेथें तेथें ज्ञानेश्वरांनीं आपली स्वतंत्र बुद्धि चालविली आहे व तो सिद्धांत सर्व प्रकारच्या युक्ति योजून परोपरीनें आळविला आहे. यामुळें शांकरभाष्य किंवा गीतेवरील शंकराचार्यांची टीका वाचणारापेक्षां ज्ञानेश्वरी वाचणाराच्या मनावर अद्वैतसिद्धांत अधिक परिणामकारक होऊं शकतो. तत्त्वज्ञानी विद्वत्तेला कविप्रतिभेची जोड मिळाल्यामुळें हें होऊं शकतें. शिवाय हा अद्वैतसिद्धांत स्वतंत्र रीतीनें भरपूर, निखालस, स्वतंत्र्या मनाला समाधान देईल अशा रीतीनें ज्ञानेश्वरांनीं अमृतानुभव हा वेगळा स्वतंत्र ग्रंथ लिहून प्रतिपादिलेला असल्यामुळें ज्ञानेश्वर हे अद्वैतवादी होते याविषयीं शंकेला जागाच उरत नाहीं.

वेदांत तत्त्वज्ञानांत तीन प्रकारचीं सत्यें मानण्यांत येतात. (१) पारमार्थिक सत्य–म्हणजे परमपुरुष, परमात्मा, किंवा ब्रह्म, (२) प्रातिभासिक सत्य–म्हणजे आभासरूप दिसणारी व त्या आभासाच्या निरासानंतर नष्ट होणारी सर्व सृष्टि आणि (३) व्यावहारिक सत्य– म्हणजे ज्ञाता हा स्वतः आणि तो ज्या सृष्टींत वावरतो ती सृष्टि. पैकीं पहिल्या दोन सत्यांना मान्यतेचा करमार देऊन टाकला म्हणजे आपण व्यावहारिक नावाच्या तिसऱ्या सत्याच्या क्षेत्रांत वावरण्याला मोकळे होतो. हा वावर स्वप्नातल्या वावरासारखा व्यर्थ आहे असें फुशाल म्हणावें. परंतु स्वप्नांत झाला तरी मनुष्यजीव हा मनुष्यजीवासारखाच वावरणार. मातलेल्या हत्तीला भिऊन रस्त्यावरून पळणाऱ्या एका वेदांत्याची स्पर्धी थट्टा करण्याच्या उद्देशानें, माडीवर सुरक्षित बसलेल्या चावट मनुष्यानें म्हटलें कीं, 'अहो, जग हें मिथ्या–मायामय–आहे असें तुमचा वेदांत

म्हणतो ना ? मग मायामय-मिथ्या-हत्तीला भिऊन तुम्ही पळता का ? तो तुमचें काय करणार ' ? तेव्हां त्याला त्या वेदांती पण समयसूचक बुद्धिमत मनुष्यानें ' हत्ती जसा जितका मायामय-मिथ्या-तसें तितकें माझें पलायन-पळून जाण्याकरिता धावणें-हेंहि मिथ्याच आहे ' असें जें उत्तर दिलें म्हणतात तें अगदीं समर्पक आहे सृष्टि खरी खोटी कशी का असेना, ती स्वप्नमय मानिली तरी तिच्यातील व्यवहार ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान या त्रिपुटीबधाऱ्या दृष्टीनेंच होणार. ज्ञात्यानें (पळणाऱ्या वेदात्यानें) ज्ञेयाला (हत्तीला) हत्ती असें मानलें, हा घातक प्राणी आहे असें त्याचें ज्ञान त्याला झालें, तर त्या ज्ञानापासून पळून जीव वाचविणे ही क्रिया घडणारच.

स्वप्नातील झाले तरी मनुष्यव्यवहार हे मानुष बुद्धि व मानुष भावना याच्या अनुबधाप्रमाणें व्हावयाचे हें ठरलेलेंच आहे भलते विपरीत कसे होतील ? स्वप्नात झालें तरी घातक हत्तीपासून पळून जाणें हेंच स्वसरक्षण साधन होईल, त्याची सोंड कवटाळणें हें होणार नाहीं. स्वप्नात झालें तरी कार्य कारणभाव नाहींसा होणार नाहीं किंवा विपरीतहि होणार नाहीं एकनाथी भारुडातील विपरीत घटना हे केवळ विरोधाभासाचे अलकार असेच मानावे लागतात. पण त्यात सागितल्याप्रमाणें स्वप्नाच्या व्यवहारातहि ' आधीं शिखर मग पाया ' असा इमारत बाधण्याचा क्रम शक्य ठरणार नाहीं दुतोंडी हरणी आधीं सहसा असणारच नाहीं, व असलीच तर ती ' मुखाबीण पाणी पिणार ' नाहीं. ' आधळ्यानें पाहिलें, बहिऱ्यानें ऐकलें, लगड्यानें पाठलाग केला रे ' असें होणार नाहीं. जो अद्वैतसिद्धात मान्य करणारा तोच व्यावहारिक सत्य ठरणाऱ्या सृष्टींत वावरणारा अर्थात् तो सिद्धात खरा तर हें वावरणेंहि खरेंच. तो सिद्धात मात्र सत्य आणि हें वावरणें मात्र खोटें असं ठरणार नाहीं. अधिराजाला करभार देऊन टाकून आपल्या उपराज्यात हवा तसा स्वतत्र कारभार करण्याचा अधिकार माडलिक राजा मिळवितो, त्याप्रमाणें अतिम स्वरूपीं अद्वैत हें सत्य आहे असें एकदा मान्य करून टाकलें म्हणजे अति माऱ्या अलीकडच्या क्षेत्रात तितक्याच सत्यतेच्या विश्वासानें मनुष्याला वावर ण्याचा हक्क मिळतो. गणितामध्यें कसात कांहीं रकमा घातलेल्या असून त्या कसाबाहेर, पण आतील सर्व रकमाना गुणणारा, असा एखादा आकडा किंवा अक्षर ठेवलेलें आहे असें उदाहरण येतेंच या उदाहरणातहि आधीं कसातील रकमाचा व्यवहार (असतील त्या निरनिराळ्या सबधाच्या परश्रुतीनें) पूर्ण

करून निष्कर्ष काढला जातो, आणि मगच त्याला कंसाबाहेरील आंकड्यानें काय गुणावयाचें असेल तें गुणिलें जातें. त्याप्रमाणें व्यावहारिक सत्य हें कंसांतर्गत आहे व अद्वैत–अभेद हें पारमार्थिक सत्य त्या कंसाबाहेर काढलेलें आहे अशी कल्पना करितां येते. म्हणून असेंच म्हणावें लागतें कीं, या कंसातील व्यवहाराचा विरोध करितांना पदोपदीं कंसाबाहेरच्या रकमेची लुडबुड चालू देऊं नये. हें असें स्पष्ट सांगण्याचें कारण हेंच कीं अद्वैतसिद्धांत व मायावाद हे पदोपदीं व्यवहारांत घोटाळल्यासारखे करितात, म्हणूनच सगुणपूजा, भक्ति, कर्मयोग इत्यादि साधनांवर द्वैतदर्शकत्वाचा आरोप घेऊन तीं अस्थानीं, अकारण, असिद्ध असें ठरविण्याचा प्रयत्न कोठें कोठें दृष्टीस पडतो. पण प्रातिभासिक सत्यांतून पारमार्थिक सत्यांत प्रवेश करण्याला व्यावहारिक सत्य हा राजमार्ग आहे. म्हणून हा प्रवास या राजमार्गावरूनच करावा लागतो.

उघड उघड द्वैतवादी तत्त्वज्ञान स्वीकारणाराला ही भानगड कांहींच उरत नाहीं. त्याला ज्ञानोत्तर भक्ति, ज्ञानोत्तर कर्म, हीं तर शास्त्रशुद्ध ठरतातच, पण ज्ञानाचीहि अनिर्वाह्यता त्याला जाचीत नाहीं. इकडे अद्वैतसिद्धांतप्रस्थापनेच्या भरांत सर्व सृष्टि ही मायामय–मिथ्या–ठरविणारे आचार्य 'सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वं। सामुद्रोहि तरंगः क्वचन समुद्रो न तारंगः' असें म्हणून, अद्वैत शाकोटीला लपवून, तिकडे द्वैतभावना स्वीकारून इश्वराचा धावा कां करितात ? तात्पर्य, अद्वैत ही उपपत्ति असली तरी द्वैत हा अनुभव आहे. सर्वात्मता ही उपपत्ति असली तरी भक्ति व योग हीं कर्मे म्हणजे अनुभवच आहे. म्हणूनच आचार्यांप्रमाणें ज्ञानेश्वरहि अद्वैत मानणारे असले तरी भक्ति करणारे होते. ज्ञानोत्तर कर्मयोगच असा आग्रह धरणाऱ्या प्रमाणें, ज्ञानोत्तर भक्तिच असा आग्रह धरणारे, किंवा ज्ञानाशिवायहि भक्ति असा सुलभ मार्ग स्वीकारणारे ते द्वैतवादी नव्हते. म्हणून त्यांना ज्ञानीभक्त असें म्हणतां येतें. त्यांना ज्ञान अवश्य वाटत होतें. पण ज्ञान व भक्ति यांच्यांत त्यांना विरोध वाटत नव्हता.

> विपायें अहंभाव यथाचा जाईल। मी तोंचि हा जरी होईल
> तरी मग काय कीजेल। एकलेया ( चहुस्यां–श्रुति )
> दिठीची पाहतां निविजे। कां तोंड भरोनि बोलिजे
> नातरी दाटूनि खेंव दीजे। ऐसें कवण आहे

आपुलिया मना चखी । असमाई गोठी जीवि
ते कवणेसी चावळावी । जरी ऐक्य जाहालें

प्रकृति व पुरुष हीं नावें उच्चारिलीं म्हणजे सहजच पतिपत्नीच्या जोडप्याची आठवण होते. पण या जोडप्याचा परस्पर संबंध जगाव्यतिरिक्त, व्यवहार-विपरीत, असा आहे,हें सहसा लक्षात येत नाहीं. आणि तें लक्षात आल्या-शिवाय या अपूर्व जोडप्याचें रहस्य लक्षात येणार नाहीं. या विपरीत, लोक-विलक्षण पतिपत्नीसंबंधाचे प्रकार हे होत—(१) एकाच बापाच्या पोटीं जन्मलेल्या बंधुभगिनींचें लग्न होत नाहीं. पण एकाच परमपुरुषापासून जन्म-लेल्या या प्रकृति (स्त्री) पुरुषाचें लग्न (!) जणु काय झालें आहे. (२) लौकिकात पति सर्व उद्योगधंदा करितो व कुटुंबभरणाचें साधन मिळवितो, आणि स्त्री ही त्यावर जगते, पण या अलौकिक कुटुंबातली स्त्री मिळविते व पुरुष हा बसून खातो. (३) लौकिकातील पतिपत्नी यांची संगति जागेपणीं असते. पण या अलौकिक कुटुंबातील स्त्री ही आपला पति जागा असेपर्यंत त्याजकडे फिरकत नाहीं . पण तो निजल्यावर त्याच्याजवळ निजते. (४) लौकिक स्त्री पतिसंभोगानें गर्भिणी होते, परतु ही अलौकिक पत्नी नवरा जागा असला म्हणजे दूर झोप घेते, आणि तो निजला म्हणजे त्याच्या शेजारीं येऊन निजते, आणि त्या निद्रित पतीच्या केवळ सान्निध्यानें गर्भ धारण करिते—

तरी माझी हे गृहिणी । अनादि तरुणी । अनिर्वाच्य गुणी । अविद्या हे ॥
इये नाहीं हेंचि रूप । ठाणें हें अति उमप । हे निद्रिता समीप । चेता दुरी ॥
पै माझेनिचि आंगें । पहुडल्या हे जागे । आणि सत्ता समोगें । गुर्विणी होय.

'देवोदेवी' हा शब्द ज्ञानेश्वरांनीं व्यवहारार्थींहि लाविला आहे—'माझी मूर्ती निफजवी । ते घराचे कोणीं वैसवी । आपण देवोदेवी याने जाय' (ज्ञ १३ ८१५)
येथें देवोदेवी म्हणजे प्राकृत स्थानिक देवदेवता.

'म्हणवुनि अभेदी भेदु देखती । यया अनाम्या नावें ठेविती । देवीदेवो म्हणती अचर्चाते' (४.६९)

पुरुष–प्रकृति यांना पुरुष–स्त्री, पतिपत्नी, करून त्यांचा वस्तुत अभेद पण आभासिक भेद यांचें विशेष वर्णन ज्ञानेश्वरांनीं अनुभवामृतात प्रथमच केलें आहे तें असें—

ऐसीं हीं निरुपाधिकें । जगाचीं जियें जनकें
तियें वदिलीं मिया मूळिकें । देवोदेवी

जो प्रियुचि प्राणेश्वरी । उलथे आवडीचिये सरोभरी
चारु स्थळीं एका हारीं । एकागाचि
आवडिचेनि वेगें । एक एकाते गिळिती अगें
कीं द्वैताचे नि मार्गे । उगळिते आहाती
जे एकनि नव्हे एक सरे । दोघा दोनपण नाहीं पुरें
काई नेणे साकारें । स्वरूपें जिये
कैसी स्वसुखाची अळुकी । जे दोनीपण मिळोनि एकीं
नेदितीच कवतिकीं । एकपण फुटों
हा ठावोपरि वियोगभेडे । जें बाळ जगाएवढे
वियाली परि न मोडे । दोघुलेंपण
जया एक सत्तेचें बैसणें । दोघीं एका प्रकाशाचें लेणें
जे अनादि एकपणें । नांदती दोघे
भेदु लाजोनि आवडी । एक रसीं देत बुडी
तो भोगणें यायाव काढी । द्वैताचा जेय
देवें सपूर्ण देवी । जियेवीण काहीं ना तो गोसावी
किंबहुना एकोपजीवीं । एक एकाची
जिहीं एक एकावीण । न कीजे तृणाचेंहि निर्माण
जिये दोघे जीवप्राण । जिया दोघा
घरवातें मोटकी दोघें । जैं गोसावी देजे रिघे
तें दपत्यपणें जागे । स्वामिणी जे
जया दोघामाजीं एखादे । विपायें उमगलें होय निदे
तें घरवात गिळूनि नुसधे । काही ना करी
दोहा अंगाची आटणी । गिवसीत आहाती एकपणी
जाली भेदाचिया पाइणी

ज्ञानेश्वरींतहि हें पतिपत्नीचेंच रूपक स्वीकारलें आहे. या रूपकाला गीतेपेक्षा सांख्यशास्त्रच अधिक आधारभूत आहे.

खरा भक्त असें म्हणतो कीं, "द्वैत खरें कीं अद्वैत खरें, अथवा अद्वैता अद्वैतांतहि भेद व प्रकार आहेत ते काय व कसे, असल्या मानगडींत मी पडत नाहीं. ईश्वर हा सेव्य व मी सेवक ही द्वैतभावनाच मला आवडते व पटते. ती स्वीकारल्यामुळें, तुमचा मुळांत निर्गुण का असेना पण मला ईश्वर

हा सगुण असा असावा लागतो, व मी त्याला तसा करून घेऊनच आपलें काम भागवितों. किंबहुना त्याला सगुण केल्यावर त्याच्याशीं मीं कसें वागावें हें माझ्या स्वभावाप्रमाणें किंवा प्रासंगिक भावनेच्या उद्रेकाप्रमाणें मी ठरवीन. मी त्याला भिऊन दुरून आदरानें अडखळत बोलेन, किंवा त्याला आईबाप मानून, प्रेमानें लडिवाळपणानें बोलेन, किंवा खेळगडी समजून त्याशीं बरोबरीच्या नात्यानें बोलेन, किंवा रागानें अधिक्षेप केल्यासारखें बोलेन, किंवा त्याच्याशीं विनोदहि करीन. तात्पर्य, हें असें करू नये म्हणणारे तुम्ही कोण? आणि असें केल्यानें परमेश्वर–परमात्मा–याला गौणपणा आम्ही भक्त आणतों असें तुम्हीं का म्हणावें? ज्ञानाचा जसा आनंद असतो तसाच भक्तीचाहि असतो मग ज्याला ज्या मार्गानें मिळेल त्या मार्गानें त्यानें तो घ्यावा."

तुकारामासारखे भक्त प्रामाणिक द्वैती खरे त्यांनीं आपल्या भक्तीच्या उद्रेका मध्यें द्वैत–अद्वैत असले वावदुकी वाद बुडवून टाकून 'रोकड्या आत्मानंदाला हात घातलेला असतो तथापि केव्हा अद्वैत हा शब्द तोंडून निघाल्यानें आपली द्वैतभावना विटाळली असें ते मानीत नाहात कारण अंतिम स्वरूपीं अद्वैत असल्यानें त्याचें काहीं बिघडत नाहीं, म्हणजे त्याच्या प्रत्यक्ष आत्मा नंदात कमीपणा येत नाहीं, आणि मोक्ष म्हणून जर काहीं किंवा जो काहीं असेल तो द्वैतभावनेमुळें आपणास मिळणार नाहा अशी भीति त्याना वाटत नाहीं

जीव हा एक निदान 'व्यावहारिक' सत्यसृष्टींतला पदार्थ आहे असें मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं कारण जीवच नाहीं तर मग मुक्ति–मोक्ष कुणाकरिता सांगितले? ज्ञान–कर्मयोग हे कुणाकरिता सांगितले? ज्ञानेश्वर हेंच मानतात कीं जीव 'कर्ताभोक्ता' आहे

> जो जीऊ कर्ता भोक्ता । तो गुणा तव स्वभावता
> पावोनिया त्रिविधता । चेष्टे निधा
> एक कर्ता एणें नामें । बोलिजे जीऊ

जीव हा एक ब्रह्माचा कण आहे, संसारबंधानें बांधलेला पण मोक्षाला पात्र होणारा–परमात्मकृपेला पात्र होणारा आहे, म्हणून सर्व ज्ञानेश्वरीभर ब्रह्माशीं ऐक्य पावण्यास समर्थ होऊं शकणाऱ्या जीवाचें चरित्रवर्णन केलें आहे.

भक्तानें आपली पायरी सभाळून वागलें पाहिजे याविषयीं तुकाराम म्हणतो–

> एक म्हणती आम्ही देवचि पै झालों

ऐसे नका बोलू, पडाल पतनीं
एक म्हणती आम्ही देवाचीं पैं रूपें
तरी तुमचिया बापें न चुके जन्म
देवें उचलिली स्वकरें मेदिनी
तुमचेनि गोणी नुचलवे
देवें मारियेले दैत्य दानव मोठे
तुमचेनि न तुटे तृणमात्र
राया विठोबाचें पद जो अभिलाषी
पातकाची राशी तुका म्हणे

तथापि खोटीं दैवतें व खरा देव यामधला भेद तुकाराम विसरला नाहीं—

क्षुद्रें हीं देवी दैवतें । कोण तीं पूजीं भुतें खेतें
आपुल्या पोटा जीं रडतें । मागती शितें अवदानें
आपुल्या इच्छे आणीका पीडी । काय तें देईल बापुडी
कळों ही आली तयाची जोडी । अल्प रोकडी बुद्धि न धरा
तैसा नव्हे नारायण । जगव्यापक जनार्दन
तुका म्हणे त्याचें करा चिंतन । वंदु चरण येती सकळें
नव्हे जाखाई जोखाई । मायराणी मेसाबाई
बळिया माझा पंढरिराव । जो या देवांचा हि देव
रंडी चंडी शक्ति । मद्यमांसातें भक्षिती
बहिरव खंडेराव । रोटी सुटीं साठीं देव
गणोबा विक्राळ । लाडू मोदकाचा काळ
मुंजा म्हैसा सुरें । हें तो कोण लेखा पोरें
वेताळें फेताळें । जळो त्याचें तोंड काळें
तुका म्हणे चित्तीं । धरा रखुमाईचा पती

स्वतःला देव म्हणविणें वाईट व खोट्या भुसकट देवतांची पूजा वाईट, हा विवेक तुकारामाला माहीत होता. तसेंच खरा देव जो परमात्मा त्याचें व जीवाचें ऐक्य असू शकतें हें तत्त्व (बहुतांशीं अद्वैती) तुकारामाला माहीत होतें.

भक्ति म्हणजे काय जनीं जनार्दन
अलंकार सोनें भिन्न नसे
सर्वांभूतीं देव आपणासकट

जाणोनी निकट मजा येणे
ज्ञान म्हणजे काय आपणा जाणणें
जाणूनी नेणणें विज्ञान तें
पूर्ण आत्मज्ञान अनुभव खूण
जेणें त्रिभुवन व्यापियेलें
अणुरेणु पाती ब्रह्मांडाच्या कोटी
ज्ञानाचिये पोटीं दिसे जया
ऐसी पवित्रता बोलतसे गीता
ज्ञाना त्या अनंता भेद नाहीं
तुका म्हणे ज्ञान तोचि नारायण
जाणती सज्ञान गुरुपुत्र
प्रत्यक्ष हें ज्ञान उघडेच आहे
देव ज्ञाता नाहे अनुभव
*तुका म्हणे ज्ञान विठलची पूर्ण*
सर्व अणुरेणु वागवीत

भक्त हा भक्ति करो, पण परिणामीं दोन्ही एकच म्हणजे अद्वैत हेंच खरें असें तुकारामासारखे वारकरी मतहि मानतात.

तरुवर बीजापोटीं । बीज तरुवर शेवटीं
तैसें तुम्हा आम्हा झालें । एकीं एक सामावलें
उदकावरील तरंग । तरंग उदकाचें अंग
तुका म्हणे बिंब छाया । ठायीं पावल्या विलया
तुज मज ऐसी परी । जैसे तरंग सागरीं
दोहींमाजी एक जाणा । विठ्ठल पंढरीचा राणा
देव भक्त ऐसी बोली । जव भ्रांती नाहीं गेली
तंतुपट जेवि एक । तुका विश्वेसी व्यापक

वरील दृष्टांत व ज्ञानेश्वराचे दृष्टांत एकच आहेत

खडा खाळा साखर । झाला नामाचाचि फेर
तुम्ही आम्ही पांडुरंगा । भिन्न ऐसें काय सांगा
पायीं हातां नाकीं शिरीं । हेम राहे अलंकारीं
मुसे आल्यावरी । काय निवडे वेगळें

गोडपणें जैसा गूळ । तैसा देव झाला सकळ
आता भजों कवणेंपरी । देव सबाह्य अतरीं

किंवा

निरजनीं आम्हीं बाधियेलें घर
निराकारी निरतर राहिलों आम्ही
निराभासीं पूर्ण झालों समरस
अखड ऐक्यास । पावलों आम्ही
तुका म्हणे आता नाहीं अहकार
झालों तदाकार । नित्य शुद्ध
प्रवृत्ती निवृत्तीचे आटूनिया भाग
उतरिलें चाग । रसायन
ब्रह्मीं ब्रह्मरस सीघ्र झाला पाक
घेतला रुचीक । प्रतीती मुखें
स्वानुभवें अगीं झाला समरस
साधना निजध्यास । श्वासोश्वासा
रक्त श्वेत कृष्ण पीत प्रभा भिन्न
चिन्मय अजन । सुदलें डोळा
तेणें अजनगुणें । दिव्य दृष्टी झाली
कल्पना निवाली । द्वैताद्वैत
देश कालवस्तु भेद मावळला
आत्मा निर्वाळला । विश्वाकार
न झाला प्रपच आहे परब्रह्म
अहं सोहं ब्रह्म आकळलें
तत्त्वमसि विद्या ब्रह्मानंद साग
तेंचि झाला अगें । तुका म्हणे
अद्वयचि द्वैत झालेंचिकारणें । धरिलें नारायणें भक्तिसुख

पण तुकारामासारख्याना केव्हा अद्वैतभक्तीची लहर येते तर केव्हा द्वैभक्तीची लहर येते. कसें तें पाहा—

आत्मस्थिति नको मज हा विचार
देई निरतर चरणसेवा

जन्मोजन्मीं तुझा दास पुरुषोत्तमा
हेचि गोडी माझ्या देई जीवा
काय सायुज्यता मुक्ति हेचि गोड ?
देव भक्त कोड तेथें नाहीं
काय त निर्गुण पाहों कैशापरी
वर्णु तुझी हरी कीर्ती कैसी
गोड चरणसेवा देवभक्तपणें
मज झणें देवा दुरावसी
जाणीवेपासूनि सोडी माझ्या जीवा
देई चरणसेवा निरंतर
तुका म्हणे गोडा गोड नलगे प्रीति
सेवेवीण चित्तीं सार नाहीं

किंवा

नको ब्रह्मज्ञान आत्मस्थिति भाव
मी भक्त तू देव ऐसें करी
अद्वैतीं तें माझें नाहीं समाधान
गोड हे चरणसेवा तुझी
करूनी उचित हेंचि देई दान
आवडे कीर्तन नाम तुझें
देवभक्तपण सुखाचा सोहळा
ठेवूनी निराळा दावी मज
काय ब्रह्मज्ञान करू कोरडें । रितें भावेचे मापाड
भेटीवीण कुडे । तुशिये भेटीवीण मज वाटे
तुजवीण काहीं व्हावें । ऐसें नको माझिया जीव
तुका म्हणे द्यावे । दर्शन पायाचे

येवढेंच नव्हे तर एका जन्मात केलेली भक्ति पुरी न वाटल्यामुळ पुनर्जन्म लाभावे आणि प्रतिजन्मीं भक्तिच हातून घडावी अशीहि इच्छा तुकारामानें व्यक्त केली आहे—

मोक्षपदें तुच्छ केली या कारणें
आम्हा जन्म घेणें युगायुगा

मक्तिप्रेमावीण ज्ञान नको देवा
अभिमान नित्य नवा तया माजी
कासयासी व्हावें जितांचि मुक्त
राहिनिया थीत प्रेमसुख
देवाहातीं रूप धरूं आकार
नेदूं निराकार होऊं त्यासी

केवढा हा आत्मविश्वास! पुनर्जन्म घेऊंच, पण ईश्वराच्या मनांत नसलें तरी त्यालाहि आपणाबरोबर सगुण-साकार व्हावयाला लावूं. मोक्ष काय हातची गोष्ट. तो मुठींत असल्यासारखा आहे, पण त्यानें समाधान नाहीं.

मोक्षाचें आम्हांसी नाहीं अवघड
तो असे उघड गाठोळीत
भक्तीचे सोहळे होतील जीवासी
नवल तेविशीं पुरवीतां
ब्रह्मज्ञान येतें दारीं काकुळती
अन्हेरिले संतीं विष्णुदासी
मोक्ष तुमचा देवा। तुम्हीं दुर्लभ तो ठेवा
मज भक्तीची आवडी। नाहीं अंतरी ते गोडी

भक्तिमार्ग हा इतर मार्गांहून चांगला अशी तुलनाहि तुकारामांनीं केली आहे—

घोटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं
मुक्तां आत्मस्थिति सांडवीन
ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनीं (भक्ताची)
भाग्य तरी ऋणी देवा ऐसा
तीर्थभ्रामकासी आणीन आळस
कडू स्वर्गवास करीन भोग
सांडवीन तपोनिधा अभिमान
यज्ञ आणि दान लाजवीन
भक्तिभाग्य प्रेमा साधीन पुरुषार्थ
ब्रह्मीचा जो अर्थ निज ठेवा

# गद्यसारांशाची पुरवणी

या पुस्तकात ज्ञानेश्वरीचा गद्यरूप सारांश आम्हीं केवळ संक्षेपानें दिला आहे. तथापि, आमचे एक सात्त्विक विद्वान् मित्र रा. ज्ञानेश्वर उद्धव माढरे याना ग्रथाचीं मुद्रितें वाचण्यास दिलीं असता त्याना असें वाटलें कीं, या संक्षिप्त सारांशात थोडी अधिक भर घातली असता बरें होईल, म्हणजे सारांशाला पूर्णता येईल. या गोष्टीला मी संमति दिल्यावरून रा माढरे यानीं शब्दशः शेंकडों तास खर्चून, सर्व ज्ञानेश्वरी पुन्हा मुद्दाम वाचून, गद्यसारांशात कोठें भर घालता येईल याचा काळजीपूर्वक विचार करून ती भर स्वत लिहून काढली. तीच पुरवणी म्हणून यापुढें दिली आहे भर नक्की कोठें घातली हें दर्शविण्या करिता आमच्या छापील ग्रथाचें पृष्ठ, ओळ व नवीन मजकुराचा प्रारभ ज्या शब्दापुढें होतो तो शब्द, इतक्या साक्षेपानें तो मजकूर लिहून दिला, यामुळें वाचकाची मोठी सोय झाली आहे. रा. माढरे हे सरकारी मिलिटरी अकौंट्स खात्यात थोर हुद्याच्या एका जागेवर आहेत. ते संतभक्त, संत वाङ्मयाचे भोक्ते, माविक वारकरी, निष्ठावंत सांप्रदायिक, व विशेषतः सद्गुरु गुलाबरावमहाराज यांचे शिष्यवर्गापैकीं एक आहेत नामदेव समाजात तसेंच भागवत संप्रदायात ते एक लोकप्रिय वजनदार पुढारी आहेत. श्रीसद्गुरु गुलाबरावमहाराजाच्या ग्रथाच्या अठरा भागाची द्वितीय आवृत्ति काढून तृतीय आवृत्तीचें काम यानीं व महाराजाच्या प्रमुख भक्तमडळीनें आरंभून स्वत वरचें ऋण फेडलेंच, पण अशा अमूल्य ग्रथप्रकाशनद्वारा त्यानीं एकदर महाराष्ट्रातील वाचकवर्गाला निरतर उपकृत करून ठेवलें आहे. नामदार दादासाहेब खापर्डे, लो. ना. अणे, पंडित मदनमोहन मालवीय इत्यादि राष्ट्रातील अनेक थोरमोठ्या पुढाऱ्याशीं त्या ग्रथप्रकाशनद्वारें याचा निकट परिचय झालेला आहे. अशा गृहस्थानीं इतके श्रम घेऊन सहाय्य केलें याकरिता त्याचे आभार मानावे तेवढ थोडेच होतील.

न. चि केळकर

॥ श्रीकृष्णाय नमः ॥

# ज्ञानेश्वरीसर्वस्व–पुरवणी

( लेखक—ज्ञानेश्वर उद्धव मांढरे, पुणें )

## अध्याय पहिला

पृ. २, ओळ ४, परिच्छेदाच्या सुरवातीसः—

अर्जुनाच्या विनंतीवरून श्रीकृष्णानें दोन्ही सैन्यांमध्यें रथ उभा करतांच तेथें पितामह भीष्माचार्यांसारखे महात्मे, द्रोणाचार्यांसारखे श्रीगुरु, तसेंच गोत्रज, इष्ट, मित्र, सुहृत्, बंधु, पुत्र, पौत्र, लहान मोठे सर्व स्वजन युद्धाकरितां हातावर शिर घेऊन उभे राहिलेले स्वतः डोळ्यानें पाहतांच अर्जुन स्वजनांच्या आसक्तीमुळें मोहग्रस्त झाला. त्याची कर्तव्यनिष्ठा–क्षात्रवृत्ति–डळमळली. ह्यापूर्वी किती तरी शत्रु मारले, परंतु ह्या युद्धांत स्वजन पाहतांच स्वजनासक्ती व मोह आडवा आला. संसारमोहनिरास व ईश्वरशरणता ही गीतेची मुख्य शिकवण होय.

पृ. २, ओळ ९, शब्द ६ " घडलें खरें " ह्यापुढील मजकूरः—

ईश्वरी माया संसारी जीवास अभेद्य व भुरळ पाडणारी आहे. मायेनें जीव दिल पडतो व त्यामुळें विकारांचें प्राबल्य वाढून ते सद्विचारावर कुरघोडी करतात. अर्जुन म्हणजे मऊ स्वभावाचा, शुद्ध–निर्मळ–अंतःकरणाचा, आंत व बाहेर एकच म्हणून त्याच्या मनांत जे विकार व विचार आले ते त्यानें जशाच्या तसेच खुल्या मनानें श्रीकृष्णास सांगितले,

पृ. २, ओळ २१, शब्द ७ " कुलक्षय होईल " ह्याच्या पुढील मजकूरः—

कुलक्षयानें केवळ धर्मांचा तसाच सनातन धर्मांचा उच्छेद होतो. इंद्रियनिग्रह व मनोनिग्रह बंद पडून स्वैराचाराची प्रवृत्ति वाढतांच अधःपाताची सुरवात झालीच म्हणून समजावें. स्वैराचारानें कुलीन स्त्रिया भ्रष्ट होऊन वर्णसंकरानें

जातिधर्म समूळ नष्ट होतो मग त्या सर्व कुळाला व त्या कुळघातकाला नरकात जावें लागतें खरें! ज्या देहाकरिता व तत्संबधीं आतननाकरिता राज्यसुखाची अपेक्षा करावी ते तर सर्व मुळात नश्वर व क्षणभंगुर आहेत मदांध होऊन पापाचरणानें राज्य करण्यापेक्षा इहलोक सोडून जाणें अधिक श्रेयस्कर वाटतें

---

## अध्याय दुसरा

पृ ८, ओळ ४, शब्द ८ "आहेस" ह्याच्या पुढील मजकूर —

भगवान् श्रीकृष्णा! तू माझें सर्वस्व–मोक्षदाता श्रीगुरु–असल्यामुळे मी तुला शिष्यभावानें अनन्यशरण आहें (ज्यायोगे इहपरलोकीं आत्यंतिक निश्चित कल्याण होईल असें स्पष्ट मार्गदर्शन कर. मला तर काहींच आता सुचत नाहीं मी अगदीं मोहग्रस्त झालों आहे

पृ ८, ओळ १७, शब्द २ "भगुरच" ह्यापुढील मजकूर —

अज्ञानादि मोह उत्पन्न होण्यास मुख्य कारण इंद्रियाधीनता किंवा पराधीनता होय आपल्या सदसद्विवेकबुद्धीस झुगारून, पराधीन बनून, इंद्रियांच्या लहरीप्रमाणें वागणें म्हणजे व्यक्तिमत्त्व व व्यक्तिस्वातंत्र्य गमविणें होय ज्यावर हे विषयविकार पगडा करू शकत नाहींत, तो मुमुक्षु त्याच्या पलीकडे जातो व मोक्षाचा अधिकारी होतो.

पृ ९, ओळ ५, शब्द ९ "प्राप्त झालें आहे" ह्यापुढील मजकूर —

अर्जुना! हें आताचें महायुद्ध म्हणजे तुमच्या भाग्योदयाचं सुचिह्नच होय हे महायुद्ध म्हणजे रणशूर क्षत्रियांना स्वर्गसुखाचें मुक्तद्वार खुलें करणें होय. क्षत्रियांनीं बहुत पुण्य करावें तेव्हाच अशी महायुद्धाची पर्वणी लाभते

पृ ९, ओळ ८, शब्द ८ "नाश पावेल" ह्यापुढ —

सभाविताला अपकीर्तिपेक्षा मरणें बरें वाटतें अपकीर्तीचा डाग जोंपर्यंत अंगास लागला नाहीं तोंपर्यंतच शहाण्यानें जगण्यात मजा आहे

पृ ९, ओळ २१, शब्द ७ ('हीच गत होय') ह्यापुढील मजकूर —

निष्कामकर्मयोग हा निष्कंटक राजमार्ग आहे ह्यानें ऐहिक सुखभोग मिळून शेवटीं पर्यायानं मोक्षाचाही लाभ होतो निष्कामकर्मयोगाचें निरहंकार, निर्म

मत्वबुद्धीनें सत्त जरी आचरण केलें तरी तें दुःखपरंपरेपासून मुक्त करून सुख-परिणामी व हितपरिणामी होतें.

पृ. १०, ओळ ५, शब्द २ "असाचा खरा" ह्यापुढील मजकूरः—

सत् व असत् कर्माचे ठिकाणीं ही जी मनांतील समतोलवृत्ति तीच योग-स्थिति म्हणून उत्तम लोकांनीं प्रशंसिली आहे. अर्जुना! चित्ताचें समत्व हेंच योगाचें सार होय. येथें मन व बुद्धि ह्यांचें ऐक्य असतें. निष्कामबुद्धि व निर-हंकारवृत्ति ह्यात कर्मयोगाचें कौशल्यरहस्य आहे.

पृ. १०, ओळ ११, शब्द १० "लागत नाहीं" ह्यापुढेः—

विषयवासना कामक्रोधादि विकार, जगाचा मोह इत्यादि सुटून जेव्हां विवेकयुक्त वैराग्य अंगीं बाणेल, इंद्रियसंगतीनें मनीला फाटे फुटतात ती मति आत्मस्वरूपीं जेव्हा स्थिर होईल तेव्हाच तुला सर्व योगस्थिति प्राप्त होऊन समाधिसुखाचा अखंड परमानंद भोगावयास मिळेल.

पृ. १०, ओळ २८, शब्द २, "बाधत नाहीं" ह्यापुढेः—

जेथें चित्ताला अखंड प्रसन्नता असते तेथें कोणतेंहि संसारदुःख प्रवेश करू शकत नाहीं. त्याची बुद्धि अनायासें भगवच्चरणीं लीन होते. विषयभोग-विलासामुळें ज्याचीं इंद्रियें व मन ताब्यात नाहीं त्याची बुद्धि कधींच स्थिर राहत नाहीं. जेथें बुद्धीची स्थिरता नाहीं तेथें चित्तास शांति नाहीं व जेथें शांति नाहीं तेथें खऱ्या सुखाचा लवलेशहि मिळणार नाहीं. म्हणून आपलीं इंद्रियें जर आपण होऊन आपल्या स्वाधीन झालीं तर ह्यापेक्षा अधिक काय सार्थक आहे! ज्यास निर्विषय परमानंदाची प्राप्ति झाली तोच एक स्थितप्रज्ञ ओळखावा. स्थितप्रज्ञ साक्षात् संयममूर्तिच असतो. सर्वेंद्रियांना नियमाचें बंधन घातल्यानें ती सतत परोपकारादि सत्कर्मांत व ईश्वरचिंतनात अहोरात्र मग्न असतात. ह्या अध्यायात शेवटच्या १८ श्लोकात गीतेच्या १८ अध्यायांचें सार साठविलें आहे.

---

## अध्याय तिसरा

पृ. ..., ओळ १८, शब्द ९ "लागते ना" ह्यापुढेः—

निर्वाणस्थिति जोंपर्यंत अंगीं मुरली नाहीं तोंपर्यंत विहित कर्माचरण केलेंच पाहिजे. ... मन यावर ताबा गाजवून जो सुखदुःखातीत झाला व

ज्ञानोत्तर भक्तींत तल्लीन झाला तोच एक संसारात जीवन्मुक्त समजावा. कमळरनाप्रमाण तो संसारात राहूनहि अगदीं निर्लेप राहतो

पृ. १८, ओळ २०, शब्द २ "असाच करावा" ह्यापुढ —

सांपत्तिक परिस्थिति अनुकूल असता मदांध होऊन विहित स्वधर्माचरण करणार नाहीं–म्हणजे नित्यनियमानें संध्यावंदन, गायत्रीजप किंवा नाममंत्र जप, इष्ट देवतापूजन, अनाथ व अतिथिसत्कार, प्रसंगविशेषीं ब्राह्मणभोजन, स्वज्ञातीस संतोष, परोपकार, श्राद्धादि, दानधर्म करणार नाहीं—त्याच्या निवास पुढें मोठा घात आहे असें समजावें. आचारभ्रष्ट नेहमीं कष्टातच मरावयाचा देवधर्म सुटला कीं सुखादि भोग आटलेच हें लक्षात ठेवावें. प्रामाणिकपणानें, निढळाच्या घामानें, शुद्ध सत्कर्मानें द्रव्यादि संपत्ति विपुल मिळवून, तिचा विनियोग प्रथम देवधर्मांत, सत्कर्मात सढळ हातानें करून खर्च करणारा धन्य होय. असें न करणाऱ्यास इहलोकीं नानाविध आपत्ति, दुःखपरंपरा भोगून मरणोत्तर असह्य यमयातना भोगाव्या लागतात. मद्यपान, मांसाहार, वाटेल त्याच्या हातचें खाणें, पिणें, परस्त्रीगमनादि दुराचार करून जो इंद्रियाचें व मनाचें कोडकौतुक पुरवितो तो समस्त पातकाची खाणी असून भूमातेला केवळ भारभूत आहे. त्याचें जगणें मरणापेक्षा वाईट आहे पूर्वपुण्याईनें मानवजन्म प्राप्त झाला असता जो स्वधर्माचरणाचा, सत्कर्माचा, ईश्वर भजनाचा कंटाळा किंवा आळस करील तो शुद्ध आत्मघातकी होय.

## अध्याय चवथा

पृ. २५, ओळ ६, शब्द ५ "विसर पडला". त्यापुढें:—

हा अविनाशी निष्काम कर्मयोग मीं प्रथम सूर्याला सांगितला. सूर्य सर्व-साक्षित्वानें राहून विश्वाचे सर्व व्यवहार करतो व इतकें सर्व करनहि तो पूर्ण अलिप्त आहे. तो २४ तास अविश्रांत कर्म करीत राहून, सर्व विश्वाला प्रकाश देऊन कर्म करावयास लावतो. कर्मयोग व संन्यास याचा पूर्ण समन्वय सूर्यात दिसून येतो. अलीकडे देहाच्या ठिकाणीं विशेष ममत्व व त्यामुळें देहादिकाचे भोगविलास व स्वार्थबुद्धि जसजशी वाढत चालली तसतसा हा निष्काम कर्मयोगाचा लोप होत आहे. आस्था व बुद्धि विपरीत झाली. विवेक, वैराग्य राहिलें नाहीं. मोह व दंभाचार अधिक वाढल्यामुळे आजची ही विपन्नावस्था अनुभवास येऊं लागली.

पृ. २६, ओळ ११, शब्द ६ "प्राप्ति करून देतोच" त्यापुढें:—

या मनुष्यलोकात कर्माप्रमाणें सुखदु:खादि भोग प्राप्त होतात. कर्मावाचून दुसरें कोणीहि आपणास कांहीं देऊं घेऊं शकत नाहीं. सर्व धर्मकर्मांत मी साक्षीभूत असून आपलीच भावना आपल्याला फळ देते. माझ्यामुळेंच हें झालें, पण मीं केलें नाहीं हें ज्यानें ओळखलें तो कर्मबंधापासून सुटला.

पृ. २७, ओळ २१, शब्द ५ "संताना शरण जावें" त्यापुढें:—

अर्जुना ! हजारों ग्रंथ वाचून ऐकून घोटाळ्यात पडलेली बुद्धि स्थिर झाल्याशिवाय खरें आत्मज्ञान हातास लागणार नाहीं. म्हणून बुद्धिवादानें स्वत:च्या बुद्धीनं वाचणें–ऐकणें आता पुरें करून आत्मकल्याणार्थ संताचा आश्रय करावा. तेथें विश्वाच्या ज्ञानकोशाचा अभ्यास होईल.

संत हे आनंदाचे सागर, सुखाचे अंकुर, विवेक, वैराग्य, तसेंच भक्तिज्ञानाचें माहेरघर असल्यामुळें जीवभावादि सर्वस्व त्याच्या चरणीं अर्पण करून सेवक बनावे. जेव्हा अशा तत्त्वदर्शी श्रीगुरु संताची कृपा होते तेव्हांच हृदयात ज्ञान सूर्याचा प्रकाश पडून मोहादि अज्ञान अंधकार समूळ नाहींसा होतो, मन निःशंक होतं. जितात्मा व जितेंद्रिय, श्रद्धावंत यालाच आत्मज्ञान शोधत येऊन माळ घालतें. श्रद्धा म्हणजे विवेकपूर्ण झालेला दृढनिश्चय. विलासभोगासक्त जीवास धर्मश्रद्धा व दृढनिश्चय नसल्यामुळें ते संशयात्मे बनून स्वत:चा नाश करून घेतात

---

## अध्याय पाचवा

पृ. ३२, ओळ ५, शब्द ७ "फळ अनायासें मिळतें" ह्यापुढ —

ज्ञानयोग व कर्मयोग खरें पाहू गेलें असता समसमान तुल्यबल असून एक सारखें फळ देणारे आहेत कर्मफलाचा, देहाहकाराचा व ममत्वाचा त्याग दोन्हीकडे सारखाच सांगितला आहे तरीपण जाणत्यानेणत्यास, आबालवृद्धास, भवसागर पार होण्याला सन्यासयोगापेक्षा निष्काम कर्मयोगच सर्वसुलभ व सर्वसुखकर आहे

पृ ३२, ओळ शेवटची, शब्द १ "नसते" ह्यापुढ —

कर्त्यानें मीपणाचा अहकार टाकून केलेलें जें कर्म त्यालाच निष्काम कर्म म्हणतात. परतु हे श्रीगुरुगम्यरहस्य मर्मज्ञ गुरुपुत्रच जाणू शकतात

पृ. ३२, ओळ २१, शब्द १० "कोठ मिळणार?" ह्यापुढ —

विषयभोग विषवत् समजून विरक्त पुरुष त्याचा त्याग करतात देहात असून ज्यानीं देहभाव स्वाधीन केले, कामक्रोधादि विकारावर विजय मिळविला ते खरे शूर नरवीर धन्य होत त्यानींच ससार जिंकला गतप्राण शरीराला ज्याप्रमाणें कामक्रोधादि कोणतेहि विकार स्पर्श करू शकत नाहींत, त्याला सुखदुःख भासत नाहीं त्याप्रमाणें विदेही जनकादिकाप्रमाणें जो ससारातच राहू शकतो तोच एक खरा योगी व खरा सर्वसुखी होय

---

## अध्याय सहावा

पृ ३८, ओळ ५, शब्द ३ "प्राप्त होतें" ह्यापुढ —

इंद्रियनिग्रह व मनोनिग्रह याच्या साह्यानें ज्यानें स्वत चे संपूर्ण विकार जिंकले आहेत, ज्याचा भोगवासनेचा पाय शून्यावर येऊन समूळ इच्छानिवृत्ति झाली आहे, त्याच्या हृदयातच परमेश्वर प्रगट होतो परमेश्वरास बाहेरून यावें लागत नाहीं ऐलथडीच त्याला परमात्म्याची प्राप्ति होते असा प्रशात व जितात्मा पुरुष परब्रह्माची ओतीव मूर्तिच होय त्याला सोनें आणि माती, मित्र आणि शत्रु, सुख आणि दुःख सारखेंच वाटते अशा साम्यबुद्धीची बैठक ज्याची अढळ झाली तोच एक ब्रह्मनिष्ठ पुरुष होय यात शका नाहीं अशा ब्रह्मनिष्ठाच्या सगतीनें इतरासही ब्रह्मभाव उत्पन्न होतो

पृ. ३९, ओळ २४, शब्द ७ " मिळणारा माल नाहीं " ह्यापुढें :—

योग्यतेची कोठें काहीं खाणी आहे काय? थोडेंसें विवेकपूर्ण वैराग्य, आहारविहारनिद्रादि देहधर्मांत परिमितता, व नियमबद्ध व्यवस्थेशीर आचरण ठेवणें अशा सहजसुलभ मार्गानें कोणासही परमार्थाचा-( योगाचा ) अधिकारी होता येईल, अशा युक्तीनें वागल्यास शरीरबळ, आरोग्य, उत्साह वाढून आतबाहेर सुखाचा वर्षाव होतो, व कष्टप्रद अभ्यासाचे परिश्रम न करता योगाचें महत्कार्य अल्प प्रयासानें साध्य होतें.

पृ. ४०, ओळ ५, शब्द १० " मुख्य गोष्ट आहे " ह्यापुढ :—

विषयभोगलोलुप झालेलीं हीं दुष्ट इंद्रियें साधकास परमार्थाचा व्यर्थ बागुल-बुवा करून भीति दाखवितात. खरी वस्तुस्थिति निराळी आहे. जें जें हिताला उपकारक व चांगलें तें नेहमींच या इंद्रियांना दुःखकारक वाटलें. आत्मौपम्य बुद्धीनें सर्व जगत् पाहावें. तसेंच स्वतः जगद्रूप होऊन वागावें. अशी साम्य-बुद्धि प्राप्त होणें परमार्थसाधनाचा कळस होय. जसें आपणास सुखदुःख होतें तसेंच दुसऱ्यास होतें. एकच चैतन्य भूतमात्रांत समसमान आहे, हें अनुभवणें, म्हणजे मोक्षसुख होय.

पृ. ४०, ओळ १३, शब्द ५ " हृ खरें आहे " ह्यापुढें :—

संकल्पविकल्पात्मक तें मन. येथूनच कामक्रोधादि विकाराचा उगम होतो. मनोनाशाबरोबर ह्या सर्वांचा नाश होतो व संसार आटतो. मनाचा निग्रह करणें म्हणजे माकडाला समाधि शिकवणें होय. एवढा मोठा हत्ती पण लहान अंकुशानें ताळ्यावर येतो त्याप्रमाणें, दुर्निग्रह चंचळ मन दीर्घकालपर्यंत सतत अभ्यास व वैराग्याच्या अंकुशानें स्वाधीन होऊन स्थिर होतें. विषयभोगांतून चित्त काढून त्याची स्थापना परमेश्वरचरणीं करणें हा अभ्यास व विषयसुखांत वारंवार दोषदृष्टि पाहून त्याचा वीट येणें, नको नकोसें वाटणें ह्यास वैराग्य म्हणावें. इंद्रियनिग्रह व मनोनिग्रह ज्यांना माहीत नाहीं, विवेक-वैराग्याला जे अनोळखी आहेत, केवळ इंद्रियजन्य विषयविलाससुखांत निमग्न आहेत त्यांचें मन शांत, स्थिर, प्रसन्न होणें केव्हांहि शक्य नाहीं

## अध्याय सातवा

पृ. ४७, ओळ ९, शब्द १ "त्याला तें लाभतें" ह्यापुढें:—

हजारों मनुष्यात ईश्वरप्राप्तीची इच्छा करणारा एखादाच सापडावयाचा. इच्छारूपी महापुरात कोट्यवधि लोक उडी घेतात, पण ईश्वरप्राप्तीच्या पैलतीरावर पोहोंचून विजय मिळवणारे हाताच्या बोटानीं मोजण्याइतकेच असावयाचे. आराम खुर्चीवर पडून शास्त्राध्ययन किंवा ब्रह्मज्ञानाची चावटी करण्यात काय अर्थ? सांगितल्याप्रमाणें अविश्रांत परिश्रम व उत्कट तपश्चर्या करणारे अत्यंत दुर्मिळ. ब्रह्मज्ञान हें सिंहिणीचें दूध असून तें पचविणें त्याहून कठीण आहे.

पृ. ४८, ओळ २२, शब्द २ "असे थोडे" ह्यापुढे:—

मायामोहानें ग्रस्त झालेले मूढ, तसेच राक्षसी स्वभावाचे लोक, मदांध होऊन देवधर्मास विसरतात. ज्या निंद्य गोष्टी करू नयेत त्या बुद्धिपुरस्सर करण्यांत पुष्पारकी मारतात. ह्यात काय आहे, त्यात काय आहे, अशा नास्तिकवादानें दुराचरणाचा त्यांचा नित्य नंगा नाच चाललेला असतो दुष्कर्मामुळें जन्मभर नानाविध दु खपरंपरा भोगीत असताही त्या निगरगट्ट कोडग्याना त्याची लाजच वाटत नाहीं.

---

## अध्याय आठवा

पृ. ५४, ओळ २४, शब्द ९ "स्वप्नातही दिसते" ह्यापुढें:—

अकल्पित मरण जेव्हा एकदम उरावर येऊन आदळतें, तेव्हा अंत करणात जे विचार चालू असतात त्याप्रमाणें मरणोत्तर पुढील गति होते. काहीं केल्या ती गति चुकत नाहीं. जिवंतपणीं जी गोष्ट अधिक वरचेवर आवडते तीच गोष्ट मरणाच्या वेळा सारखी मनात घोळत राहते. मरणसमयीं जर परमेश्वराचा विसर नसेल तर सद्गति झालीच पाहिजे. दीर्घकालाचा सतत सदाचार व परमेश्वरभक्ति ह्या जोडगोळीनें कामक्रोधलोभादि विकार नाहींसे होतात. असें जर होत नसेल तर तो सदाचार किंवा भक्तिच नव्हे. ह्या अभ्यासानें मरणसमयीं वासना विकार यांचा विसर पडून भगवंताचें स्मरण अंतकाळीं होतें व त्यामुळें तो भगवत्स्वरूप होतो. म्हणून अर्जुना, तू सदा सर्वकाळ माझेंच स्मरण करावें. जें जें डोळ्यानीं पाहावें, कानानें ऐकावें, मनानें चिंतावें, वाचेनें बोलावें

कीं, मन व बुद्धि माझ्या ठिकाणीं स्थापन कर, माझ्या भजनपूजनांत प्रेमानें गुंगून जा, सर्वांभूतीं भगवद्भाव ठेवून सगळ्यांशीं विनम्र हो व अखंड प्रयत्नपूर्वक माझें अनुसंधान-स्मरण ठेव.

हाच काय तो सर्वश्रेष्ठ असा भक्तिमार्ग होय. ह्या भक्तिमार्गानेंच तू माझ्या स्वरूपाला मिळशील. ही अंतःकरणांतील परम गुह्य गोष्ट तुला आज स्पष्ट करून सांगत आहें.

---

## अध्याय दहावा

पृ. ७६, ओंव्या २७, शब्द ५ "असेंच झालें" ह्यापुढें :—

सद्गुरु, श्रीकृष्णा, त्या वेळीं माझें मन व बुद्धि हीं विषयमहाविषानें घेरलीं होतीं. विषबाधा झालेल्यास कडू पदार्थ गोड व गोड पदार्थ कडू लागतो. विषयविषाची बाधा झालेल्या जिवास कडू संसार गोड व गोड परमार्थ कडू लागतो. स्वतःच्या बुद्धीनें हजारो तत्त्वज्ञानादि ग्रंथांचा जन्मभर काथ्याकूट केला, योगयागादि करून अनंत दुःसह कष्ट सहन केले, तरी जोंपर्यंत श्रीगुरुचरणांना-प्रसन्नता होत नाहीं तोंपर्यंत सर्व निष्फळ होय. महत्पुण्याईनें श्रीगुरुकृपा होतांच सर्व सत्कर्माचें फळ पदरांत पडतें.

---

करिता भगवतानें विश्वरूप दाखविलें होतें अरे, कोणी कोणास मारीत नाहीं, मीच सर्वांचा संहार करतों, माझ्या इच्छेशिवाय झाडाचें पान देखील हालत नाहीं, हें विश्वरूपाच्या निमित्तानें अर्जुनास सप्रयोग शिक्षण दिलें.

---

## अध्याय बारावा

पृ ९५, ओळ ४, शब्द ६ "असें मला वाटत" ह्यापुढ —

शभर भार वजनाच्या सोन्याच्या लगडीचा जो कस त्याच कस त्यातील एक वाल सान्याचाहि असतो. त्याप्रमाणें तुझें विश्वव्यापक निर्गुण व एकदेशी सगुण स्वरूप ह्याची बरोबरी सारखीच आहे हें मला चांगलें समजलें तरी पण, श्रीकृष्णा, मला येवढच आता विचारावेंसें वाटत का, तुम्हीं जें अल्पकाळ विश्वरूप धारण केलें होत तें खर हात कीं तेवढ्यापुरत कौतुक होतें! सगुण भक्त सर्व जीवभाव तुला समर्पण करून, अहोरात्र सगुण उपासना करून केवळ तुझ्या प्रेमानें जगतात तसेच निर्गुण उपासक ज्ञानी पुरुष कवळ सोहं भावानें उपासना करतात वर सांगितलेले सगुण भक्त व निर्गुण उपासक ज्ञानी ह्या दोघांपैकीं खरें मर्म कोणाला कळतें व त्यात अधिक तुझा प्राणसखा कोण हें मला स्पष्ट साग

पृ ९५, ओळ ७ शब्द २ श्रीकृष्ण म्हणतात ह्यापुढ —

उन्हाळ्यापेक्षा पावसाळ्यात पर्जन्यवृष्टीमुळ गंगेचें पाणी सारखें वाढत जाऊन त्यास अनिवार महापूर येतो त्याप्रमाणें देहास व जगास विसरून अत्यंत प्रेमानें, श्रद्धेनें, अनन्यभावानें माझें अखंड भजन करीत असताना प्रेम नित्य नूतन सारख वाढत राहून त्यास महापूर येतो समुद्राला मिळाल्यावर देखील गंगेचा पाठीमागून येणारा प्रवाह जोरदार असतो त्याप्रमाणें ईश्वरैक्य साधूनहि सगुण भक्ताच्या प्रेमप्रवाहाचा जोर सारखा वाढत राहतो हीच ज्ञानोत्तर भक्ति सर्वश्रेष्ठ होय निर्गुणोपासकापेक्षा वरील सगुणोपासकच सर्वोत्तम, सर्वश्रेष्ठ माझे पंचप्राण आहेत हें माझें पूर्ण, निश्चित, नि संशय अचल, ठाम मत आहे

पृ ९५, ओळ २१, शब्द ८ 'नदीपार करतो' ह्यापुढ —

ससारासक्त जीवास भवसागरातून तरून जाण्यास निरनिराळ्या प्रसंगीं अनेक सगुण अवतार मी धारण करतों त्या सगुणांचीं हजारों नामं आहेत

अशा नामरूपी नौकेचा आश्रय करून संसारासरा जीवानें प्रेमयुक्त नामसंकीर्तनभक्तीनें सहज लीलेनें तरून जावें. प्रेमानें ऐक्य होतें. म्हणून अर्जुना, वृत्तीसह मन व निश्चयासह बुद्धि माझ्या ठिकाणीं प्रेमानें अर्पण कर. म्हणजे तुझा अहंकार मावळून शेवटीं सर्वव्यापी असा मीच होशील हें मी शपथ घेऊन तुला प्रतिज्ञेवर जगजाहीर करतो. पर, असें करणें तुला मोठें कठीण वाटत असेल तर चोवीस तासांतून सवडीप्रमाणें थोडा वेळ तरी एकांतांत बसून चित्ताची एकाग्रता कर व तें चित्त माझ्याकडे प्रेमानें लाव ण्याचा अभ्यासक्रम ठेव. चित्ताच्या एकाग्रतेंत आनंदाचा व सुखाचा जिवंत सतत झरा आहे. विषयांवाचून परमानंदाची प्रतीति येणें हें अभ्यासाचें फळ होय. अशा अभ्यासांत माझ्या समागमाचें जितकें सुख जास्त अनुभवास येईल तितकें तें मन ऐहिक विषयसुखापासून परावृत्त होईल. जेवढें इंद्रियजन्य विषय सुख कमी तेवढें ईश्वरप्रेम जास्त वाढेल. चित्त विषयसुखांतून काढून तें परमेश्वराकडे स्थिर करणें ह्यालाच अभ्यासयोग म्हणतात निर्विकार व निर्विषय ईश्वरप्रेमांत मुक्ति, भक्ति व सर्व सुखांचा साठा आहे.

पृ. ९६ ओळ २, शब्द ७ ' म्हणत जा ' ह्यापुढें :—

वरील अभ्यास करणें कठीण वाटत असेल तर दुसरी सोपी युक्ति सांगतों. इंद्रियांचा मुद्दाम कोंडमारा करू नकोस, विषयभोग तोडू नकोस, फक्त निंद्य कर्मांचा त्याग करून विहित धर्माचरण कर म्हणजे झालें. कर्माचें कर्तृत्व आपणाकडे नसून ईश्वराकडे आहे. मी निमित्तमात्र आहे. 'मी' पणाचा अभिमान सुटून ईश्वरार्पण कर्म केलें म्हणजे तू त्या कर्मबंधनांतून मुक्त होशील फलत्यागानें जीवनकलेची पूर्णिमा साधते.

पृ. ९६, ओळ ९, शब्द १ ' कराव ? ' ह्यापुढें'—

विवेक-वैराग्याच्या अभ्यासानें ज्ञान होतें, ज्ञानानें ध्यान साधतें, ध्यानांत कर्में हुरावतात व त्यामुळें फलत्याग अनायासें साधतो. कर्मफळाचा त्याग व देहाहंकार नाहींसा होताच अखंड सुखशांतिसमृद्धि प्राप्त होते अशा अभ्यासाच्या क्रममार्गानें ज्याला परम शांतिसुख मिळून जो अहर्निश झाला त्याला सर्वभूतीं भगवंत दिसत असल्यामुळें तो दुसऱ्याचा द्वेष करणें शक्यच नाहीं. तो पृथ्वीप्रमाणें क्षमाशील असतो, उन्हाळ्यांत समुद्र आटत नाहीं, व पावसाळ्यांत वर उचमळून जात नाहीं, त्याप्रमाणें विषय न मिळताहि त्याच्या चेहऱ्यावर अखंड प्रसन्नता व आनंदाचें तेज चमकत राहत.

जगाचा कटाळा न करता जगाच्या सुखाकरता तो सर्व प्रकारें झीज सोसतो. त्याचें अस्तित्वच जगाच्या सुखासाठीं असतें. इतकें असूनहि मला त्यानें आत्मसमर्पण केल्यामुळें त्याचें भक्तिप्रेम अवर्णनीय आहे. ह्यालाच योगी, भक्त व मुक्त म्हणावें.

अशा भक्ताकरिता मी वेडापिसा होतों. मला त्याचा सारखा ध्यास लागतो. तो भेटेल तेव्हा माझा जीव खालीं पडतो. त्याच्याकरताच मी रूप घेऊन येथें येतों. त्याच्यावरून जीव-प्राण ओंवाळून टाकावा इतका तो मला प्रिय वाटतो.

पृ. ९६, ओळ २७, शब्द ११ " सर्वांना सारखाच " ह्यापुढें —

तो शत्रुमित्र ह्याना सारखेंच मानतों. मान-अपमान, शीत उष्ण, सुख दु ख, निंदा स्तुति ह्या सर्व ठिकाणीं त्याची समबुद्धि अढळ असते तिन्ही लोकांनीं त्याची इच्छा करावी असा तो सर्वांस प्रिय व सेव्य असतो. तो गुहेंत न राहता समाजात सर्वत्र कर्मयोग्याप्रमाणें जगाच्या उपयोगी पडण्याकरता वावरत राहतो. चित्तात भगवत, डोळ्यात प्रेम, हातात सेवा ह्या गुणानीं तो जगाचा प्राणप्रिय हितकर्ता होतो

पृ. ९७, ओळ १, शब्द ५ " गर्व वाहत नाहीं " ह्यापुढें —

हें विश्वच माझें घर अशी ज्याची बुद्धि स्थिर व कायम झाली आहे, फार काय जो स्वत च चराचर झाला आहे, इतकें असूनहि माझ्याबद्दल नित्य नूतन वाढतें निस्सीम प्रेम आहे त्याला मी आपले मस्तकावरील मुकुट करतों तो कैवल्याचा अधिकारी असूनहि सर्वांपुढे लीन होतो मी विदेही असताहि त्याच्या सगतीच्या सुखाकरता मला देह घ्यावा लागतो

---

## अध्याय तेरावा

पृ. १०३, ओळ १७, " प्रयत्न तो करतो " ह्यापुढ —

देवगुरु बृहस्पतीसारखी सर्वज्ञता अगीं असताहि आपला मोठेपणा प्रगट न व्हावा म्हणून तो सारखा वेड पाघरून राहतो त्याला लौकिकाबद्दल उदासीनता, शास्त्रवादाचा कटाळा, नि शब्द व स्वस्थ राहण्यातच विशेष आनद वाटतो लहानपणा घेऊन वागण्यात त्याला भूषण वाटतें हें खर अमानित्व होय.

ज्यात जीवनविकास नाहीं, आत्मकल्याण नाहीं, अशा निष्फळ गोष्टींत आयुष्य गमावतो. तमोगुणी आळस, निद्रा, असावधानता ह्यांमुळें अधोगतीस जातो.

## अध्याय पंधरावा

पृ. १३१, अध्याय पंधरावा—अगदीं सुरवातीचा मजकूर पुढीलप्रमाण.—

भगवान् श्रीकृष्णानें गेल्या अध्यायाच्या शेवटीं असा निर्णय सांगितला कीं, ज्याला ज्ञान प्राप्त झालें तो मोक्षाचा अधिकारी झाला. पण तें ज्ञान शेवट-पर्यंत कायम टिकण्यास विवेकयुक्त प्रखर वैराग्य रोमरोमांत मुरलें पाहिजे. हा सिद्धान्त देवानेंच ठरवून टाकला. वैराग्याचा पाया जितका मजबूत तितकी ज्ञानाची दगडी इमारत अधिक टिकाव धरू शकते.

अंगीं वैराग्य कसें बाणेल याची युक्तिहि भगवंतानीं दाखवून दिली. आपल्या जेवणात विष कालविलें गेलें आहे, हें जर जेवणारास आगाऊ ठाऊक झालें तर तो तें पुढील भरलेलें ताट तत्काळ झुगारून टाकून देईल. त्याप्रमाणें ह्या संसारातील विषयसुखांत दु:खरूपी विष कालविलें आहे, संसारसुख क्षणिक, नश्वर, मायावी आहे अशी मनात खूणगाठ पटताच वैराग्य नको नको म्हटलें तरी साधकाच्या मरणावर लोटांगण घालीत येतें.

पृ. १३१, ओळ २५, शब्द ८ "मनुष्यच जाणतो" ह्यापुढ —

ह्या वृक्षाचें होणें जाणें एवढें सत्वर असतें कीं, तें लक्षातच येत नाहीं. म्हणून हा अव्यय असे लोक समजतात. ह्याचा सारखा व्यय होत असतो, पण त्या व्ययानेंच हा अव्यय वाटतो ह्या संसारवृक्ष एकसारखा जातयेत आहे हें न ओळखता वेडे–अज्ञानी जीव ह्यास अव्यय मानतात. ह्याचा उगम मूळ अज्ञानात आहे, हा क्षणिक आहे, नाशवंत आहे, अत्यंत वेगवान् आहे, मायावी आहे असें जो जाणतो तोच एक खरा परम योगी व परम ज्ञानी होय.

पृ. १३२, ओळ १७, शब्द ११ "होत नाहीं" ह्यापुढें:—

ह्या संसारवृक्षाला आदि, अंत व स्थिति नाहींत. अज्ञानाच्या बळावर तो अजिंक्य झाला आहे. म्हणून त्याच्या नाशाकरिता आत्मज्ञानावाचून दुसरें

जितके तू उपाय करशील तितके अपायकारक ठरुन तू अकिंचन ह्या ससार पाशात गुतून पडशील. स्वमातील दु:खास जाग्रत होणें हच एक औषध, त्या प्रमाणें हें अज्ञानरुपी मूळ तोडण्याला आत्मज्ञानच एक रामबाण शस्त्र आहे पण हें शस्त्र उचलून त्याचा उपयोग करण्यासाठीं अखंड प्रखर वैराग्याचें बळ अगात पाहिजे

पृ १३०, ओळ १६, शब्द ७ " सोडून जातात ' ह्यापुढें—

त्याला आत्मस्वरूपाची प्राप्ति हाते त्याचे ठिकाणीं मोह व अभिमान राहत नाहात तो विकाराच्या तावडात सापडत नाहीं सर्व विकल्प दूर पळतात भेद बुद्धि गळून पडते अविद्या व देहाहकार नाहींसा होतो सुखदु ख समसमान होतात विषयभोगाचें नावच त्याला आवडत नाहा भक्तिज्ञानवैराग्यसपन्न झाल्यामुळे त्याच्या मस्तकावर नम्रतेचा मुकुट स्थिर होतो

पृ १३३, ओळ ३, शब्द १० " नाश पावतात ' ह्यापुढ —

एकवेळ बुद्धीच्या जोरावर पृथ्वीवरील परमाणूचा हिशोब सागता येईल, सृष्टींतील सर्व शास्त्रावर प्रभुत्व मिळविता येईल, अशक्य गोष्टी शक्य करुन दाखविता येतील परतु जोपयत विवेकपूर्ण विषयवैराग्य व नि:सीम ईश्वर भक्ति रोमरोमात भिनली नाहा तापर्यंत ईश्वरप्राप्ति इतर कोट्यवधि साधनानीं होणें केव्हाहि शक्य नाहा ताड भरून ब्रह्मज्ञानविचाराची कितीहि तोंडपाटिलकी मिरविली तरी त शुष्क ब्रह्मज्ञान कवडीमोल आहे चित्तात मीपणाचा अहकार व विषयभोगाची लालसा तसेंच कामक्रोधादि विकार बाळगून कोटी जन्म जरी सकल वेदादि शास्त्राचा कीस काढून अभ्यास केला, तरी अशा मूढाना ईश्वरप्राप्ति होणें केव्हाहि शक्य नाहीं हा शुद्ध लौकिक दभाचार होय.

---

## अध्याय सोळावा

पृ १४० अगदीं सुरवातीचा मजकूर —

• भगवान् श्रीकृष्णानें मागील अध्यायात सर्वशास्त्रसिद्धान्त सागितला. अश्वत्थ वृक्षरूपकानें ससारउपाधीचें विस्तृत वर्णन केलें अतर्बाह्य उपाधिनाशाचा साधनमार्गहि नि सदेहतेनें बुद्धीला स्पष्ट पटेल असाच सागितला. ह्यापुढें

पृ. १५४, ओळ ७, शब्द ४ " चालू असतें " ह्यापुढें—

पतित–दुराचारी जीवालाहि न दुखविता त्याची सुधारणा होऊन त्याला शांतिसुखाचा लाभ होईल, एकाला उद्देशून उपदेश करीत असता त्यात अनेक जीवांचें कल्याण होईल, अज्ञान जाऊन ज्ञानसंपन्न होईल, कितीहि ऐकिलें तरी त्याबद्दल कटाळा, असंनि नसून अधिकाधिक ऐकावेंसेंच वाटेल, ह्याचें नाव खरें वाचिक तप. अशी तपश्चर्या करणारे महात्मे व्यवहारात बहुतेक मौन धारण करतात, व निरंतर भगवच्चिंतनात निमग्न राहून वाचेनें अखंड नाम-स्मरण, किंवा गीताभागवतादि भक्तिज्ञानप्रधान शास्त्राचा सतत अभ्यास चालू ठेवतात.

पृ. १५५, ओळ २०, शब्द २ " होत नाहीं " ह्यापुढ—

सत्त्वगुणाचें उज्ज्वल–शुद्ध स्वरूप स्पष्ट उठावदार–खुलून दिसावें म्हणून रजतमोगुणाची पार्श्वभूमि राखावी लागली. रजतमोगुणाच्या नाशानेंच अनायासें सत्त्वगुण फोफावतो. सत्त्वगुणानीं केलेलीं कर्में शीघ्रफलदायी होतात. परंतु केवळ त्यानीं मोक्षसिद्धि प्राप्त होत नाहीं. त्याची गुरुकिल्ली दुसरी कांहीं निराळीच आहे. स्वत ज्या नावाची चिठ्ठी बरोबर घेऊन मूल जन्मास येत नाहीं त्यास दुसऱ्यानें ज्या नावानें हाक मारावी त्याच नावाने तें हुकार देऊन आपल्याजवळ धावत येतें. त्याप्रमाणें परब्रह्म निर्गुण–निराकार असल्यामुळें त्यास मुळात नाम व रूप नाहीं, तरीपण मोहग्रस्त संसारपीडित जीवाचें गाऱ्हाणें पटाक्षानें ऐकून त्यास ओ देऊन धावत यावें म्हणून श्रुति-माउलीनें एक नाममंत्र शोधून काढला. अशा नाममंत्रानें परब्रह्मास कळवळून आळविलें असता निर्गुण ब्रह्म सगुण होऊन अनन्यभक्ताच्यापुढें नाचत येऊन उभें राहतें. ह्या नाममंत्राच्या तपोबलावर ब्रह्मदेवाला सृष्टि उत्पन्न करण्याची शक्ति व पात्रता आली. म्हणून नाममंत्राशीं एकजीव होऊन जेव्हा सात्त्विक कर्में चालतें तेव्हाच त्याला मोक्षसिद्धि प्राप्त होते.

---

## अध्याय अठरावा

पृ. १६३, ओळ २४, शब्द १० " ह मठीण दिसतें " ह्यापुढें—

श्रद्धा म्हणजे निवेकपूर्ण शास्त्रोक्त मनाचा दृढनिश्चय. रजोगुण व तमोगुण समूळ नष्ट झाल्याशिवाय सात्त्विक उदय दर्शोंची श्रद्धा मनुष्याच्या अंत करणात

उत्पन्न होणें शक्य नाहीं. रजतम दोन्ही निःशेष गेल्याशिवाय ब्रह्मनामावर श्रद्धा कशी स्थिर होणार ? रजतमभिश्र कर्मांनीं जन्ममृत्यूचे पाश अधिकाधिक दृढावतात, तर रजतमाचा त्याग करून ब्रह्मनामावर अढळ श्रद्धा ठेवल्यास जन्ममृत्यूचें निवारण होऊन मनुष्य संसारदुःखमुक्त होतो.

पृ. १६४, ओळ १३, शब्द ९ "लोक म्हणतात" ह्यापुढें:—

प्रतिदिनीं प्रभातसमयीं, माध्यान्हसमयीं, सायंसमयीं वर्णाश्रमाच्या अधिकाराप्रमाणें जें केलेंच पाहिजे त्याला नित्यकर्म म्हणतात. जसें, संध्यावंदन, जप, पोथी, देवपूजा, वैश्वदेव, पंचमहायज्ञादि. इ. इ. नैमित्तिक कर्में म्हणजे विशिष्ट निमित्तामुळें कर्तव्यकर्म म्हणून करावीं लागणारीं कर्में. जसें, चंद्रसूर्यग्रहणाच्या पर्वकाळीं जपदानादि तीर्थांच्या ठिकाणीं पुण्यकर्म करणें, गत मातापितरादिकांची पवित्र स्मृति म्हणून तन्निमित्त यथाविधि अन्नदानादि करून श्राद्ध करणें, वार्षिक पर्वें, उत्सवादि करणें, आपद्ग्रस्त जीवास मदत करणें, अतिथिसत्कार करणें, इ. इ. ज्याप्रमाणें भोजन केल्यानें प्रतिग्रासीं भूक जाते, शांतिसमाधानतृप्ति होते त्याप्रमाणें ह्या नित्यनैमित्तिक कर्मांचें फळ आहे. ह्यानें प्रत्यवाय दोष सुटतो, स्वतःचा अधिकार अधिक उज्ज्वल होतो व सद्गति अनायासें प्राप्त होते. नित्यनैमित्तिक कर्मांचें फळ सोडण्याला त्याग म्हणतात. अश्वमेधादिक याग, विहिरी, तलाव, बगीचे इ. काम्यनिरु कर्मांच्या त्यागाला संन्यास म्हणतात. संन्यासानें काम्य कर्मांचें बंधन होत नाहीं निषिद्ध कर्म तर वाईट म्हणून अगोदर टाकून दिलेलें असतें. नित्यनैमित्तिक कर्मांचें फळ सोडून दिल्यामुळें तींहि नाश पावतात. ह्याप्रमाणें सर्व कर्में त्याग व संन्यास यांनीं नाश पावल्यानें आत्मज्ञानाची प्राप्ति सहजसुलभ होते.

पृ. १६५, ओळ २१, शब्द ५ "प्रवास संपेल" ह्यापुढें:—

जोंपर्यंत आत्मज्ञानाविषयीं दृढनिश्चय झालेला नाहीं तोंपर्यंत यज्ञदानतपादि कर्ममार्ग मुमुक्षूनें सोडूं नये. मीपणा व कर्मफलाची इच्छा म्हणजे स्वार्थ सोडून देऊन शरीर आहे तोंपर्यंत सत्कर्में केलींच पाहिजेत. कर्मयोगाचें खरें रहस्य समजलें कीं सर्वभूतीं समदृष्टि होते. सर्व कर्में परमेश्वराला अर्पण करावीं म्हणजे त्याचें फळ स्वार्थीं न घालता परमार्थीं घालावें. नैष्कर्म्याकरताच वरील सत्कर्में अधिकाधिक अहंकार व फलेच्छा सोडून करीत गेल्यास रजतमोगुणाचा नाश होतो जो मुमुक्षु संसारबंधनापासून मुक्त होण्यासाठीं रात्रंदिवस तळमळपूर्वक प्रयत्न करीत आहे त्याला कर्मयोगाचें रहस्य थोडक्यात सांगावेंसें वाटतें तें

असें कीं, पंचमहायज्ञादि शास्त्रोक्त कर्में बिनचूक आजन्म करावींत; पण मी कर्ता असा अहंकार धरूं नये, व कर्मफळाची इच्छा म्हणजे स्वार्थबुद्धि ठेवूं नये. प्रथमच फळाची आशा सोडून सत्कर्मादि पुण्यकर्मांना आरंभ करावा. संतांची कर्मांची ही मुख्य हातोटी होय. सात्त्विक त्यागांत कर्म आणि कर्ता अशा द्वैतभावाची वार्ताच राहत नाहीं. अशीं कर्में करून जो त्याग होतो त्यानेंच संपूर्ण कर्मांचा त्याग होतो. याहून निराळ्या रीतीनें त्याग केल्यास त्यापासून बंधनाचे पाश अधिकच आवळले जातात. सारांश, देहाची अहंता व कर्मफळाचा त्याग करणारा त्रिभुवनांत खरा महात्यागी होय. व त्यालाच खरी नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त झाली. निष्कामबुद्धीनें व निरहंकार वृत्तीनें स्वधर्माचरण करणें यांत कर्मयोगाचें रहस्य व खरें मर्म आहे.

पृ. १६६, ओळ १३, शब्द ५ " सुटका कशाची होणार ?" ह्यापुढें—

हें सर्व त्रिविध जग कर्मांचें फळ आहे. देव, मनुष्य व स्थावर ह्याला जगडंबर म्हणतात. हे तिन्ही कर्मांच्या फळाचेच प्रकार आहेत. ह्यांत काय, त्यांत काय आहे; देवधर्म वगैरे कांहीं नाहीं असें नास्तिकमतानें वागून पापाचरण स्वैरबुद्धीनें करणाऱ्यास कृमिकीटक, पशुपक्षी, वृक्ष, पाषाणादि निकृष्ट देह प्राप्त होतात. हें जें कर्माचें फळ तें अनिष्ट होय. स्नानसंध्या, जप, पूजा, पोथी इ. स्वधर्मानें वागून देवधर्माकरितां तसेंच परोपकाराकरतां सर्व बाजूंनीं झीज सोसतात त्यांना इंद्रादि देवतांचे देह प्राप्त होतात. ह्या कर्मफळास इष्ट असें म्हणतात. शुभ–अशुभ पापपुण्य ह्यांच्या सम मिश्रणानें मनुष्यदेह प्राप्त होतो. व ह्यास मिश्र फळ म्हणतात. जे कर्मफळभोगाच्या आशेंत पडतात त्यांना हें त्रिविध कर्मफळ सुटणें शक्य नाहीं.

पृ. १६९, ओळ १८, शब्द १० " सर्वस्व मानतात " ह्यापुढें:—

अमूल्य नरदेह प्राप्त झाला असतां त्याचें सार्थक्य न करतां देहसुखच एक सर्वस्व मानून इंद्रियांच्या अल्प–क्षणभर तृप्तीकरतां अभक्ष्य भक्षण, शास्त्रनिषिद्ध अपेयपान, परस्त्रीसेवनादि निंद्य कर्में करतात.

तामसी ज्ञानांत विधिशास्त्रांचें वस्त्र नसल्यामुळे तें नागवें ज्ञान होय. श्रुतिशास्त्रांचें प्रामाण्य नसल्यामुळें निंद्य होय. तामसी ज्ञानांत विवाहादि शरीरसंबंध करण्यास कोणतीच आडकाठी नाहीं. जातगोत धर्मादि ओळख नाहीं, परस्त्री, परद्रव्य, परपीडा इत्यादिकांचा विचार नाहीं, मद्यमांसादि निषिद्ध पदार्थसेवनाचें भय नाहीं, 'वाटेल त्या जागीं, वाटेल त्यानें हातचें, वाटेल

नुसतें पुस्तकी ज्ञान मिळवून भाराभर करून काय उपयोग? करून त्याप्रमाणें वळणें हाच काय तो सात्त्विक पुरुषार्थ.

पृ. १७१, ओळ, २७ शब्द ५ "स्वाधीन करतें" ह्यापुढें—

सारांश, मन, प्राण व इंद्रियें यांचीं कर्में शास्त्रबाह्य दुराचरणापासून परावृत्त केलीं जातात. एकनिष्ठ सात्त्विक धैर्याच्या साहाय्यानें इंद्रियमनादिकांचे अव्यापारेषु व्यापार स्तब्ध होतात व त्यायोगें ब्रह्मचिंतन सुलभ होऊन भगवतांशीं तादात्म्य होतें. तामसधृतीमुळें आळस व निद्रा बेसुमार वाढते. देह व धनावर आसक्ति वाढवीत गेल्यामुळें भय सारखें पाठीस लागलेलें असतें. गृहदारापुत्रादिकांवर विशेष स्नेह ठेवल्यानें त्यांच्या वियोगांत मन शोकसागरांत बुडून विव्हळ होतें. प्राप्त स्थितींत समाधानवृत्ति नसल्यामुळें मरेपर्यंत विषाद कायम राहतो. तारुण्य, अधिकार व संपत्तीनें तो मदांध होतो.

पृ. १७२, ओळ ८, शब्द ५ "सुख म्हणावें" ह्यापुढें.—

सर्वसामान्य जीव विषयलोलुप आहेत. त्यांची व विषयभोगाची ताटातूट होताच मरणप्राय दुःख होतें, पण विवेकवैराग्यसंपन्न ज्ञानी पुरुष अक्षय व अखंडित ब्रह्मानंद–आत्मसुख मिळविण्याकरता मनांतून सर्व विषय व विकार प्रथम त्यागून टाकतात. इंद्रियांना त्यांच्या प्रिय विषयांचें दर्शनच होऊं देत नाहींत. सात्त्विक सुखाचा उगम चित्तशुद्धींत व आत्मशुद्धींत आहे. कामक्रोधादि विकार व विषयभोगाची लालसा अत्यंत निवृत्त झाली म्हणजे शुद्ध सात्त्विक सुखाचा अखंड जिवंत झरा प्राप्त होतो.

पृ. १७२, ओळ १४, शब्द ८ "तामस सुख" ह्यापुढें.—

तामस सुखाची सर्व तऱ्हा कांहीं निराळीच असते. सात्त्विक सुखाप्रमाणें तें निर्विषय नसतें, राजस सुखाप्रमाणें तें विषयेंद्रियजन्य सुखहि नसतें. तामस सुखाचा सर्व विपरीत प्रकार. कुंभकर्णासारखें निजून राहण्यांत सुख वाटतें, जागृतींत असतां आळस किंवा कर्तव्यशून्य स्थितींत त्याला बरें वाटतें, बरें, निद्रा व आळस सोडून जर कांहीं करावयास गेला तर तेथें प्रमादच घडावयाचा. मांसाहार, मद्यपान, वेश्यागमन, परस्त्री–परद्रव्याचा अपहार, परपीडा, आळस, निद्रा व प्रमाद यांत जें सुख वाटतें तें नितांत तामस होय.

पृष्ठ १७३, ओळ १, शब्द ३ "विषयपराङ्मुख करतो" ह्यापुढें:—

अंतःकरणाचा निग्रह होऊन बुद्धि आत्म्याच्या ठिकाणीं अंतर्मुख होणें यास शम म्हणतात. तेथूनच ब्राह्मणाच्या कर्माचा प्रारंभ होतो. बाह्येंद्रियांना

शास्त्रविधिमार्गावर ठेवून त्याना अधर्माकडे केव्हाच न जाऊ देणें ह्यास दम म्हणतात. सदाचरणपूर्ण अखड ईश्वराचें चिंतन ह्यास तप म्हणावें. मन निर्विकार होऊन शुद्ध मक्तिभावानें भरलेलें असण व हातानीं शास्त्रशुद्ध सत्कर्में करून अग सुशोभित करणें ह्याचें नाव अनर्वाह्य शौच होय ब्राह्मणाचे हे नऊ गुणधर्म स्वाभाविक जन्मन च उत्तन्न झालेले असनात. ब्राह्मणाना हे सद्गुण अल्प प्रयासानें सिद्ध होतात, पण इतरास त्या सर्व सद्गुणाकरता विशेष प्रयत्नच केला पाहिजे.

पृ १७७, ओळ ७, शब्द ६ " उलट जात नाहीं " ह्यापुढ —

परपरेनें आलेलें जातिविहित कर्म शास्त्राच्या कसोटीवर बघा रुपयाप्रमाणें खणखणीत वाजवून मनाचा खात्री करून घ्यावी. नतर शका-कुशका, आळस, फळेच्छा, देहासक्ति टाकून तेथेंच शरीरानें व मनानें सर्व भर द्यावा. प्रवाहात पडलेलें पाणी इकडे तिकडे न जाता ठराविक एकाच मार्गानें जातें, त्याप्रमाणें शास्त्रविहित ठराविक विहित कर्में ठराविक रीतीनें, ठराविक वेळीं, सुव्यवस्थित करावीं. अशा योगानें त्वरित चित्तशुद्धि होऊन कर्ममार्गाचा शेवट, सर्व मार्गाची सीमा असें जें अभग शुद्ध वैराग्य तें प्राप्त होऊन शेवटीं मोक्षसिद्धि हस्तगत होते.

पृ. १७४, ओळ १२, शब्द ४ " होऊच शकत नाहीं " ह्यापुढें:—

परपरागत जातिधर्मानें ठरविलेलें कर्तव्यकर्म कितीही हलक्या प्रतीचें असलें तरी तें मारक नसून तारकच आहे असें समजावें विपात जन्मलेल्या किड्याना तें विषच जीवन बनून तारक होतें. पण इतर जगाला गोड असणारा गूळ त्या विषातील किड्याना प्राणहारक काळासारखा ठरतो. म्हणून स्वधर्माचरण सोडून परधर्माचरण (मग तें वरकातीं कितीही चागलें दिसलें तरी) करण्यात आत्मघात आहे. स्वधर्म सोडला की मोक्षसुख अतरलेंच. आयुष्य खर्ची पाडून, इंद्रियाना दु ख देऊन, स्वधर्मानें पुण्यसग्रह करण्याऐवजीं दुराचरणानें पापसग्रह करून विकत दुःख का घ्यावें ?

पृ. १७५, ओळ १, शब्द ३ " शपथ घाळतो " ह्यापुढें—

— स्वधर्मानें झालेल्या श्रमाचें व आयुष्याचें सार्थक होईल ईश्वरप्रसन्नता लाभेल. वैराग्य महासिद्धि प्राप्त होईल. वैराग्याच्या भूमिकेवर दृढ झाल्यावर गृहदारापुत्रदेहादिक ससाराच्या जाळ्यांत तो सापडत नाहीं. मनासारखें वाग-

णारे स्त्रीपुत्रादिक असून संपत्ति विपुल असतानाहि ते 'माझें' आहे असें मनात कल्पनाच नसते. जगातील बाह्य विषयावरील प्रेम निर्जीव होऊन जाते. चित्त परमेश्वराच्या ठिकाणी एकाग्र होऊन सर्व वृत्ति अंतर्मुख होतात. प्रारब्ध सुखदुःखादि कर्मे भोगानें क्षय पावतात, व अहंकारपूर्वक सकाम कर्म कोणतेंच तो करीत नाहीं. अशी ही कर्मसाम्याची दशा त्याला प्राप्त झाली असता ईश्वरसाक्षात्कारी संत श्रीगुरु त्याला आपोआप भेटून कृतार्थ करतात.

पृ. १७५, ओळ ६, शब्द ३ "मार्ग सुलभ होतो" ह्यापुढें —

त्या क्रमाचें आता वर्म सागतों तें असें कीं— श्रीगुरूपदिष्ट विशिष्ट मार्ग आचरल्यानें त्वरित चित्तशुद्धि होऊन बुद्धि स्थिर होते. इंद्रियें, मन व बुद्धि यांचें संयमन करून शब्दस्पर्शादि जे उपभोग्य विषय आहेत त्यांचा त्याग करतो. चित्त निर्विकार व शांत होण्याकरतां एकांत असा पवित्र गंगादि तीर्थांच्या ठिकाणीं किंवा पवित्र शिवालयात एकांतात राहतो.

पृ. १७६, ओळ ११, शब्द ५ "शक्ति म्हणतात" ह्यापुढें.—

त्याणि आम्ही तिला 'परमभक्ति' म्हणतों. ही भक्ति पूर्वी वर्णन केलेल्या कर्मयोग्याला प्राप्त होते. तेव्हा त्याला विश्वांत माझ्या स्वरूपाची प्रचीति येते. त्या वेळीं बंधमोक्ष, विवेकवैराग्य, अलीकडील पलीकडील असें काहींच उरत नाहीं. तो कर्मयोगी माझी ज्ञानोत्तरभक्ति क्रियेवाचून करीत असतो. कर्म आणि मी एकच असल्यामुळें कर्म करणें तें कर्म करावें? कर्म करीत असतां करणें हेंच माया गेल्यावर न करणें हेंच त्याचें कर्म होतें. सर्व क्रिया मीच झाल्यामुळें काहीं एक न करणें हीच तो माझी महापूजा करीत असतो. तो जें पाहील तेंच माझें दर्शन होय. एवढा हा कर्मयोगाचा महिमा आहे.

पृ. १७६, ओळ २९, शब्द ७ "तरून जाता येत" ह्यापुढें:—

या माझ्या अभिन्न सेवेनें जेव्हा चित्त भरून जाईल तेव्हा त्याजवर माझा पूर्ण प्रसाद झाला असें समज. माझ्या प्रसादानें ज्याचा अहंपणा—जीवदशा नाश पावते त्याला संसारदुःख उरणार नाहीं. माझे ठिकाणीं अढळ निष्ठा ठेवून माझें चिंतन जर सतत करशील तर माझ्या प्रसादानें अनेक संकटांतून अनायासें तरून जाशील. पण 'मीच मोठा शहाणा, मला सर्व कळतें' असा दुराग्रह धरून आपल्या अल्प बुद्धिवर जोर देऊन माझ्या उपदेशाप्रमाणे वागणार नाहींस तर तुझा सर्वस्वी नाश मात्र होईल. पुरुषार्थ किंवा

परलोक तर साधणार नाहीच, पण उलट प्राप्त झालेलें ऐहिक सुख देखील मिळणार नाहीं

पृ १७७, ओळ ७, शब्द ९ "चालणारच नाहीं" ह्यापुढें—

ह्याप्रमाणें एकन्या ईश्वराच्या सत्तेनें सर्व प्राणी आपल्या बीजप्रकृतीला वश होऊन जन्ममरणाच्या फेऱ्यात फिरत असतात. अर्जुना, तोच ईश्वर तुझ्याहि हृदयात आहे अर्जुनपण न घेता 'मी' असें जें स्फुरण होतें तेंच खरोखर त्या ईश्वराचें रूप आहे म्हणून तो ईश्वर तुझ्या प्रकृतीला प्रवृत्त करीलच व तू स्वत नाहीं म्हटलेंस तरी ती प्रकृति तुला लढण्यास लावील अर्जुना, तू करणें न करणें ह्या दोन्ही गोष्टी प्रकृतीकडे सोंपवून दे व प्रकृति ही त्या हृदयस्थ ईश्वराच्या अधीन आहे त्याला अह, वाचा, चित्त व शरीर अर्पण करून सर्वस्वीं शरण जा. मग त्याच्या प्रसादान पूर्ण शात प्राप्त होऊन स्वानदानें तू आपल्या स्वरूपात रमशील

पृ १७७, ओळ ११, शब्द २ "भेद नाहीं" ह्यापुढ —

त्या सूर्याच्या अगप्रकाशान पाताळातील सूक्ष्म परमाणु दिसतो त्या सूर्याच्या डोळ्यात आणखी दिव्याजनहि घालावें त्याप्रमाणें मी सर्वज्ञ व सर्वशक्तिमान अशा सर्वज्ञ पुरुषानें सपूर्ण सारासार विचार करून अत्यत हितपरिणामी अशा अनेक गुजगोष्टी सागितल्या आहेत आता त्या रहस्यातील सर्व गुह्यतम रहस्य पुन एक वेळ थाडक्यात सागता मनातून सर्व उपभोग्य विषयाच व विकाराचें पूर्ण उच्चाटण करून तू आपल्या मनात मला एकट्यालाच जागा दे कारण मी एक ईश्वरच निरुपचार अत्यत प्रेमाचा विषय होऊ शकतों अनन्य प्रेमळ भक्ताचा मी अगदीं भुकेलेला आहें दिखाऊ भजन तर हजारों लोक करतात परतु त्याचें चित्त भोगासक्त असल्यामुळ त्या भजनाचा काय उपयोग ?

बुद्धि, मन व इंद्रियें माझे ठिकाणीं केंद्रीभूत कर कान भरून माझ्या कथा ऐक डोळे भरून माझें रूप सर्वत्र पाहा चार वाणींनीं माझें अखड नामस्मरण कर. श्रीगुरु सतचरणीं लीन हो! सतसगाशिवाय सद्गति नाहा सत्सगात शास्त्राचें हृद्गत उकलतें, ससार मावळतो, व खऱ्या परमार्थाचा लाभ होतो जगात स्वत कडे सर्व प्रकारें लहानपणा घेऊन लहानाहून ल्हान हो सर्व जग ईश्वररूप समजून तू त्याचा सेवक हो व आजन्म निष्काम

भावानें सेवा कर. सेव्यसेवक भावानें देहाहंकार निःशेष मावळून देहाचा 'पूर्ण निरास' होताच तू मद्रूप होशील. परमेश्वराच्या अनन्य भक्तीनेंच सर्व कार्यसिद्धि होईल. अनन्य ज्ञानी भक्ताच्या मस्तकावर ब्रह्मतेचा राजमुकुट कायमचा स्थिर असतो.

पृ. १७७, ओळ १९, शब्द ५ " मिळवून घेतलें " ह्यापुढें:—

अर्जुना, श्रीगुरु प्रसन्न होऊन शिष्याला विद्या प्राप्त झाली तरी त्या विद्येची संप्रदायाप्रमाणें उपासना केली तरच त्यापासून फळ प्राप्त होतें. निरनिराळ्या वृत्तीच्या लोकांना प्रत्येकाच्या अधिकारानुरूप क्रमानें किंवा एकदम ध्येयप्राप्ति करून देण्यासाठीं जो एक विशिष्ट साधनमार्ग सांगितला जातो त्यास संप्रदाय म्हणतात. श्रीगीताशास्त्राचा जो उचित संप्रदाय आहे तो येणेंप्रमाणें.—शरीराला ताप होईल म्हणून जो शास्त्रविहित आचरण करीत नाहीं, जो केवळ स्वेच्छाचारी वागतो, चित्ताची एकाग्रता करून श्रवणमनन निदिध्यास करण्याचा ज्याला अभ्यास नसेल, त्याला गीताशास्त्र सांगू नकोस. कारण भ्रांतचित्त उच्छृंखल लोकांवर याचा कांहीं परिणाम होणार नाहीं. उलट आपल्या बहुमोल वेळेचा व वाणीचा अपव्यय मात्र होईल. सुखासनावर पडून गीतेचीं पारायणें करणारे पुष्कळ सापडतील; पण त्यांत सांगितल्याप्रमाणें वागणारे किती थोडे सांपडतील ! शास्त्रोक्त सदाचार हीच खरी तपश्चर्या आहे. स्वतःच्या अल्पज्ञ बुद्धीवर भर देऊन बुद्धिप्रामाण्यवादाच्या जोरावर अभिमानानें देव, संत किंवा श्रीगुरुंविषयीं आदरबुद्धि नसेल, तर कितीहि विद्वान् असला तरी तो गीताशास्त्रश्रवणास नालायक समज. भले, तपस्वी, गुरुभक्त असून गीताशास्त्र ऐकण्यासाठीं सेवा करण्याची इच्छा नसेल तर त्यालाही सांगू नको. ज्याला माझें ईश्वरत्व पटत नाहीं, जो माझी किंवा माझ्या भक्तजनाची निंदा करतो, तो कितीही तपस्वी विद्वान् फार काय ब्रह्मदेवाच्या योग्यतेचा असला तरी त्याला कौतुकानें देखील गीतेचें अक्षर सांगू नकोस. गीता ही बुद्धिगम्य नसून हृदयगम्य आहे. तर मग हें गीताशास्त्र ऐकून कोणाला त्याचा खरा फायदा होतो ? शास्त्रशुद्ध आचरण करण्यासाठीं जो देह झिजवितो, श्रीगुरुसेवेंत सर्वस्व समर्पण करतो, शुश्रूषापूर्वक एकाग्रमनानें श्रवणमनन-निदिध्यास करतो, व मला तसेंच माझ्या भक्ताला परमपूज्य मानतो—या चार मुख्य गोष्टी जेथें स्पष्ट दिसतील तेथेंच गीतेचें प्रवचन केल्यास उभयपक्षीं अत्यंत कल्याणकारक व मोक्षदायक होईल.

पृ. १७७, ओळ २१, "आता उरले" ह्यापुढे—

देवा, मी अर्जुनपणानें गुतलों होतों तो तुझेपणानें मुक्त झालों. आता पुसणें व सांगणें ह्या दोन्ही गोष्टी राहिल्या नाहींत. तुझ्या प्रसादानें प्राप्त झालेल्या आत्मबोधानें मोहाचें गुठामकट पार उचाटन झालें आहे. हे देवाधिदेवा श्रीकृष्णा, गंगा समुद्राची सेवा करण्यास गेली असता त्याला मिळताच तिचें नामरूप हरपून ती गंगा समुद्र होते त्याप्रमाणें तुझी सेवा करणाऱ्याची स्थिति होते. देवा, तू माझा निरूपचार सेव्य सद्गुरु आहेस मी ब्रह्मतेचा ह्याच उपकार मानतों कीं, तुझ्या माझ्यात भेदाचा जो आडपडदा होता तो त्या ब्रह्मतेनें नाहींसा करून सेवासुख गोड करून दिलें. अज्ञानजन्य हृदयातील सर्व संशय छिन्नविच्छिन्न होऊन शोक व मोहाचा पूर्ण निरास झाला आहे. मी आत कृतार्थ होऊन अगदीं शांतचित्त झालों आहे. माझा मोह सहकुटुंब गेला आहे व स्वत्वाची पूर्ण जाणीव पटून संशयवृत्ति सर्व मावळून आता मी पूर्ण निःसंदेह झालों आहे. तुझ्या आज्ञेविरहित मी केव्हाहि जाणार नाहीं. तू आता जें काहीं सांगशील तें करण्यास मी एका पायावर अगदीं तयार आहें. ह्यापुढें मला म्हणून काहींच कर्तव्य शिल्लक उरलें नाहीं. माझें कर्तव्य व भोक्तृत्व हें सर्व सपलें आहे.

पृ. १७८, ओळ ७, शब्द १२ "ह ठरलेलें समज" ह्यापुढे—

अर्जुन विजय ह्या नावानें विख्यात आहे. भगवान् श्रीकृष्ण तर स्वतः विजयस्वरूप आहे म्हणून तेथें सर्व राजलक्ष्मी, पूर्ण विजय, उत्तरोत्तर सर्व सुखाची अभिवृद्धि, सर्व प्रकारच्या संपत्तीची गरमराट, आणि उत्तम प्रकारचा न्याय, नीतिधर्म, तेथेंच अखंड राहावयाचा हें अगदीं ठरलेलेंच आहे. वेळप्रसंगीं सूर्य पश्चिमेस उगवेल, पण ह्या वरील सिद्धान्तास कालत्रयींही बाधा येणें शक्यच नाहीं. भगवान् श्रीवेदव्यासाच्या शब्दावर जर तुमचा विश्वास असेल तर हें माझें भविष्य अटळ माना. व ह्यात जर काहीं विपरीत अनुभवास येईल तर श्रीव्यासाचा शिष्य म्हणून मी जगात वावरणार नाहीं

पृ. १७९, ओळ ७, शब्द ३ "स्वानंद साम्राज्य लाभेल" ह्यापुढें:—

श्रीगीता वेदाचें मूळ असून भगवान् श्रीकृष्ण प्रभूची ती वाङ्मयमूर्ति आहे. वेद हे परमेश्वराचे निःश्वास आहेत ह्या म्हणण्याचा साधा अर्थ असा कीं, जसें

निःश्वासाला श्रम लागत नाहींत त्याप्रमाणें षड्गुणैश्वर्य परमेश्वरानें वेद अप्रयत्न निर्माण केले आहेत. जो प्रभु अप्रयत्नपूर्वक वेद निर्माण करताना देखील त्रिकालाबाधित सत्य सांगण्यास यत्किंचितदेखील चुकला नाहीं तोच श्रीकृष्ण प्रभु प्रयत्नपूर्वक अर्जुनास गीता सांगताना अविनाशी त्रिकालाबाधित सत्य प्रतिपादन करण्यांत कसा चुकेल? म्हणून एका अर्थी वेदापेक्षां ही गीताच अधिक सर्वश्रेष्ठ ठरते. अलंकारिक भाषेत वेदाला "सौपुन श्रुति" व गीतेला "जाग्रत श्रुति" म्हणण्यांत येते. सारांश, गीता हा विश्ववद्य ग्रंथ असल्यामुळें गीताधर्म म्हणजे त्रिकालाबाधित विश्वधर्मच होय. गीता हा समस्त नीतिधर्मांचा सारसर्वस्व ज्ञानकोशच आहे.

— ॥ हरिः ॐ तत्सत् श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ —

# श्रीज्ञानेश्वरीची विषयवार ( वर्णानुक्रमवार ) सूची

## ( कुंटे मतीन्या आधारें )

[ ही सूची नागपूरचे एक मालगुजार व सुप्रसिद्ध वकील रा. दत्तात्रय गणपतराव खापरे, एम ए., एलएल. बी. यांनीं तयार केलेल्या विस्तृत सूचीपैकीं संक्षेपरूप काहीं भाग आहे ही सूची रा. खापरे यांचे गुरुबंधु शा. उ. माढरे, पुणें, यांच्याकडून मिळाली आहे. या सूचीचा उपयोग करूं दिल्याबद्दल आम्ही रा. खापरे यांचे आभारी आहों.

श्री. भाऊसाहेब खापरे हे श्रीसद्‌गुरु गुलाबराव महाराजांच्या थोर अधिकारी पट्टशिष्यांपैकीं एक आहेत. यांनीं श्रीगुलाबराव महाराज यांच्या समग्र ग्रंथावलीची ( अठरा भाग ) एक मोठी विस्तृत विषयसूची तयार केली असून त्याचें नाव " माधुर्य–मधुकोष " असें ठेवलें आहे. ]